सद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

# काव्य-कुसुम-कलिका

## द्वितीय-उद्भव.

# पुष्प-पाकळ्या

प्रकाशक—
एम्. के. दीक्षित
माणिकनगर.

कविवर्य—
काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट
श्री. यशवंत सदाशिव कोरेकल
हैद्राबाद.( दक्षिण ).

किंमत १॥ रुपाया.

॥ श्री सद्‌गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

# काव्य-कुसुम-कलिका

## द्वितीय-उद्भव.

# पुष्प-पाकळ्या

कविवर्य

काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट्, सकलकलाकोविद-

**यशवंत सदाशिवराव कोरेकल.**

हैद्राबाद, दक्षिण.

---

संग्राहक

एस्. के. दीक्षित,

माणिकनगर.

---

१९३४.

॥ श्री सद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

बा स्फोरका !

त्वत्पदिं लीन-भावें-।

या पाकळ्या

अर्पितसे स्वभावें ॥

माझें मला

तेंच कसें मिळावें।

जेव्हां तुझें

पूर्ण तुला नपावें ॥

---

यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं आराधनं ते प्रभो

॥ श्रीसद्गुरुमाणिकप्रभु प्रसन्न ॥

बा ! स्फोरका ! स्वपादीं लीन-भावें ।
या 'पाकळ्या' अर्पितसे स्वभावें ॥



माझें मला नच कसें मिळावें ।
जेव्हां तुझें पुढें तुला न पावें ॥१॥

## अर्पणपत्रिका

**भक्तकार्यकल्पद्रुम गुरुसार्वभौम श्रीमद्राजाधिराजयोगि महाराज त्रिभुवनानन्द अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित सद्गुरु माणिकप्रभु महाराज की जय !**

अखंड आनंदरूप असलेला आत्मा मायोपाधीमुळें विकृत होऊन चिज्जड, सज्जड, पिंड, ब्रह्मांड, बिंब, प्रतिबिंब, ईश, जीव, ख्याति, असत्ख्याति अशा मोडी-वळणांतून स्वैर परिभ्रमण करून झालेली विकृति आविकृत कशी आहे हे बालबोध दृश्य पाहाणारा, गद्याच्या अनियमबद्ध उद्यानांत न संचरतां नियमबद्ध प्रवाहांत स्रवणारा व पद्यार्थानें स्वतःचें सत्त्व कसें व्याप्त होऊन राहिलें आहे हें पाहून निमित्तमात्र वाणीकडून संसृतिव्यसनविस्मरणपूर्वक बोबडे बोल वदवून कौतुक करणारा, हातानिराळी कृति करून कर्तृत्वन्यास बिंबविणारा समर्पणप्रसक्त झाल्यामुळें ज्याच्या कृपाकटाक्षविलोकनभूत अन्तःस्फूर्तीनें विकसित करविलेलीं प्रमोदपुष्पें परमपूज्य अखंडैकरसात्मक, अज्ञानतिमिरपटलच्छेदक, सच्चिद्घन, सर्वत्रानुस्यूत, सर्वव्यापी सकलमताचार्य सनातन सद्गुरु 'श्री मन्मार्तंड माणिकप्रभु' महाराजांच्या चरणारविंदीं ज्याचें त्यालाच समर्पण झाल्याशिवाय कसें राहील म्हणून या 'काव्य-कुसुम-कलिकांचे-द्वितीय-उद्भव' 'पुष्पपाकळ्या'-हे बोलविलेले बोबडे बोल सादर अनन्यभावें श्रीचरणीं अर्पण असोत !

पूर्णादिः पूर्णमध्यश्च पूर्णएवावशिष्यते । पूर्णत्वात्पूर्णं दातारं सर्वं कर्तारमाश्रये ॥

चरणरजांकित बालक—यशवंत सदाशिव कोरेकल.

॥ श्री सद्‌गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥



काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, सकलकलाकोविद
श्री. यशवंत सदाशिव कोरेकल.

# अभिप्रायः

( श्रीकाशीपण्डित सभायाः सहकारी-सभापति विद्वज्जनमानसहंस श्रीमुकुंदजी महामहोपाध्यायः )

( मुद्रिका ) काशीपण्डितसभा.

---

॥ श्री काशीविश्वेश्वरो विजयतेतराम् ॥

सुवर्णपुष्पां पृथिवीं चिन्वन्ति पुरुषास्त्रयः ॥
शूराश्च कृतविद्याश्च ये च जानन्ति सेवितुम् ॥१॥

श्रीमन्तो यशवन्त सदाशिव महोदयाः

प्रसादबहुला मधुरभाषामयी मनोहारिणी गभीराशयान्तःसरसा सालङ्कारा वनितेव भवतां कविता नो नयनपदवीमलमुद्द्योतयामास । अर्थगौरवमेवास्यामहत्त्वम् । पदे पदे निदर्शनार्थान्तरन्यासादीनामर्थालङ्काराणां यमकानुप्रासादीनां शब्दालङ्काराणाञ्च निरतिशयं प्राचुर्य्यं नतिरोहयति महाराष्ट्रिय-साहित्य-पारावार-पारीणत्वं श्रीमताम् ।

महाराष्ट्रियवाङ्मयमहोदधिमुन्मथ्य जगति प्रकाशतां नीतमिदं काव्यकलिकाया द्वितीयमुद्भवं पञ्चदशमं रत्नं नु महाराष्ट्रियाणामपरंजीवितं नु वरीवर्तीति समालोचकचतुराणां विदुषां मनसि सहसैव समुदेतीति ना च संशीतिलवोऽपि ।

भवद्गुणसम्मुग्धचेतसो वयं किमन्यदाशास्महे:— अविरतमुत्तरोत्तरं काव्यविरचनायां लोकातिशायिनीं प्रतिभां प्रकाशयन् सूक्तिसुधाभी रसिकानां मानसानि समुल्लासयश्चिरमलङ्करोतु भुवं भवानिति वरं वितरताम्भगवान् भूतभाव नो भवानीपतिः ।

( हस्ताक्षरं ) श्रीमुकुंदजी ( महामहोपाध्यायः )

ता. ३-१-१९३२ ( सहकारी-सभापतिः )

# अभिप्राय

(वेदाविद्वेदांतवाग्व्यापृत विद्वद्वर्य शास्त्रसुधाकर आचार्यभक्त पंडित विष्णुशास्त्री बापट. संस्थापक आचार्यकुल—पुणें २)

---

श्री. य. स. कोरेकल हैद्राबाद दक्षिण.

सा. न. वि. वि. आपलें (काव्यकौस्तुभकृत द्वितीय—उद्भव) " पुष्पपाकळ्या " हें काव्यसमूहाचें महत्प्रकरण मजकडे येऊन बरेच महिने झाले. मला एका क्षणाचीही फुरसत मिळत नसल्यामुळें त्याचें समग्र अवलोकन करतां आलें नाहीं. तथापि आपण ज्यांचा निर्देश केला आहे, त्या ध्वजांकित कविता पाहिल्या. त्यावरून आपली ईश्वरविषयींणी भक्ति, अद्भुत काव्यरचनाशक्ति, प्रेमलभाव, अंतःकरणाची सात्विकता इत्यादि गुण अनुभवास आले. आपण या द्वितीय-उद्भवांत श्रीवृत्तापासून त्रिंशत्-अक्षरी अर्णदंडकापर्यंत सर्व वृत्तांची बव्हंशी परिपूर्णता केली. यावरूनच आपल्या श्रमाचें दिग्दर्शन होत आहे आपण परमेश्वरानुग्रहार्थ केलेली ही सेवा ईशचरणीं खचित रुजू होईल, यांत संशय नाहीं. आपलें पुस्तक छापून प्रसिद्ध झाल्यावर एक प्रत पाठवून द्यावी. ती आमच्या आचार्यांकुलांतील विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडेल. आपल्या काव्यशक्तीची प्रशंसा करावी तेवढी थोडीच आहे. परमात्मा आपल्याला अशा भक्तिप्रचुर कार्यनिर्मितीसाठीं दीर्घायु करो. आपलें काव्य व हा अभिप्राय आपणांकडे पाठविण्यास फारच विलंब लागला याबद्दल क्षमा करावी. लोभ असावा ही विनंति.

आपला

२५—११—३० [सहि] विष्णुशास्त्री बापट

॥ श्री गायत्र्यंबा विजयते ॥

वेदविद्वेदांतवागीश विद्वद्वर्य श्री. स. के. श्रोत्रीय.

॥ करबदरिसदृशमखिलं भुवनतलं यत्प्रसादतः कवयः ॥
॥ पश्यन्ति सूक्ष्ममतयस्तां सरस्वतीं वन्दे ॥१॥

[ श्रीहर्ष कवि

नियतिकृत नियमरहितां ल्हादैक मयी मनन्य परतंत्राम् ।
नवरसरुचिरां निर्मिती मादध भारती कवेर्जयति ॥१॥

( काव्यप्रकाश )

काव्यकौस्तुभ श्री. यशवंतराव कोरेकलकृत काव्य-कुसुम-कलिकेचा द्वितीय-उद्भव मीं लक्षपूर्वक पाहिला. या कवीवर निःसंशय सरस्वतीची कृपा आहे. कारण एरव्हीं इतकी अशी ही आल्हादमय, सहजसुंदर कवितारचना शक्यच नाहीं. " वाक्यं रसात्मकं काव्यम् " [ साहित्यदर्पण. ] अथवा " रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम् " [ रसगंगाधर. ] हीं जीं काव्यलक्षणें, तीं येथें स्पष्ट प्रतीत होतात. " नवनवोन्मेषशालिनी बुद्धि" रूपी जी प्रतिभा, तसाच " काव्यं श्रुत्वा सद्य एव तदर्थबोध जनकता " रूप काव्याचा प्रमुख गुण जो प्रसाद, तोही या कृतींत ओतप्रोत प्रकट आहे. निरनिराळ्या २०० स्फूट विषयांवर जवळ जवळ १५०० कविता व त्याही भिन्न भिन्न अशा नित्य प्रचारांतील, तशा प्रचारांत नसलेल्याही बहुधा सर्व वृत्तांत सहजस्फूर्तीच्या अकुंठित ओघांत छंदशास्त्रानुसार साचांत बांधीव अशा जणों काय लीलेनें आयत्याच कवीच्या हृदयांतून हृदयंगम व सुश्राव्य अशा बाहेर पडल्यासारख्या प्रतीत होतात व त्यामुळें प्रस्तुत कवीच्या काव्यकलाकुशलतेचें कौतुक वाटतें " काव्यं कांतासंमित-तयोपदेशयुजे " हें जें काव्यप्रकाशांत

**मम्मटानें** काव्याचें एक प्रयोजन सांगितलें आहे तेंही या काव्यांत, त्यांतील ठायीं ठायीं आढळणाऱ्या व्यावहारिक, नैतिक, व तात्विक उपदेशावरून सिद्ध होतें. चमत्कृतिपूर्ण यमकानुप्रासान्वित शब्दालंकारानें व प्रौढ अर्थालंकारानेंही सदभिरुचीस अनुसरूनच या कवीनें आपली कुलीन व सुशील कविता-वनिता श्रुतिमनोहर अशी शृंगारिली आहे. या काव्य-प्रबंधांत दिसून येत असलेली अंतःकरणाची पवित्र प्रेमलता, व त्याची दृश्य सृष्टीशीं एकांतसमरसता तशीच तात्विक कल्पनांची भावप्रधान उदात्तता हीं प्रस्तुत भाग्यशाली कवीच्या ईश्वरीभक्तीची, अध्यात्मप्रवण मनोवृत्तीची व अंतर्निष्ठ साधकतेची साक्ष पटवितात; आणि त्यांतच अनेक ठिकाणीं नादलुब्ध मृदुमंजुल शब्दगुंजारवाची स्वाभाविक जोड मिळा-ल्यानें सहृदय रसिकाचें हृदय सुतरां आंदोलून जातें.

**'पर' हेतु असे जगण्यास्तव ।**
**जगति लोक वृथा मरण्यास्तव ।।**
**कधिंचा मरुनी उरलों असे ।**
**मरणभीति मला अणुही नसे ।।**

ही एकच कविता प्रस्तुत कविच्या उच्च विचारसरणीच्या समर्थनार्थ पुरे आहे. सारांश, मला हें काव्य वाचून जो आल्हाद झाला आहे तो "**रमवित मज काव्यकल्पना**" या कवीच्या स्वतःच्याच शब्दांत मी विनयपूर्वक प्रांजलतेनें व्यक्त करितों. प्रेमादरानें, कौतुकानें व निर्मत्सर गुणग्राहकतेनें "**काव्यकौस्तुभ**" ही पदवी मी प्रस्तुत कवि **रा. यशवंतराव कोरेफल** यांस बहुमानपूर्वक अर्पण करितों व ती त्यांस यथार्थाक्षर शोभेल असा माझा प्रामाणिक अभिप्राय आहे.

शुक्रवार पेठ. ६१३ सोलापूर. [सही] **सदाशिव केशव श्रोत्रीय.**
**आश्विन शु.१० श.१८५१** 'भावोपहार' व 'भक्तिविहार' यांचा कर्ता.

# पद्यात्मक अभिप्राय.

विद्वद्वर्य वे.शा.सं. श्रीमन्मयूरपंतकुलोद्भव काशीनाथ व्यंकटेश [उर्फ] भय्याशास्त्री पंत पराडकर. मु. श्रीक्षेत्र पंढरपूर.

ता. २२-२-१९३० इ. शनिवार माघ वद्य ९ श १८५१.

**आर्या (गीति.)**

गुरुपदरस मधु लाभे अजर यशा काव्यकुसुमकलिका ही ॥
मधुपहि करील पाहुनि विकसित हें काव्य कुसुम कालि कांहीं ॥१॥

---

एस्. के. दीक्षित कार्यभारी श्रीसंस्थान माणिकनगर. पोस्ट–होमिनाबाद.

**" हेंच साधन यशवंत व्हावयाचें "**

**वृत्त–दिंडी.**

भ्रम न सरला तोंवरी भाग्य नाहीं। सूर्य चमके जंव रात्र सरे पाही॥
जरी काव्यभ्रम आज मुदें नाचे। सत्य मौक्तिक नच भाव हे दुवाचे १
वीज मेघभ्रम सारुनी बलानें। वरी तेजाची माळ संभ्रमानें ॥
भेदि जेव्हां भ्रम सिंधुचा स्व अंगें। लहरि तेव्हां घे उडी समिरसंगें २
कालमानाचें दार्ढ्य झुगारोनी । दिवस रजनी ये उत्क्रमा धरोनी ॥
जरी क्षणभंगुर धीरता न सोडी। शाश्वताचा जणुं वज्रशकट मोडी३
असें वाटे तरि आयु तया नाहीं। भ्रमण अस्तोदय नित्य या प्रवाहीं ॥
होय प्रतिभामय चंद्र पूर्ण जेव्हां। काव्य सिंधोर्मी उचंबळे तेव्हां ॥४॥
मोल सर्वोत्तम काव्यकलापाचें। आज नाहीं तरि उद्यां व्हावयाचें ॥
हृदयिं आली जरि खिन्नता अपार। त्यजुनि गुंफी नवकाव्यकुसुमहार
भ्रमांसाचा तो पुण्यदिवस यावा। भ्रमावर्तन जरादेकरून [illegible]
तदा सभ्रम कीं सार्थ हो जनाचे।'हेंच साधन यशवंत व्हावयाचें'॥६॥

॥ श्री जय हिंद ॥

काव्यकुसुमकलिकाकार काव्यकौस्तुभ श्री. य.स. कोरेकल यांचें चरणीं—

गुरुवर्य ! आम्हांस—आपल्या ठिकाणचें प्रेम व आदर व्यक्त करण्यास इतका आनंद वाटत आहे कीं, त्या योगें शब्द सापडत नाहींत. आपल्या विषयीं जेव्हां जेव्हां विचार करूं लागावें तेव्हां तेव्हां आपल्याविषयींचा आदर, प्रेमभाव वाढतच जातो " आपण काय आहां ? " असा प्रश्न जर मनास विचारला तर मनाकडून उलट प्रश्न विचारला जातो कीं, ' आपण काय नाहीं ? '

एक उत्तम कवि या दृष्टीनें आपणासंबंधीं विचार करूं लागावें तों आदि कवि मुकुंदरायापासून अगदीं अलिकडील यशवन्तादि कवि पर्यंतच्या प्रत्येक कवीतील गुणच तेवढें आपल्या काव्यांत दृष्टोत्पत्तीस येतात. त्यामुळें मोरोपंत, वामन, मुक्तेश्वर, रघुनाथपंडित, केशवसुत, गडकरी, रेंदाळकर यापैकीं कोणत्या कवींशी आपली तुलना करावी हें कोडें अद्याप आम्हांस उलगडलें नाहीं. कारण आपण नुसतें 'कविसम्राट' नसून ' वृत्तसम्राट ' आहां हें विशेष होय.

काव्यासंबंधींची गोष्ट क्षणभर विचाराआड केली तरी आपल्या इतर गुणांसंबंधींही आमच्या मनाची तीच स्थिति होते. अर्वाचीन नामांकित वादनपटु, प्रसिद्ध कारागीर, कुशल कातरकाम करणारे, विद्वान्-प्रवचनकारही आपल्याशी तुलना करण्यास आम्हांस कमी वाटतात.

आमचें आपल्या ठिकाणीं निस्सीम प्रेम आहे म्हणून असे विचार आमच्या मनांत येतात असे नसून—ही वस्तुस्थिति आहे—असें व्यक्त करण्यास आम्हांस कोणताही प्रत्यवाय वाटत नाहीं.

सारांश आम्हांस आपल्याविषयीं जें काय वाटतें तें इंग्लिश कवि श्री. वर्डस्वर्थच्या शब्दांत व्यक्त करून आपल्या यशोविकासाबद्दल प्रभूची प्रार्थना करीत रजा घेतो.

If thou indeed derive thy light from heaven
Then, to the measure of that heaven born light,
Shine poet:...... ॥ ॐ तत्सत् ॥

आपले

शाली. हैद्रा. (द.)
ता. २१।१२।२९६.

शंकरराव सदावर्ते बी.ए.एल्.एल्.बी.
एन्. बक्षी बी. ए. एल्. एल्. बी.
श्री.कृ.पांडवप्रभृति ॲडमायर्स व असिशिएटर्स.

॥ श्री माणिकप्रभू प्रसन्न ॥

श्री. काव्यकौस्तुभ **य. स. कोरेकल** यांसः—

स. ज. गु. मा.

यापूर्वी ७५ कवितांचें काव्य कुसुम—कलिका प्रथम उद्भव आपण श्रीचरणीं अर्पण करून कर्तृत्वन्यास स्वीकारल्यास थोडे दिवस झाले नाहींत तोंच हा २३६ कविता (ग्रंथसंख्या १७३९) चे 'पुष्पपाकळ्या' नामक द्वि. उ. श्रीसद्गुरु चरणीं अर्पण करीत असल्याचें पाहून अत्यानंद झाला. कविसम्राट यापेक्षां काव्यसम्राट हे विशेषण आपल्यास अधिक शोभेल, कारण सर्व वृत्तांतून मराठींत अद्याप कोणीच कविता लिहिली नाहीं तो मान आपण प्रथम मिळविला. आपली कामगिरी भावी कालांत आपलें नांव अजरामर करील. सदुद्योगानें कालावरही आपला प्रभाव चालतो त्याचें हें उदाहरण आहे.

आपल्या काव्यलोलुपतेची पराकाष्ठा झाली. हा आनंद खरोखरीच धन्यता वाटणारा आहे. भावी कालांत आपल्या कवितेवरून चरित्र वर्तविणें झाल्यास आजच्या आपल्या वैराग्यपर वृत्तीला वैभवशालीत्व प्राप्त होईल याची कल्पना मनाला आल्हादकारक वाटते. वेदांतील स्थितप्रज्ञ करुनी अकर्ता याची गोडी हीच आहे आपली तपोवृत्ती लोकांना विलासमय वाटणार व ते तसें वाटण्यास लावणें हाच काव्यचमत्कार होय. आपण कृतकार्य झाल्याचें पाहून आनंदी आनंद झाला.

**धन्या माता पिता धन्या धन्यो वंश कुलं तथा ॥ धन्याच वसुधादेवी—**

हा श्लोक गुरुभक्ताकरितां वर्णिला आहे व एका अर्थानें आपल्यास अन्वर्थक आहे. गुरुभक्त म्हणजे तरी एका वरिष्ठ व्यक्तीला आत्म-

सर्वस्व अर्पण करणें आहे आपणही आपले आत्मसमर्पण काव्य, व्याख्यान प्रवचन, संगीत, कला, कौशल्य, इ. क्रमानें काव्यस्वरूपी श्रीप्रभूला करून टाकलें आहे.

शेवटीं ज्ञानदेवांनीं सांगितल्याप्रमाणें आपलें श्वास देखील नवोनव काव्य होऊन आपण काव्यपुरुष व्हावें असें इच्छितों. आमचें हें इच्छिणें निश्चयी व सत्य स्वरूपाचें असल्यानें त्याचें व्यक्तफल सर्वांना सुखकारी झाल्याशिवाय राहणार नाहीं. कळावें.

ज्ये. व. ८ गुरुवार.
शके १८९९

(सही) एस. के. डी. कार्यभारी
श्रीसंस्थान माणिकनगर.

श्री

# मानपत्र

सकलकलाकोविद, वृत्तसम्राट, काव्यकौस्तुभ कवि श्री. यशवंतरावजी कोरेकल यांस प्रेमादरपूर्वक समर्पण.

श्रेष्ठ नागरिक व चेतोहर वाङ्मयसेवक या दृष्टीनें आपण आमचे हृदय आकर्षिलें आहे. आपण श्रेष्ठप्रतीचे कवि आहां. आपलें व इतर कवींचें काव्य तौलनिकरीतीनें पाहिल्यास आपल्या काव्यप्रसूतींत एक महत्त्वाचा विशेष आढळतो. आपली काव्यगंगा वेदान्तसौरभामिश्रित आहे हाच तो विशेष होय, व ती अस्खलित व अव्याहत वाहत असल्यामुळें प्रेमी सुजनांना त्यांत अवगाहन करून पवित्र आनंद व शांतीचा अहर्निश उपभोग घ्यावासा वाटतो.

दुसरें सर्व वृत्तांतून महाराष्ट्र भाषेंत एकाच कवीनें सुयशपूर्वक कविता केलेला कवि आढळणेंच दुर्मिळ. आपल्या प्रतिभेनें आपण हें महत्तमकार्य सहजपणें तडीस नेलें आहे, ह्मणून आपणांस 'वृत्तसम्राट' ह्मणण्यास आह्मांस मुळींच प्रत्यवाय वाटत नाहीं.

उपरिनिर्दिष्ट 'सकलकलाकोविद' हें विशेषण आपणांस पूर्णपणें लागू पडतें, कारण आपलें बहुतेक सर्वकलामध्यें प्राविण्य दिसून येतें. उदाहरणार्थ—संगीतशास्त्र, गायन, वादन, चित्रकला, आदि ललितकलांतील अनुपम प्राविण्य तसेंच सूक्ष्मलेखन व कातरकाम यांतील अतुल कौशल्य नितांत प्रशंसनीय आहे. ही प्रेमपुष्पमाला आदरपूर्वक आपणांस आह्मीं अर्पण करीत आहों. याचा स्वीकार करून उपकृत करावें ही विनंति.

जी. बी. जोशी बी.ए.एल्.एल्. बी., एम्.एच्. मिश्र बी.ए.एल्. बी. जी. बी. हरवाळकर बी.ए.एल.एल्. बी., शेषराव पिलखाने बी.ए. असिस्टंट रेव्हिन्यू सेक्रेटरी, त्रिंबकराव कामाठी बी.ए.एस्.ए.एस्. व्ही. बी. धनाश्री बी.ए.एस्.ए.एस् चीफ सुपरेन्टेन्डेट फायनान्शियल ऑफिस., एम.आर.परळीकर बी.ए. आर.डी.जोशी एल्. एम्. ॲन्ड एस्., एन. वाय. बक्षी बी.ए.एल्.एल्. बी.

कवि-काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट, य. स. कोरेकलकृत (काव्य कुसुम. कलिका द्वितीय-उद्भव) " पुष्पपाकळ्या " ची सूची:

| पृष्ठांक | कविता क्रमांक | पाकळ्या | वृत्ताक्षर संख्या | वृत्तक्रमांक व वृत्ताचें नांव. | श्लोक संख्या | चरण संख्या | प्रकाशन स्थळ | व काळ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | तें ............ | १ | १ लें श्री | १० | ४० | | |
| २ | २ | स्त्री, श्री ... ... | २ | २ रें स्त्री | ५ | २० | | |
| ३ | ३ | हेवा देवा... | २ | " " | ५ | २० | | |
| " | ४ | अतृप्ता ... | ३ | ३ रें नारी | ५ | २० | | |
| ४ | ५ | आवृत्ति ... ... | ३ | " " | ५ | २० | | |
| " | ६ | मृगी........... | ३ | ४ थें मृगी | १० | ४० | | |
| ५ | ७ | सुकन्या ... | ४ | ५ वें कन्या | ५ | २० | | |
| ६ | ८ | कुकन्या ... | ४ | " " | ५ | २० | | |
| ७ | ९ | सती ......... | ४ | ६ वें सती | ५ | २० | | |
| " | १० | पंक्ति... ...... | ५ | ७ "पंक्ति | ५ | २० | | |
| ८ | ११ | देहि... ... ... | ६ | ८ "तनुमध्या | १० | ४० | | |
| ९ | १२ | वसुमति ... ... | ६ | ९ " वसुमती | ५ | २० | | |
| १० | १३ | विद्युल्लेखा...... | ६ | १० "विद्युल्लेखा | १२ | ४८ | | |
| ११ | १४ | शशिवदना...... | ६ | ११ "शशिवदना | ६ | २४ | | |
| १२ | १५ | विचारा कुणाला? | ६ | १२ "सोमराजी | १० | ४० | | |
| १३ | १६ | सोमराजी... ... | ६ | " " " | ५ | २० | | |
| १४ | १७ | घडेल कधीं कां हें? | ७ | १३ कुमारललिता | ५ | २० | | |
| " | १८ | मदलेखा ... ... | ७ | १४ " मदलेखा | ५ | २० | | |
| १५ | १९ | मधुमति ... ... | ७ | १५ " मधुमति | ५ | २० | | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृ. क्र. | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १६ | २० | एक ........ | ८ | १६वें अनुष्टुभ् | ५ | २० | तत्त्वज्ञानमंदिर अं. २ १९२९. |
| " | २१ | गजगति ... ... | ८ | १७" गजगति | १२ | ४८ | |
| १८ | २२ | वृत्ति ......... | ८ | १८" चित्रपदा | ५ | २० | |
| " | २३ | अजूनि वाट चालतो | ८ | १९" नगस्वरूपिणी<br>२०" प्रमाणिका. | ४४ | १७६ | तत्त्वज्ञानमंदिर अं. १ जुलै १९३० |
| २२ | २४ | काल कसें?— आज कसें ? | ८ | २१" माणवक.<br>२२" माणवकक्रीडित | १३ | ५२ | |
| २३ | २५ | तळमळ ... ... | ८ | २३ रुचिरा(१) | ८ | ३२ | |
| २४ | २६ | चित्तस्थैर्य ...... | ८ | २४" वक्त्र.<br>२५" वक्र. | १० | ४० | |
| २५ | २७ | वितान......... | ८ | २६" वितान | ५ | २० | |
| २६ | २८ | कोठें कांहीं कोठें- | " | २७" विद्युन्माला | १६ | ६४ | |
| २७ | २९ | आत्मघातकी | " | २८" समानिका | ६३ | २५२ | |
| ३२ | ३० | खूणगांठ ... | " | " " " | २३ | ९२ | |
| ३४ | ३१ | चारुहासिनी ... | ९ | २९" चारुहासिनी | ५ | २० | |
| ३५ | ३२ | वाणी ......... | " | ३०" बृहती—<br>३१" भुजंगशिशुभृता | ५ | २० | |
| ३६ | ३३ | भुजंगसंगता ... | " | ३२" भुजंगसंगता | ५ | २० | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृत्त क्र.व वृत्ताचें नांव | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ” | ३४ | रसिक...... | ” | ३३”मणिबंध- | ७ | २८ | |
| ३७ | ३५ | प्रबोधन ... | ” | ३४”मणिमध्य | १० | ४० | पुरु. षार्थ अं. ७ [illegible] |
| ३८ | ३६ | वृत्ति ...... | ” | ” ” ” | ५ | २० | |
| ३९ | ३७ | स्वार्थाचा तवा... | ” | ३५”विश्लोक... | ८ | ३२ | |
| ” | ३८ | हलमुखी ... ... | ” | ३६”हलमुखी... | ५ | २० | |
| ४० | ३९ | आनंद ... ... | १० | ३७ वें उपस्थिता | ५ | २० | |
| ४१ | ४० | धावना ... ... | ” | ३८वें कामदा | ११ | ४४ | पुरुषार्थ अं. ७ श. १८-५४ |
| ४२ | ४१ | मी नसतांना ... | ” | ३९वें चंपकमाला | ५ | २० | |
| ” | ४२ | त्वरितगति...... | ” | ४०वें त्वरितगति | ७ | २८ | |
| ४३ | ४३ | नामपणव ...... | ” | ४१वें पणव ... | ५ | २० | |
| ४४ | ४४ | आकाशाची भरारी | ” | ४२वें मत्ता ... | १५ | ६० | |
| ४५ | ४५ | मनोरमा ... ... | ” | ४३वें मनोरमा | ५ | २० | |
| ४६ | ४६ | मयूरसारिणी ... | ” | ४४वें मयूरसारिणी | ६ | २४ | |
| ” | ४७ | ठेवा... ... ... | ” | ४५वें मात्रासमक | १० | ४० | |
| — | | क.क्र.४१ ‘मी-नसतांना’—पहा ! | ” ” ” | ४६’रुक्मवती-चंपकमाला ... ३९वें | ... | | |
| ४८ | ४८ | बुद्धि ......... | ” | ४७ वानवासिका | ५ | २० | |
| ” | ४९ | शुद्धविराट...... | ” | ४८,,शुद्धविराट | १० | ४० | |
| ४९ | ५० | विश्वाधारा ! ... | ” | ४९,, हंसी (१) | ११ | ४४ | |
| ५१ | ५१ | मौक्तिकमाला... | ११ | ५०अनुकूला कुड्मलदंती ५५वें मौक्तिकमाला ६३ वें | १२ | ४८ | |

| पृष्ठ | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५२ | ५२ | अपरांतिका | ११ | ५१वें अपरांतिका ... ... | ५ | २० | |
| ५३ | ५३ | गुर्जरप्रांतप्रवास | ,, | ५२,,इंद्रवज्रा | ५ | २० | |
| ५३ | ५४ | मध्यमंगल... | ११ | ५२,,इंद्रवज्रा | १ | ४ | |
| ५४ | ५५ | उपेंद्रवज्रा ... | ,, | ५३,,उपेंद्रवज्रा | ३ | १२ | |
| ,, | ५६ | एकरूप... | ,, | ५४,,एकरूप | ५ | २० | |
| — | क.क्र.५१मौक्तिकमाला पहा! | | ,, | { ५५कुड्मलदंती अनुकूला ५०वें. मौक्तिकमाला६३ वें. } | | | |
| ५५ | ५७ | कीर्ति... ... | ,, | ५६वें ग्लपक्ष | ८ | ३२ | |
| ५६ | ५८ | चित्रा... ... | ,, | ५७,,चित्रा | ५ | २० | |
| ५७ | ५९ | मनाचे मांडे | ,, | ५८,,दोधक | २२ | ८८ | |
| ५९ | ६० | भद्रिका ... | ,, | { ५९,,प्रसंग<br>६०,,भद्रिका } | ८ | ३२ | |
| ,, | ६१ | आयुष्य | ,, | ६१,, भ्रमरविलसित | १९ | ७६ | |
| ६१ | ६२ | क्षण न भरंवसा | ,, | ,, ,, ,, | १३ | ५२ | { त.शा. मं.अं. ४ ए. १९३१ |
| ६२ | ६३ | विश्वाद्यंता!...... | ,, | ६२,,मालती(१) | ८ | ३२ | |
| — | ,, | क. क्र. ५१ मौक्तिकमाला पहा! | ,, | ६३,,मौक्तिकमाला | ८ | ३२ | |
| ६३ | ६४ | प्रेम | ,, | ६४,,रथोद्धता | | | |
| ६४ | ६५ | ललित | ,, | ६५,,ललित | १४ | ५६ | |
| ६६ | ६६ | वातोर्मी | ,, | ६६,, वातोर्मी | ५ | २० | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थल व काल. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ९२ | ८७ | माझी मणिमाला | १२ | ८७ मणिमाला (१) | १० | ४० | त. ज्ञा. मं. अं. ४ ए. १९३० |
| — | ... | कविता क्रमांक ८३ मंदाकिनी पहा | ,, | ८८ मंदाकिनी प्रभा ८३ वें. | ... | ... | |
| ९४ | ८८ | कुणीतरी | ,, | ८९ मालती (२) यमुना ९१ वें. वरतनू ९३ | १३ | ५२ | |
| ९६ | ८९ | मौक्तिकदाम | ,, | ९० मौक्तिकदाम | ५ | २० | |
| | | क. क्र. ८८— 'कुणीतरी' पहा! | ,, | ९१ यमुना— मालती ८९ वें. वरतनू ९३ ,, | ... | ... | |
| ९७ | ९० | अवधूत | ,, | ९२ ,, यूथिका | ३ | १२ | |
| — | ... | क. क्र. ८८ 'कुणीतरी' पहा! | ,, | ९३ ,, वरतनू मालती ८९ वें. यमुना ९१ वें. | ... | ... | |
| ९८ | ९१ | वारा | ,, | ९४ वें वैश्वदेवी | ९ | ३६ | |
| १०० | ९२ | वावटळ | ,, | ९४ वें ,, | ९ | ३६ | |
| १०१ | ९३ | प्रतिबिंब | ,, | ९४ वें ,, | ९ | ३६ | |
| १०३ | ९४ | तो—हा | ,, | ९५ वें वंशस्थ | ९ | ३६ | |
| १०५ | ९५ | सारंग | ,, | ९६ वें सारंग | ५ | २० | |
| १०६ | ९६ | सागरा ! | ,, | ९७ वें स्रग्विणी | ५ | २० | |
| १०७ | ९७ | चंद्रिका | १३ | ९८ वें उत्पलिनी— —क्षमा १०३ वें. —चंद्रिका १०५ वें. | ५ | २० | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृ. क्र. | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १०८ | ९८ | मंजुभाषिणी | १३ | ९९वें कनकप्रभा—<br>—,, प्रबोधिता १०७<br>—,, मंजुभाषिणी ११०वें<br>—,, सुनंदिनी ११५वें | ५ | २० | |
| १०९ | ९९ | कविरोदन | ,, | १००,, कलहंस—<br>१०१ कुटजा<br>—नवनंदिनी-१०६<br>—प्रभावती—१०८<br>-सिंहनाद ११४ | १२ | ४८ | कवि संमेलन भाग २ रा. १८८३ पृष्ठ १२१ |
| १११ | १०० | घड्याळ-कां-सिंहनाद ? | ” | कलहंस १००<br>१०१, १०६,<br>१०८ व ११४ | ५ | २० | पुरुषार्थ मे ३३ क्र. १०६ पृ. ३२६ |
| ११२ | १०१ | कालकुटिलगति | ” | १०२ कुटिलगति-<br>गाथा(३) १०४ | ६ | २४ | |
| — | ... | क. क्र. ९७ ‘चंद्रिका पहा!’ | ” | १०३ क्षमा—<br>उत्पलिनी ९८<br>चंद्रिका १०५ | | | |
| — | ... | क. क्र. १०१ “कालकुटिलगति” पहा! | ” | १०४ वें गाथा-<br>(३) कुटिलगति १०२ वें | | | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृत्त क्र.व वृत्ताचें नांव | श्लो सं. | च. सं | प्र.स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| — | ... | क.क्र. ९७ 'चंद्रिका' पहा ! | ,, | १०५ चंद्रिका-<br>उत्पलिनी ९८<br>—क्षमा १०३ | ... | ... | |
| — | ... | क.क्र. १०० 'सिंहनाद' पहा! | ,, | १०६ नवनंदिनी<br>कलहंस १००<br>कुटजा १०१<br>प्रभावती १०८<br>सिंहनाद ११४ | ... | ... | |
| — | ... | क.क्र. ९८ 'मंजुभाषिणी' पहा ! | ,, | १०७ प्रबोधिता<br>कनकप्रभा ९९<br>मंजुभाषिणी ११०<br>सुनंदिनी ११५ | ... | ... | |
| — | ... | क. क्र. १०० 'सिंहनाद' पहा ! | ,, | १०८ प्रभावती<br>कलहंस १००<br>कुटजा १०१<br>नवनंदिनी १०६<br>सिंहनाद ११४ | ... | ... | |
| ११४ | १०२ | प्रहर्षिणी ... | ,, | १०९ प्रहर्षिणी | ६ | २४ | |
| — | ... | क.क्र.९८ 'मंजुभाषिणी पहा ! | ,, | ११० मंजुभाषिणी<br>कनकप्रभा ९९ वें<br>प्रबोधिता १०७ ,,<br>सुनंदिनी ११५ ,, | ... | ... | |
| ११६ | १०३ | टाहो | ,, | १११ मत्तमयूरी | ८ | ३२ | |
| ११७ | १०४ | चिररुचिरा | ,, | ११२ रुचिरा(२) | ६ | २४ | |
| ११८ | १०५ | हुडकुं तुला कोठेंतरी! | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| ११९ | १०६ | मुलें | ,, | ,, ,, | ५ | २० | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १२० | १०७ | लिभावरी | १३ | ११३ लिभावरी | ८ | ३२ | तत्त्वज्ञानमंदिर अं.३ पौ.१८९४ |
| — | ... | क.क्र. १०० 'सिंहनाद' पहा! | ,, | ११४ सिंहनाद- | | | |
| | | | | कलहंस १००वें. | | | |
| | | | | कुटजा १०१वें. | | | |
| | | | | नंदिनी १०६वें. | | | |
| | | | | प्रभावती १०८वें. | | | |
| — | ... | क.क्र. ९८ मंजुभाषिणी— पहा ! | ,, | ११५ मनंदिनी | | | |
| | | | | कनकप्रभा ९९ | | | |
| | | | | प्रबोधिता १०७ | ... | ... | |
| | | | | मंजुभाषिणी ९८ | | | |
| १२२ | १०८ | मागणी | १४ | ११६ अपराजिता | ५ | २० | |
| १२३ | १०९ | दुःख | ,, | ११७वें. असंबाधा | ६ | २४ | |
| १२५ | ११० | स्वातंत्र्य | ,, | ११८ उद्धर्षिणी- | ४ | १६ | |
| | | | | मधुमाधवी १२५ | | | |
| १२६ | १११ | साहित्यसेवक | ,, | वसंततिलका १२७ | १२ | ४८ | |
| १२८ | ११२ | सिंहावलोकन | ,, | सिंहोद्धता १२९ | १० | ४० | |
| | | | | सिंहोन्नता १३०वें. | ... | ... | |
| १३० | ११३ | मानव्य | ,, | ११९ कुटिला- | ५ | २० | |
| | | | | मध्यक्षामा १२६ | ... | ... | |
| | | | | हंसश्येनी १३१ | ... | ... | |
| १३१ | ११४ | प्रमदा | ,, | १२० कुररीरुता | ६ | २४ | |
| | | | | प्रमदा १२२वें. | | | |
| १३२ | ११५ | मंजरी | ,, | १२१वें. पथ्या- | ६ | २४ | |
| | | | | -मंजरी १२४ वें. | | | |

| पृष्ठांक | क्र. क्र. | पाकळ्या | वृ. स. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | ग्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| — | ... | क.क्र.११४<br>'प्रमदा' पहा ! | १४ | १२२प्रमदा—<br>कुररीरुता १२० | ... | ... | |
| १३४ | ११६ | नवशिशु | ,, | १२३प्रहरणकलिता | १४ | ५६ | |
| — | ... | क. क्र. ११५<br>'मंजरी' पहा ! | ,, | १२४मंजरी—<br>—पथ्या १२१वें. | ... | ... | |
| — | ... | क.क्र.११०,१११<br>व११२ 'स्वातंत्र्य'-<br>'साहित्यसेवक'-<br>'सिंहावलोकन'पहा! | ,, | १२५मधुमाधवी<br>उद्धर्षिणी११८<br>वसंततिलका १२७<br>सिंहोद्धता१२९<br>सिंहोन्नता १३० | ...<br>... | ...<br>... | |
| — | ... | क.क्र.११३<br>'मानव्य'पहा! | ,, | १२६मध्यक्षामा<br>कुटिला११९<br>हंसश्येनी १३१ | ... | ... | |
| — | ... | क.क्र. ११०—<br>'स्वातंत्र्य'——<br>१११'साहित्यसेवक'<br>११२'सिंहावलोकन'<br>पहा ! | ,,<br>,, | १२७वसंततिलका<br>उद्धर्षिणी११८<br>मधुमाधवी१२५<br>सिंहोद्धता१२९<br>सिंहोन्नता १३० | ... | ... | |
| १३७ | ११७ | वासंती | ,, | १२८वासंती | २० | ८० | |
| — | ... | क.क्र.११०'स्वातंत्र्य'<br>,, ,, १११साहित्यसेवक<br>,, ,, ११२सिंहावलोकन<br>पहा ! | ,, | १२९सिंहोद्धता-<br>उद्धर्षिणी११८<br>मधुमाधवी१२५<br>वसंततिलका१२७<br>१३० वें. सिंहोन्नता | ... | ... | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळया | वृ. सं. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थल व काल. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| — | ... | क.क्र. ११३ 'मानव्य' पहा! | १४ | १३१ हंसश्येनी-<br>कुटिला ११९<br>मध्यक्षामा १२६ | | | |
| १४० | ११८ | शशिकला | १५ | १३२ चंद्रावर्ता<br>मणिगुणनिकर १३५ वें.<br>शशिकला १३८ | ५ | २० | |
| १४१ | ११९ | अश्रु कां अनावर? | ,, | १३३ चामर—<br>तूणक १३४ वें. | ८ | ३२ | |
| १४३ | १२० | तूणक | ,, | १३४ तूणक—<br>—चामर १३३ | ५ | २० | |
| — | ... | क. क्र. ११८ 'शशिकला' | ,, | १३५ मणिगुण-निकर—<br>चंद्रावर्ता १३२<br>शशिकला १३८ | ... | ... | |
| १४४ | १२१ | धनमद | ,, | १३६ मालिनी | ५ | २० | |
| १४५ | १२२ | लीलाखेल | ,, | १३७ लीलाखेल | ५ | २० | |
| — | ... | क. क्र. ११८ 'शशिकला' पहा! | ,, | १३८ शशिकला...<br>चंद्रावर्ता १३२<br>मणिगुणनिकर—<br>१३५ वें. | ... | | |
| १४७ | १२३ | अचलधृती | १६ | १३९ अचलधृती | ५ | २० | |
| १४८ | १२४ | अश्वगति-<br>भाग्यगति | ,, | १४० अश्वगति<br>,, ,, | ८<br>७ | ३२<br>२८ | |
| १४९ | १२५ | माझें अश्वारोहण | | ... | ... | | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृ. क्र. व वृत्ताचें नांव. | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १५१ | १२६ | ऋषभगजविलसित | १६ | १४१ ऋषभगज-विलसित | ५ | २० | |
| १५२ | १२७ | चित्र | ,, | १४२वें चित्र | ६ | २४ | |
| १५३ | १२८ | भारता! | ,, | १४३ पंचचामर | ६ | २४ | |
| १५४ | १२९ | सुबुद्धि | ,, | ,, ,, | ७ | २८ | |
| १५५ | १३० | [illegible] | ,, | १४४वें वाणिनी | ५ | २० | |
| १५७ | १३१ | सूरा | ,, | १४५वें सूरा | ५ | २० | |
| १५८ | १३२ | जगति एक-तंत्र! | १७ | १४७अतिशायिनी | ६ | २४ | |
| १५९ | १३३ | निसर्ग | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १६० | १३४ | नय | ,, | १४८वें. अवितथ. १४९वें. नर्कुटक. १५०वें. नर्दटक. | ५ | २० | |
| १६१ | १३५ | शारदागायन | ,, | १५१वें. पृथ्वी | ६ | २४ | कवि संमेलन श. १८५३ शारदा-श्रमाचे ३ रें पुस्तक पृष्ठ ११९ |
| १६३ | १३६ | सुहृदपत्निनिधन | ,, | ,, ,, | १० | ४० | |
| १६५ | १३७ | भावनामंदिरी | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १६६ | १३८ | उलटकामना | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १६७ | १३९ | सगुणघोषणा-निर्गुणी? | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १६८ | १४० | विकृति | ,, | १५२ मंदाक्रांता | ५ | २० | |
| १६८अ | १४१ | विरोध | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १६८ब | १४२ | जगुनि मिळतो स्वर्ग वाटेल तेव्हां. | ,, | ,, ,, | ५ | २० | विहंग-माला संमेलन विशेषांक १९३१ इ. पृ. ११ पुस्तक ७ वें ८ वें. |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थल व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १६९ | १४३ | धन्य ती धन्य-भक्ती! | १७ | १५२ मंदाक्रांता | ५ | २० | |
| १७० | १४४ | ते खरे-भाग्यशाली! | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १७१ | १४५ | वंशपत्र | ,, | १५३ वंशपत्रपतित | ५ | २० | |
| १७२ | १४६ | तैजस | ,, | १५४ शिखरिणी | १० | ४० | |
| १७४ | १४७ | टकळी | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १७५ | १४८ | निसर्गाची भेरी | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १७६ | १४९ | वियोगी | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १७७ | १५० | उपासना कीं-विप्रलंभ ? | ,, | ,, ,, | ५ | २० | |
| १७८ | १५१ | हरिणी | ,, | १५५ वें. हरिणी | ३ | १२ | |
| १७९ | १५२ | हृदयाची सहाण | १८ | १५६ ,, कुसुमित-लतावेल्लिता. | ८ | ३२ | |
| १८० | १५३ | चित्रलेखा | ,, | १५७ वें. चित्रलेखा | ४ | १६ | |
| १८१ | १५४ | फिरती कारंजी | ,, | १५८ ,, नंदन. | ५ | २० | |
| १८२ | १५५ | नाराच | ,, | १५९ ,, नाराच-सालसा १६२ वें. | ५ | २० | त. ज्ञान-म. अं. ४ |
| १८३ | १५६ | जननमरण | ,, | ,, ,, | ५ | २० | एप्रिल १९३१ |
| १८४ | १५७ | विबुधप्रिया | ,, | १६० वें. विबुधप्रिया-हरिनर्तन छंद १६३ | ८ | ३२ | |
| १८६ | १५८ | शार्दूलललित | ,, | १६१ शार्दूलललित | ५ | २० | |
| — | ... | क. क्र. १५५ 'नाराच' व क. क्र. १५६ 'जननमरण' पहा! | ,, | १६२ वें. सालसा-नाराच. १५९ वें. | ... | ... | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळया | वृ. सं. | वृ. क्र. | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थल व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| — | ... | क. क्र. १५७ 'विबुधप्रिया' पहा! | १८ | १६३वें. हरिनर्तन-छंद—विबुधप्रिया... ... १६०वें. | | | |
| १८७ | १५९ | मेघविस्फूर्जिता- | १९ | १६४मेघविस्फूर्जिता—सुवृत्ता१६८वें. | ४ | १६ | |
| १८८ | १६० | माझी मराठी-मला. | ,, | १६५शार्दूल-विक्रीडित. | ५ | २० | राजहंस—अंक२शके१८५२ |
| १८९ | १६१ | व्यवहारमग्न-मनुजा. | ,, | ,, शा. वि. | ६ | २४ | तत्त्व—ज्ञानमंदिर अं.४३शके१८५१. |
| १९१ | १६२ | व्याख्यान | ,, | ,, शा. वि. | १० | ४० | |
| | | | ,, | ,, (वागेश्वरी विलास १२ शके १८५२.) | | | |
| १९३ | १६३ | तो माझा | ,, | ,, शा. वि. | ५ | २० | त. ज्ञा. |
| १९४ | १६४ | माझें मला ना मिळें ? | | ,, शा. वि. | ५ | २० | मं. अं.—४७वा. पौष शके१८५२ |
| १९५ | १६५ | जाणें कुणा कोण तो? | | १६५शा. वि. | ५ | २० | त. ज्ञा.- |
| १९६ | १६६ | वधुवरांस | | शा. वि. | ९ | ३६ | मं.अं.२ |
| १९८ | १६७ | सुमधुरा | ,, | १६६वें. सुमधुरा | ५ | २० | क्र.४६ |
| १९९ | १६८ | सुरसा | ,, | १६७,, सुरसा | ५ | २० | आश्वि.- |
| — | ... | क. क्र. १५९ 'मेघविस्फूर्जिता' पहा! | ,, | १६८सुवृत्ता—मेघविस्फूर्जिता१६४वें.... ... | | | १८५२ |
| २०० | १६९ | गीतिका | २० | १६९वें. गीतिका | ३ | १२ | त.ज्ञा.- |
| २०१ | १७० | सुवृत्त | ,, | १७०,, वृत्तम् | ५ | २० | मं.अं.२ |
| २०२ | १७१ | सुवदना | ,, | १७१,, सुवदना | ५ | २० | १९३० |
| २०३ | १७२ | नंदनवन | २१ | १७२,, धृतश्री— | ३ | १२ | |
| | | | | १७३,,पंचकावली | | | |
| | | | | १७४,,सरसी | | | |
| २०४ | १७३ | प्रभु येवढें करीं | ,, | ,, ,, | ५ | २० | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळ्या | वृ. सं. | वृ. क्र. व वृत्ताचें नांव. | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २०५ | १७४ | सर्वव्यापी असा तूं | २१ | १७५वें.स्रग्धरा | ५ | २० | |
| २०६ | १७५ | बहुरत्ना | २२ | १७६अमृतध्वनि | ७ | २८ | |
| २०७ | १७६ | बंधू ? | | ,, ,, | ८ | ३२ | यशवन्त |
| २०९ | १७७ | मंदारमाला | ,, | १७७अश्वधाटी- मंदारमाला १८० | ३ | १२ | मासिक- -अंक२३ १९३० |
| २१० | १७८ | काय कसें ? | ,, | १७८वें. उमा- मदिरा(१)१८१वें. | ९ | ३६ | |
| २११ | १७९ | भद्रक | ,, | १७९वें.भद्रक | ५ | २० | |
| — | ... | क. क्र. १७७ 'मंदारमाला'पहा! | ,, | १८०मंदारमाला- अश्वधाटी१७७ वें. | ... | ... | |
| — | ... | क. क्र. १७८ 'काय कसें ? 'पहा ! | ,, | १८१वें.मदिरा(१)- उमा १७८ वें. | ... | .. | |
| २१३ | १८० | वाक्सेवा | ,, | १८२वें हंसी (२) | ३ | १२ | |
| ,, | १८१ | अद्रितनया | २३ | १८३अद्रितनया- १८४अश्वललित. | ५ | २० | |
| २१४ | १८२ | मदिरा | ,, | १८५मदिरा(२)- | ८ | ३२ | |
| २१६ | १८३ | शारदारि | ,, | १८६ मदिरा- किंवा सवाई (१) | ४ | १६ | |
| २१७ | १८४ | कवि-रसिक | ,, | ,, ,, | ४ | १६ | |
| २१८ | १८५ | भार तुझ्यावरि | ,, | १८७सवाई दुसरी | ५ | २० | त. ज्ञा.- |
| २१९ | १८६ | माझा प्रभु | २४ | १८८ वें. तन्वी | ५ | २० | मं.अं.४ |
| २२० | १८७ | छाया | २५ | १८९वें. क्रौंचपदा | ५ | २० | वर्ष ११ |
| २२१ | १८८ | भुजंगविजृंभित | २६ | १९०,, भुजंग- विजृंभित. | ३ | १२ | १८५२ |

| पृष्ठ | क. क्र. | पाकळया | वृ. सं. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २२२ | १८९ | एकउत्तर | २७ | १९१वें. दंडक | ४ | १६ | |
| २२३ | १९० | आशंसाषट्क | ३० | १९२,, अर्णदंडक | ६ | २४ | |
| | | **अर्धसमवृत्तें.** | | | | | |
| २२५ | १९१ | विश्वाद्यानंग-क्रीडा. | ८/११ | १९३अनंगक्रीडा | ५ | २० | |
| २२६ | १९२ | अपरवक्र | ११/१२ | १९४अपरवक्र | ५ | २० | |
| २२७ | १९३ | गुर्जरउष्मा | इंद्रवज्रा उपेंद्रवज्रा | १९५आख्यानकी-उपजाती१९९वें | ५ | २० | |
| ,, | १९४ | सत्कृति | ,, | ,, ,, | ३ | १२ | |
| २२८ | १९५ | आपातलिका | ५/११ | १९६आपातलिका | ५ | २० | |
| ,, | १९६ | कर्तव्य | ५/१० | १९७उदीच्यवृत्ति | ६ | २४ | |
| २२९ | १९७ | कोण बरें? | ११/११ | १९८वें.उपचित्र | ३ | १२ | |
| — | ... | क क्र. १९४ 'सत्कृति'पहा! | इंद्रवज्रा उपेंद्रवज्रा | १९९उपजाति-आख्यानकी१९५वें. | ... | ... | |
| २३० | १९८ | स्वार्थ | १४/१६ | २००दक्षिणांतिका | ८ | ३२ | |
| २३१ | १९९ | सुखाचें मूळ | १२/१३ | २०१पुष्पिताग्रता | १५ | ६० | |
| २३२ | २०० | प्रवृत्तक | ९/११ | २०२वें.प्रवृत्तक | ५ | २० | |
| २३३ | २०१ | प्रभुची कृपा | ९/११ | २०३ प्राच्यवृत्ति | १० | ४० | |
| २३४ | २०२ | मणिमाला | ११/१२ | २०४मणिमाला(२) २०५माल्यभारा | ५ | २० | |
| ,, | २०३ | गुलाब | ११/१२ | ,, ,, | २५ | १०० | |
| २३७ | २०४ | विपरीता-ख्यानकी. | इंद्रवज्रा उपेंद्रवज्रा | २०६वें. विपरीता-ख्यानकी. | ३ | १२ | |

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळया | वृ. स. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २३७ | २०५ | नम्रता | १०/११ | २०७वियोगिनी-सुंदरी२०९वें. | १० | ४० | |
| २३८ | २०६ | वेत्रवती | —/१० | २०८वें.वेत्रवती | ४ | १६ | |
| — | ... | क.क्र. २०५ 'नम्रता' पहा! | १०/११ | २०९वें.सुंदरी-वियोगिनी२०७ | ... | ... | |
| २३९ | २०७ | केली-केली. | ८/१०, ८/१० = गु.१६/ल.३२ | २१०वें. सौम्या | ५ | २० | |
| २४० | २०८ | सुखदुःख | ११/१२ | २११हरिणीप्लुता | ११ | ४४ | |
| २४१ | २०९ | हरिणीप्लुता | ” | ” ” | १४ | ५६ | |
| २४२ | २१० | मरणींमर | ” | ” ” | १६ | ६४ | |

## :विषमवृत्तें.:

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळया | वृ. स. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४५ | २११ | विषमकाल | प्रथम चरण–स्वागता<br>द्वितीय”–माल्यभारा<br>त्रितीय”–शालिनी<br>चतुर्थ ”–इंद्रवंशा | २१२विषम | ३ | १२ | |
| ” | २१२ | उद्गता | —/११, १०/१३ | २१३वें.उद्गता. | ३ | १२ | |
| २४६ | २१३ | शिखा | १६/१६, —/१२ | २१४वें. शिखा. | ५ | २० | |
| २४७ | २१४ | अमरनगरसुख | १६/१६, १५/१३ | २१५वें.खजा. | ३ | १२ | |

## :मात्रावृत्तें.:

| पृष्ठांक | क. क्र. | पाकळया | वृ. स. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थ. व काल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २४८ | २१५ | प्रेमगान | १२/१२, १८/१५ | २१६वें.आर्या-गाथा(१)२२१वें. | ११ | २२ | |
| २४९ | २१६ | कालपूर | १२,२० | २१७वें.आर्यागीति | ६ | १२ | |
| २५० | २१७ | शाश्वत दे! | १२/१२, १५/१८ | २१८वें.उद्गीति. | ८ | १६ | |
| २५१ | २१८ | देवाचा खेळ | १२/१२, १५/१२ | २१९वें.उपगीति. | ६ | १२ | |

| पृष्ठ | क. क्र. | पाकळ्या | वृ. स. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थल व काल. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २५२ | २१९ | उपचित्रा | १६/१२, १६/— | २२०वें. उपचित्रा | ५ | २० | |
| २५३ | २२० | यत्स्फूर्ति | १६, १८ | २२१ औपच्छंदसिक | ५ | १० | |
| — | ...क.क्र.२१५ 'प्रेमगान' पहा! | | —/१, —/१५ | २२२वें. गाथा(१) आर्या २१६वें. | ... | ... | |
| ” | २२१ | नियंत्रण | १३/१३, १३/१८ | २२३वें. गाथा(२) | ३ | ३६ | |
| २५४ | २२२ | विश्वव्याख्या | १२/१२, १८/१८ | २२४वें. गीति | १० | २० | तत्व-ज्ञान मंदिर चैत्र १८५२. |
| २५५ | २२३ | श्रीप्रभुमहा-मंत्र आर्या | १२/१२, १८/१८ | ” ” | ४५ | ९० | श्री-माणिक प्रभु मासिक अ.२ वै.श. १८४५ |
| २५९ | २२४ | प्रभुची ओढ | १६, १६ | २२५ पज्झटिका | १० | ४० | त.ज्ञा. मं.अं.४ चै. १८५३ |
| २६० | २२५ | तत्त्वज्ञान | १६, १६ | २२६ पादाकुलक | ४ | १६ | |
| ” | २२६ | दिनचर | १४, १६ | २२७वें. वैतालीय. | ५ | १० | |

## —: प्राकृत वृत्तें. :—

| पृष्ठ | क. क्र. | पाकळ्या | वृ. स. | वृत्त क्र. व वृत्ताचें नांव | श्लो. सं. | च. सं. | प्र. स्थल व काल. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २६१ | २२७ | गंगाकल्याणाची | | २२८ मोठा अभंग- प्रकार पहिला. | ५ | २० | |
| ” | २२८ | यश लाभे त्यास | | २२९वें. ” दुसरा. | ५ | २० | |
| २६२ | २२९ | दीपावली | | २३० लहान अभंग- प्रकार पहिला | ५ | १० | |
| २६३ | २३० | भाऊ बीज | | ” ” ” | ५ | १० | |
| ” | २३१ | सर्णे लोपलीं | | २३१, प्रकार दुसरा | ३ | ६ | |
| ” | २३२ | आजकाल | | २३२ ” तिसरा | १ | ४ | |
| २६४ | २३३ | देवाचें स्थान | | २३३वें. ओवी. | ५ | २० | |
| ” | २३४ | ध्येय | | २३४वें. दिंडी. | ५ | २० | |
| २६६ | २३५ | दैन्य न गेलें कांहीं | | २३५वें. साकी. | ५ | ३० | |
| २६७ | २३६ | येवढें झाणिं द्यावें | | २३६वें. घनाक्षरी. | ४ | १६ | |

कविता संख्या “२३६”—श्लोकसंख्या “१७३९”—चरणसंख्या “६७३८”

॥ श्रीसद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

# वाचनापूर्वी.

छंदः पादौतु वेदस्य हस्तौकल्पोऽथ पठ्यते ॥
ज्योतिषामयनंचक्षु निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥
शिक्षा घ्राणंतु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् ॥

काव्य-कुसुम-कलिका द्वितीय-उद्भव या ग्रंथाची रचना, संपूर्ण उपलब्ध वृत्तांतून (मराठी) कविता लिहिण्याचा उद्देश मुळाशीं धरून केली आहे. तेंव्हां या परिश्रमांत ज्या अडचणी आल्या व ज्या प्रक्षिप्त राहिल्याशा वाटल्या, त्या सांगितल्याखेरीज ग्रंथाची परिपूर्तता सांगतेनें होणार नाहीं, म्हणून त्या गोष्टीचा खुलासा करणें आवश्यक आहे; पण तत्पूर्वी छंद व वृत्त याचा विचार करूं.

आर्यांचें आद्य वाङ्मय छंदोबद्ध आहे. तें तसें कां? याचा विचार केल्यास, आद्यतत्वाचें स्वरूप "रसो वै सः" असें आहे हें दिसून येईल. रस व नाद एकरूप आहेत. नादांत जी तल्लीनता प्रतीत होते तीच रसांत आहे. अर्थात् रस व नाद अभेद स्वरूपांत आहेत. नादालाच 'ध्वनि' ही संज्ञा आहे. काव्यक्षेत्रांत रससांप्रदायी व ध्वनिसांप्रदायी असे दोन पक्ष दिसून आले तरी तात्विक विचारानें त्याची एकवाक्यता होणारच नाहीं असें नाहीं "वाक्यं रसात्मकं काव्यम्" या साहित्यदर्पणांतील काव्यलक्षणेनें दोहोंची संगति व्यवस्थित लागते व हे दोघेही काव्यांगणीं गुण्यागोविंदानें नांदतात. नादब्रह्म समष्टि असल्यानें व्यष्टिस्थित चैतन्याचा तोच भाव असणें यथाक्रम आहे; म्हणूनच प्रत्येक जीव नादानें आनंदित होतो. नाद हा जीवनाधार आहे ही गोष्टहि अनुभवसिद्ध आहे. मानवी प्राणी तर असो पशु-पक्षादि जीव आपलें नैसर्गिक गुणगुणणें सोडून जिवंत

राहूं शकणार नाहींत. ज्याच्या नादानें निसर्ग निनादित होतो त्याची अव्याप्ति कोठेंच नाहीं. तेव्हां हा सर्वगत नाद शास्त्रीय परिभाषेंत बसविण्याचा जो क्रम, जी पद्धत त्यासच **छंदशास्त्र** म्हणतात. "**म्यरस्तजभ्नगैर्लान्तैरेभिर्दशभिरक्षरैः ॥ समस्तं वाङ्मयं व्याप्तं त्रैलोक्यमिव विष्णुना ॥**" ( छंदशास्त्राचे आद्याचार्य यद्यपि नव्हेत तरी तो मान ज्याला मिळाला ते म्हणजे **पिंगलमहर्षि** होत. )

छंद् शब्दाचा अर्थ तोषविणें, "हंसणें" म्हणजे आनंदित होणें असा होतो. (कुठल्याशा इंग्रज ग्रंथकारानेंहि Laughter is Life असें म्हटले असल्याचें आठवतें) व हा आनंद नादस्वरूप असल्यानें त्याची प्रतीति वरचेवर घेतां यावी म्हणून छंदशास्त्राची योजना आहे. भाषा तयार झाल्यावर भाषेच्या ठराविक प्रयोगानें जो भाव उदित होतो तोच भाव पुन्हा उद्दीपित करावयाचा झाल्यास पूर्वोच्चारित शब्दप्रयोगाचेंच पुनरुच्चारण करावें लागेल व तो तसा उच्चारतां येण्यास नुसतें भाषाविषयक ज्ञान उपयोगी पडणार नाहीं. त्याला व्याकरणाची जोड पाहिजे. व्याकरणाच्या योगानें दोन गोष्टी उलगडतात. प्रथम, झाला तो प्रयोग कसा झाला, त्याचें कर्ता, कर्म, क्रियापद कसें होतें, नंतर झाला तो प्रयोग शुद्ध होता कीं नाहीं, या दोहोंचा व्यवस्थित क्रम ध्यानांत आला व याची कारणमीमांसा मनास पटली म्हणजे मग तोच प्रयोग वरचेवर, वाटेल तेव्हां करतां येतो; आणि असा करतां आला म्हणजे आनंदप्राप्तीच्या नैसर्गिक प्रवृत्तीमुळें तो आनंद पुनः पुनः अनुभवण्यास सांपडतो. हाच प्रकार छंदशास्त्राचा आहे. छंदशास्त्रांत सांठलेलें काव्य विभावानुभावस्थायीभाव व व्यभिचारीभावरूपतेनें टिकूं शकतें, व सारखा आनंद देतें. (वेदांत छंदास किती महत्व आहे हें नव्यानें सांगणें नको.) वेदाची संहिता उदात्त, अनुदात्त आणि स्वरित स्वरानें कोरीव व अभेद्य झाली आहे, आणि या स्वराच्या योगानें वेदमंत्रांतील निनादौघ सारख्या प्रमाणांत स्रवत

असतो. हाच निनाद सामवेदांत आंदोलनात्मक असल्यानें जास्त अभिश्रवणीय वाटतो. हीच परंपरा वाङ्मयकालांत रूढ झाली म्हणून संस्कृतातील सर्व रचना पद्यमय आहे. आंदोलनात्मक निनाद वाक्यरचनेंतून कमी होत चालला आणि अर्थविकासास्तव शब्दयोजना अधिक चालू झाली म्हणजे पद्यच गद्यरूपांत परिणित होत जातें. याची परिसीमा म्हणजे आजचें गद्य होय. उदाहरणार्थ, शार्दूलविक्रीडितयादि अक्षरवृत्तांच्या मानानें ओवी कांहीं अंशीं गद्यमयांत मोडूं शकेल गद्यापेक्षां पद्य आठवण्यास सोपें, फिरून म्हणण्यास उत्साहक व ध्यानांत ठेवण्यास सोयिस्कर हा वाचकांचा, आणि थोडक्यांत बव्हर्थप्रतिपादन हा लेखकांचा व्यावहारिक फायदा आहे तो निराळाच. शिवाय आज जी मुद्रणसुलभता व इतर टिकाऊ लेखनसाधनें उपलब्ध आहेत तितकीं प्राचीन काळीं नसल्यामुळें वाङ्मय मुखोद्गत ठेवणें आवश्यक झालें; आणि यामुळेंच त्या काळीं काव्यनिर्मितीच अधिक फलदायी झाली. म्हणून बोलावयाचें तें गद्यांत पण लिहावयाचें तें पद्यांतच, असा प्रघात पडला. पद्य लिहावयाचें तेव्हां त्यास छंदशास्त्राची, जरूरी पडली, व संस्कृतांत छंदशास्त्राची सर्वांगीण पूर्णता झाली आहे. असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. संस्कृत वाङ्मयांत जितकें पद्यवैपुल्य, तशींच जितकीं वृत्तें आहेत तेवढीं इतरत्र सांपडणें शक्य नाहीं. ही गोष्टही पण तितकीच निर्विवाद आहे.

छंद आणि वृत्त हें यद्यपि दोन्हीं एकच म्हटलें जातात तरी पण यांत तारतम्य असें आहे कीं, छंद हें कुल असून वृत्त जातिविशिष्टभाव दाखविते. (१) उक्ता. (२) अत्युक्ता. (३) मध्या. (४) प्रतिष्ठा. (५) सुप्रतिष्ठा. (६) गायत्री. (७) उष्णिक्. (८) अनुष्टुभ्. (९) बृहती. (१०)पंक्ति. (११) त्रिष्टुभ्. (१२) जगती. (१३) अतिजगती. (१४) शक्करी. (१५) अतिशक्करी (१६) अष्टि. (१७) अत्यष्टि. (१८) धृति (१९)-

अतिधृति. (२०) कृति. (२१) प्रकृति. (२२) आकृति. (२३) विकृति. (२४) संस्कृति. (२५) अतिकृति. (२६) उत्कृति. असें २६ छंद आहेत. या नंतर २७ अक्षरी दंडक ३० अक्षरी अर्णदंडक नामक वृत्त आहेत. एक वृत्त तर द्विनयनपंचादशराधिकान्वित ५१ अक्षरांचेंही संस्कृतांत दिसून आलें. उदाहरणार्थ त्याचें १ चरण खालीं देत आहे:—

"प्रचलितकरिकृत्तिपर्यंत चं चं नखाघात भिन्नेंदुमानामृतश्चोतजीवत्कपालावली मुक्तचंडाट्टहासत्रसद्भूरिभूतप्रवृत्तस्तुति ॥"

पण २७ अक्षरापासून छंदनाम मात्र "उत्कृति" नंतर एखादेंही उपलब्ध नसल्यामुळें २७ पासून ९९९ अक्षरापर्यंत सर्वांचा समावेश दंडक वृत्तांतच होतो. म्हणून २७ व ३० अक्षरी अशा दोनच कविता उदाहरणार्थ दिल्या आहेत. या उपलब्ध ३ वृत्तावरून फक्त इतकें दिसून आलें कीं, ९९९ पर्यंत गणनात्मकलक्षणा पद्धत सारखीच असून ' रगण ' मात्र वाढत जाणार.

या शिवाय अर्धसमवृत्तें, विषमवृत्तें, मात्रागणवृत्तें व प्राकृतवृत्तें इत्यादि निरनिराळे प्रकार आहेत. एकूण १८८ वृत्तें आहेत व ४८ वृत्तें अशीं आहेत कीं, जीं नामभेदानें पृथक् दिसतात खरीं पण लक्षणादृष्टीनें द्विरुक्त ठरतात. हीं वृत्तें मिसळलीं तर एकूण २३६ वृत्तें होतात. हीं समजण्यास अडचण पडूं नये म्हणून ग्रंथाच्या शेवटीं वृत्ताक्षरसंख्यानुक्रमसूची वृत्तक्रमांक, वृत्तांची नांवें, वृत्तलक्षणा, अक्षरसंख्या ग्रंथाधारासह दिली असून कोणतेंही वृत्त सुलभरीतीनें समजून चट्कन् काढतां यावें म्हणून आद्याक्षरसंख्यानुक्रमसूची गणलक्षणा, वृत्तक्रम, अक्षरसंख्या व ग्रंथाधार यांसह दिली आहे. दोहोंतही शेवटीं ग्रंथांतर्गत कविताक्रमांक व व कवितांचीं नांवेंही दिलीं आहेत. या परिश्रमाचा जिज्ञासूंनां सुगमता प्राप्त व्हावी येवढाच हेतू आहे. कांहीं कवितांचा विषयसुद्धां वृत्तनामाच्या अर्थानुरोधानें घेतला आहे व तेंच नांव त्या त्या कवितेस दिलें आहे

क्वचित् प्रसंगीं प्रत्येक श्लोकांतही हा मुद्रालंकार साधला आहे.

छंदशास्त्रांत प्रामुख्यानें वृत्तांची माहिती असावी लागते. येरव्हीं काव्यशास्त्राची पूर्णता होणार नाहीं कारण प्रतिभा ही अमुक प्रकारची, विशिष्ट क्रमानीं गुणगुणली जावी असा निर्बंध घालतां येत नाहीं. काव्याचा ओघ अबाधित व अनिरुद्ध होण्यास वृत्तांची जरूरी बव्हंशीं आहे. गायकानें एखादी ठराविक चीज गातांच ती अमुक रागांतली आहे असा नुसता नामनिर्देश करणाऱ्यापेक्षां कंठांतून निघालेला कोणता विवक्षित स्वर कोणत्या रागाचा द्योतक आहे व कां आहे, आणि तो कोणत्या रसाला परिपोषक आहे हें शास्त्रीयपद्धतीनें सांगणारा जास्त तज्ज्ञ किंवा विद्वान् ठरेल. हाच न्याय काव्यासंबंधीं लावतां येईल; पण काव्यशास्त्राचा विचार करावयाचा म्हटल्यास छंदोबद्धपद्धतीनें गुणगुणले जाणारे काव्यात्मक ध्वनि कोणत्या वृत्तांत बसतात हें पाहणें प्रतिभेच्या संवर्धनास जास्त हितकारक आहे. गायकाच्या स्वरसंवेदनेस तालानें जसा स्थायीभाव येतो, तद्वत् वृत्ताच्या अव्याहत सहचारित्वानें काव्यास स्थिरता प्राप्त होते व या स्थिरतेमुळें मूळ रसाचा आस्वाद अधिक घेतां येतो. तालांत जसा प्रस्तारक्रम आहे तसाच तो वृत्तांतही आहे. ताल व वृत्त एका अर्थानें एकरूपच आहेत असें म्हटल्यास चालेल. ताल म्हणजे एक कालप्रमाणनिदर्शक लघ्वाघातध्वनीच होय व वृत्तांत देखील कालाचें महत्त्व ताला येवढेंच आहे. प्रस्तारक्रम जो करून ठेवला आहे तो बुद्धीस चाणाक्षता येण्याकरितांच आहे. एका आकड्याचा प्रस्तार गणितशास्त्रांत जसा होतो तसाच तो ताल व वृत्त या शास्त्रांतही होतो. तालप्रस्तारांत जशा तिस्र, चतस्र, खंड, मिश्र, संकीर्ण इ. जाती आहेत व त्याचा प्रस्तार काढण्याचा जो क्रम आहे तोच वृत्तास लागूं असून नष्टोद्दिष्ट काढण्याची पद्धतही पण एकच आहे. नष्ट म्हणजे हरवलें आहे, ज्याचें विस्मरण झालें आहे तें कोणतें हें उमजणें व जें उद्दिष्ट म्हणजे

हवें कोणतें, तें शोधून काढण्याचा ताळेबंद दोहोंचा सारखाच बसतो' ताल जसा स्वराचें अनुगामित्व करीत असूनही विवक्षित स्वरास ठराविक वेळेस प्रतिगामित्व करावयास लावतो, तद्वत् प्रतिभेचे अनुगामित्व वृत्ताकडून होते. ज्योतिषशास्त्रांत आधानकाल काढण्याचें गणित आहे. त्यांत जन्मकालीन ग्रह, तत्पूर्वीच्या ( नऊ महिन्याच्या पूर्वी ) जेव्हां समकला येतात तो आधानकाल समजावा. "पूर्णेंदुकला जाता तदाधान उच्यते" व आधान साधलें तरच कुंडली शुद्ध होऊन शास्त्रीय आनंद प्रतीत होतो. तद्वत् ताल, स्वर व प्रतिभा प्रमाणबद्ध स्थितींत आले असतां अभिजातानंदानुभव प्राप्त होतो. असा आनंद विविधतेनें घेतां यावा म्हणून वृत्तप्रस्ताराकडे साहजीक प्रवृत्ति होते. वृत्ताचा प्रस्तार कसा करावा याची माहिती येथें देणें जरूरीचें असलें तरी तो ( अगदींच ) शास्त्रीय विषय आहे व त्याची संपूर्णरीतीनें चर्चा केल्याशिवाय नीटशी समजणार नाहीं म्हणून विस्तारभयास्तव तो मोह आवरतां घेणें भाग आहे. संक्षेपतः, उदारणार्थ तीन अक्षरांचा विस्तार करूं गेल्यास

SSS
ISS
SIS
IIS
SSI

असा होईल, पण तोच २१ अक्षरीं 'स्रग्धरा' वृत्ताचा प्रस्तार पाहूं गेल्यास त्याची लघुगुरुक्रमसंख्या कोटीच्याही पुढें जाईल. अस्तु. येथें एक गोष्ट अवश्य उद्धृत करावीशी वाटते कीं, काव्यशास्त्रांत कवितेचा सर्वव्यापी संचार शास्त्रीयमर्यादेच्या बाहेर जाऊं नये म्हणून श्रमपूर्वक काळजी घेतली आहे तरी यांत प्रस्तारमानानें कोट्यावधी संख्येपर्यंत वृत्तांची मजल जात असतां, अशा भरपूर शास्त्रार्शी विन्मुख होऊन, या अतुलरत्नभांडाराकडें पाठ करून परक्या गजल-चालीच्या कवड्या गोळा करण्याचा व गजलांना बळजबरीनें आपलीशी करण्याचा मोह धरावा व ज्या चाली रीतीस काव्यशास्त्रांत यद्यपि शास्त्रीय एखादें नांव नसलें तरी रूढींतून क्वचित् स्वजातीय नांव सुद्धां अढळतें तिकडें दुर्लक्ष करून बोजड नांव

धारण करावें म्हणजे दुराग्रहच नव्हे का? उदाहरणार्थ:—गजलाच्या अनेक चाली आहेत त्यांचीं नांवेंहि "बहुरुल्उरूज्" नामक ग्रंथांत निरनिराळीं आहेत तरी पण चालीच्या जागीं फक्त 'गज्जल' (तेंही सरळ 'गजल' असें मूळेंच नांव असतांनां "ज"ला द्वित्त करून त्याचें जें विकृत-स्वरूप ) या त्र्यक्षरी नांवावरच कविता दिली जाते. याच गजला पैकीं एका चालीवर श्रीमन्मयूरपंतानीं एक पद लिहिल्यावरून त्याचें "रसना" असें नांव प्रचारातसुद्धां असतांनां हेंच नांव चालू ठेवण्याकडे प्रवृत्ति राहिली असती तर बरें झालें नसतें काय? "गज्जल" या बोजड नांवा-पेक्षां "रसना" हें नांव किती गोड दिसते! अशा कांहीं कांहीं नांवानें विद्यमान कविही केव्हां केव्हां कविताहि पण देत असतात. तेव्हां इकडें लक्ष जाण्याची प्रवृत्ति या पुस्तकानें झाल्यासहि बरेंच श्रम कारणीं लागलें असें होईल.

प्रस्तारकामधेनु आमच्या काव्यांगणांत प्रत्यही वावरत असल्यानें, वाटेल ती आवडीची चाल—थोड्या बहुत फरकानी कां होईना पण—याच प्रस्तारांतून आपल्यास सहज मिळवितां येईल; पण दोहनप्रवृत्तीच नस-ल्यास रितें भाजन शेळी—बकरीच्या दुधानें अर्धे मुर्धेच भरण्यांत समा-धान वाटूं लागेल तर शुद्ध व निर्मळ गोरसाची चवही भावी कालांत अजिबात् विसरून जाऊं.

कालनिदर्शकत्वसामर्थ्य वृत्तांत आहे असें वर सांगीतलेंच आहे.त्यांतच काल, मार्ग, क्रिया, अंग, ग्रह (अवसान), जाति, कला, लय, यति आणि प्रस्तार असे त्याचे दश प्राणही पण आहेत. "कालोमार्गक्रियां-गानि ग्रहा: जाति कला लय: ॥ यति प्रस्तारकश्चैव दशप्राणा: प्रकीर्तित:" यावरून दिसून येईल कीं काव्यास नुसत्या एका वृत्ताचीच जरूरी आहे इतकेंच नसून, त्याचे हे दहाचे दहा प्राण सुद्धां

अत्यंत काळजी घेऊन समानत्वानें रक्षणें अत्यावश्यक आहे. "यतिभंग" हा देखील अक्षम्य दोष गणला गेला आहे. निर्दोषकत्व अंगीं बाणण्यास आवश्यक तेवढी काळजी घेतल्यावाचून गत्यंतर नसतें. अशामुळेंच कीं काय, छन्दोबद्ध कविता करणें म्हणजे अनेक लोढणीं सुखासुखी गळ्यांत अडकावून घेणें व सरसार्थ कविताक्षेत्रात अडचणीचे कन्टक मुद्दाम विकत घेऊन पसरून ठेवण्याप्रमाणें समजलें गेलें, आणि म्हणूनच, इकडला प्रवृत्त्यौघ अजिबात् फिरला व काव्यदेवीच्या नियमबद्ध निसर्गरम्यमूर्तीस तिच्या आधुनिक भक्तांनीं कधीं सहारासारख्या रुक्ष वाळवन्टांतून तर कधीं हिमप्रपातप्रदेशांतून फिरवून आणू लागले. सौंदर्य किंवा माधुर्याधिकत्व तेंच म्हणविलें जातें जें इतराना लोभवूं शकतें, आणि जिथें तिथें आपलेंच अनुकरण करावयास लावतें. हें संस्कृताचें त्रिकालाबाधित अभिजातैश्वर्य, जगन्निदर्शनास आलें असतांही तिच्याच अपत्यांनीं भलतीकडे गुंगत रहावें हें स्वतःच्या पदरीं अमूल्य अशीं अनेक रत्नें ठेवून शुक्ति–म्हटल्यापेक्षां दूर पडलेल्या पांढऱ्या कागदाच्या तुकड्याकडे–रजत समजून धांव घेण्यासारखें होय.

अशा प्रसंगीं आपल्या स्वतःच्या सरावांतल्या आवडीच्या वृत्तांतून ( गतानुगतिकपद्धतीनें ) कवितागायनानें काव्यानन्द घेण्याचें सोडून सर्व वृत्तांतून कविता करण्याचा पतकर कां घेण्यांत आला यासंबंधीं आपलें हृद्गत सांगून, हें प्रकरण आटोपतें घेऊं. प्रथमतः असा प्रयत्न महाराष्ट्रभाषेंत कोणी केला नाहीं असें यद्यपि म्हणविलें जाणार नाहीं, तरी एकाच व्यक्तीनें सुरवात केलेली माला तत्कालोपलब्ध वृत्तसुमनें संपेपर्यंत गुंफण्याची चिकाटी चालू ठेविली असती, तर आपादमालिका श्रीमहाराष्ट्रसरस्वतीच्या कन्ठांत–रुळावितां आली असती हें वस्तुस्थितिदिग्दर्शनास सोडून नाहीं. संस्कृतांतून वृत्ताच्या कविता वृत्तलक्षणेसह दिलेल्या आहेत व प्राकृतांत असें अवघड व कष्टद कार्य पूर्णा-

शानें सिद्धीस नेण्याचा विशेष विचार झाला नाहीं. तरी पण कविवर्य श्री. **रामजोशी** यांनीं असा क्रम धरून **छन्दोमन्जरींत** ९४ + [ परिशिष्ट ] २=९६वृत्तें संपादिलीं आहेत. ज्यांत वे.शा.सं. रा.**रंगाचार्य रड्डी शास्त्री** यांनीं उपोद्घात, टीपा व प्रस्तारादिकांचें भाषातरात्मक विवेचन—हीं जोडून श.१८३५मध्यें प्रसिद्ध केलें आहे, त्यांतून एक एक श्लोकही दिला आहे. हा क्रम कदाचित् त्यांनीं आपल्या गुरुवर्याकडून घेतला असावा, कारण कविवर्य श्रीमन्मयूरपंतानींही अशा प्रकारचा प्रयत्न केला असून बरींच वृत्तेंहि त्यांनीं संपादिलीं आहेत, व अशा वृत्तांत मराठींत कांहीं कांहीं एकश्लोकी तर कांहीं ६०, ७०, १०० वर श्लोकात्मक कविता लिहिल्या आहेत. पंतांचें सहजौघी भाषाप्रभुत्व, अनिरुद्ध काव्यसंचार व त्यांच्या कवितेंत प्रामुख्यानें व्याकरणाची सर्वशः वाहलेली काळजी निर्विवाद असून त्यानां सर्व वृत्त संपादणें अशक्य होते असें नव्हें; पण महाभारत-भाषांतरासारख्या महत्त्वाच्या कामापुढें या शास्त्रीय किचकट कामाकडें त्यांचें लक्ष वेधलें गेलें नसावें. किंबहुना "**भीष्मत्कृत श्रीकान्तस्तुतिच्या रीतीस वृत्त जरि तेंच ॥ अवलंबावें तरि तें अडचण कांहींतरीहि करितेंच ॥** " असा पंतांनींच हें काम कठीण असल्याचा दाखला दिला आहे.

वर दर्शविलेंच आहे कीं, वृत्ताच्या योगानें प्रतिभा त्रुटित, बद्ध किंवा विकारी होत नाहीं. प्रतिभा स्वतंत्र आहे, ती ज्या संवेदननें प्रस्फुरित होईल त्या संवेदनाची लक्षणा वृत्तानें परिबद्ध झाल्यानें तिची शोभा अधिकाधिक वृद्धिंगत होते. खाणींत सांपडलेला हिरा अमुक आकाराचा असावा, अथवा तो ज्या खाणींतला आहे ती खाण अमुक मर्यादेनें विविक्षित स्वरूपाची असावी असा निर्बंध घालतां येत नाहीं; पण तो हिरा हस्तगत केल्यावर त्याचा आकार, त्याचें वजन, तेज पारख्याकडून ठरविल्यावरच त्याची किंमत ठरतें. हाच प्रकार प्रतिभा व वृत्त याचा

आहे. निसर्गसुंदर स्त्री अलंकारानें वाईट दिसतें असें ज्यांना म्हणावयाचें आहे त्यानांच वृत्ताच्या योगानें प्रतिभा जखडली जाते असें म्हणणें शोभेल. व एका अर्थानें अनेकांची संकोचता म्हणजेच एकाचा उत्कर्ष असें म्हणतां येईल; पण ही क्रिया तशा प्रकारची नसून, उत्तेजकभावाची म्हणजे दूध साखर या प्रमाणें आहे. मराठींत निर्यमक, निर्वृत्त ( चालीवरील ) कविता करावी कां करूं नये हा एक प्रचलित वाद आहेच. त्याचा निकाल कसाही लागो, पण निर्वृत्त कविता करतांच यावयाची नाहीं—हें विसरून चालावयाचें नाहीं; कारण प्रस्तारकोशागारांत शिरल्यास कसल्याही चालीस थोड्या बहुत फरकानें एखादें शास्त्रीय नांव देतां येईलच. प्रतिभा तर मूळ अधिष्ठान आहे. जसें प्राणधारणेस श्वास आवश्यक आहे; पण नित्याच्या २१ हजार ६०० श्वासा (वृत्त, ताल, काला)चा क्रम सोडून निरंकुश धापा येऊं लागल्या तर तो कासश्वास होतो. पहिला वृत्तबद्ध श्वास जिवनपरिपोषक व आनंदास कारणीभूत होतो, तर दुसरा मात्रेची वाट पहात निराळाच रस उत्पन्न करतो. मात्रा बरोबर आणि वेळेवर पडल्यासच श्वासाचें वृत्त सांवरलें जातें. व नियमित वृत्तांतच काव्यजीवनाचा आनंद घेण्यास पात्र होतो. नसता निर्वृत्त होतो. अशी निर्वृत्ति कोणासच नको आहे. तात्पर्य वृत्त हें प्रतिभेस रोधन करणारें नसून तिची वस्तुस्थिति कायम ठेवणारा जीवनावश्यक श्वास किंबहुना तिचें सौंदर्य वृद्धिंगत करणारा, सातत्यानें काव्याचा रस भंग न होऊं देणारा, काव्याचे वैभव दर्शित करणारा चिरस्थायी सहचारी प्राण आहे. व हा अंतर्बहिश्चर प्राण निघून गेल्यास कविता निर्जीव झाल्याशिवाय रहाणार नाहीं. प्रतिभेंत नादलुब्धावलंबन केल्याशिवाय तिला स्थायीभाव जसें प्राप्त होत नाहीं तद्वत् मधुरध्वनींत चित्ताकर्षकता असते तर तालांत(वृत्तांत)चित्तमग्नता प्रतीत होते.प्रतिभामंदिराचें जोतें म्हणजे वृत्त होय.

रसासंबंधीं म्हणावयाचें म्हटल्यास रसानुकूलता वृत्तास जशी परिपोषक असते तशी त्याची प्रतिकूलता वृत्तास मारक व्हावयास पाहिजे; पण विरुद्धरससंमिश्रणानें तिसराच एक रस उत्पन्न होतो. तोही वृत्तास उलट परिपोषकच आहे असें ठरते, म्हणून अमुक वृत्त अमुक रसास अप्रतिहत अनुकूल आहे असें या आज कालच्या विविधरससंमिश्रित चारचरणात्मक श्लोकात सुद्धा ज्याची मनें नितात रमतात त्यांच्यामतें कालौघाप्रमाणें आवडहि बदलत जाते. तेव्हां शास्त्रीय जुने प्रचारही बदलण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. त्यांनां यासंबंधीं अमुकच निर्बंध सर्वांनीं पाळला पाहिजे असें कोणीच म्हणूं शकणार नाहीं. तसा यत्नहि यद्यपि कोणी तसाच संशक्त करूं म्हटल्यास जनताप्रवृत्तिही ध्यानांत घेणें त्यास भाग पडून धरलेल्या हट्टांत शैथिल्य आपोआपच स्वीकारावें लागेल. या दृष्टीनें तशी आकांक्षा देखील आम्हांस अभिमत नाहीं, तरी पण असला प्रश्न निदान उहापोहांत पुढें मागें यावा अशी प्रवृत्ति झाल्यास काव्य जास्त चिरायु आणि सर्वमान्य होऊं शकेल. अस्तु.

शास्त्रीयदृष्ट्या विद्वज्जनांनीं अमुक रसास अमुक वृत्तें अनुकूल आहेत असें जें ठरविलें आहे.त्याचें तरी अल्पांशीहि अनुगमन करण्याची व विचारांत घेऊन वागण्याची प्रवृत्ति आमच्यांत दिसून येत नाहीं. जेथें ८ रसही अपूरे वाटले, ९ वा शांतरस घ्यावासा वाटला, तोही अपुरा ठरून वत्सलरस हा १० वा वाढवूनहि अद्याप तृप्ति नाहीं म्हणून भक्तिरसही यांत शिरला. थोड्याच कालानें १२ वा रसही यांत जरूर उडी घेईल व रसलौल्यास तो घ्यावासा वाटणार तेथें वृत्तांची आणि रसांची जोडी कायम ठेवण्याकडे कां प्रवृत्ति नसावी, असें एखाद्यास वाटणें साहजीक आहे. वचन आणि ग्रंथाधार हुडकूं गेल्यास, तिकडूनही या बाबतींत हिरमुसलें परतावें लागते असा अनुभव या रसशोधनाच्या मार्गांत येऊं लागतो. खालील कोष्टका- वरून रसाच्या परिपोषास्तव एकच वृत्त कसें घेतां येत नाहीं हें दिसून

येईल. प्रस्तुत ग्रंथांत जसा मुद्रालंकार सांभाळण्याचा विशेष प्रयत्न केला आहे तसा यत्न विशिष्ट रसास अनुकूल असलेल्या विशिष्ट वृत्तांतून कविता रचण्यांत जरी केला नसला, तरी अल्पशः असा रसपरिपोषक यत्नही कांहीं कांहीं वृत्तांतून केला गेला आहे. उदाहरणार्थ—"मनाचे मांडे" (पृ. ५७) ही कविता खालील कोष्टकांतील हास्यारसानुकूल 'दोधक' वृत्तांत केली आहे. तसेंच 'उमा' 'मदिरा' 'सवाई' हींहि वृत्तें त्याच "प्रतिपदीं विच्छेद पावणं" अशा लक्षणेनीं युक्त असल्यामुळें त्यांतूनही "काय करूं " (पृ. २१०) "मदिरा" (पृ २१४) "शारदारि" (पृ. २१६) इ. हास्यरसात्मक कविता आणि करुणरसात्मक 'पुष्पिताग्रा' 'मालिनी' वृत्तांतून "सुखाचें मूळ" (पृ. २३१) "धनमद" (पृ. १४४), शांतरसात्मक 'शिखरिणी' व 'मंदाक्रांता' वृत्तांतील "वियोगी" (पृ. १७६) "धन्य ती धन्य भक्ति" (पृ. १६९) इ. कविता मुद्दाम लिहिल्या आहेत; परंतु असें वृत्त आणि रस यांच्या परस्परानुकूलतेचें सातत्य कां चालू ठेवलें नाहीं—किंवा ठेवतां आलें नाहीं—हें वर निर्देशिलेल्या अडचणीवरून व खालील कोष्टकावरून लक्षात येईल.

| क्रमांक. | रस. | अनुकूल वृत्तें. | प्रतिकूल वृत्तें. |
|---|---|---|---|
| १ | शृंगार | शार्दूलविक्रीडित, वसंततिलका, पृथ्वी, हरिणी, शिखरिणी, मंदाक्रांता, मालिनी, स्रग्धरा, इंद्रवज्रा, रथोद्धता, द्रुतविलंबित, इत्यादि. | पथ्या. इत्या. |
| २ | हास्य | दोधक, तोटक, भुजंगप्रयात, इ. जीं प्रतिपदीं विच्छेद पावणारीं तीं. | पृथ्वी इ. |
| ३ | करुण | मंदाक्रांता, पुष्पिताग्रा, मालिनी, द्रुतविलंबित, इ. | दोधक इ. |
| ४ | रौद्र | हरिणी, शा. वि. स्रग्धरा, रथोद्धता, अनुष्टुभ्, इ. | शिखरिणी इ. |

| क्रमांक. | रस. | अनुकूल वृत्तें. | प्रतिकूल वृत्तें. |
|---|---|---|---|
| ५ | वीर | इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, वंशस्थ, शा. वि., शिखरिणी, स्रग्धरा, इ. | प्रहर्षिणी, मालती इ. |
| ६ | भयानक | स्रग्धरा, शा.वि., 'शाक्वर', पथ्या, इ. | |
| ७ | बीभत्स | शा.वि , स्रग्धरा, वंशस्थ, रथोद्धता, इ. | मंदाक्रांता. |
| ८ | अद्भुत | शा.वि., नंदिनी, " कुसुमविचित्रा, " शालिनी, स्वागता, उपचित्र, वसंत तिलका, इंद्रवज्रा, इ. | शिखरिणी इ. |
| ९ | शांत | शिखरिणी, मंदाक्रांता, शा. वि., इ. | कुसुमविचित्रा इ. |

## रसाच्या विरोधाचें कोष्टक.

| क्रमांक. | रस. | विरुद्धरस. | कोणता रस-उत्पन्न होतो ? |
|---|---|---|---|
| १ | शृंगार | करुण, बीभत्स, रौद्र, वीर, भयानक. | हास्य. |
| २ | हास्य | भयानक, करुण. | ...... |
| ३ | करुण | हास्य, शृंगार, भयानक, अद्भुत. | करुण. |
| ४ | वीर | भयानक, शात. | अद्भुत. |
| ५ | भयानक | शृंगार, वीर, रौद्र, हास्य, शांत. | ...... |
| ६ | बीभत्स | शृंगार. | भयानक. |
| ७ | अद्भुत | रौद्र. | ...... |
| ८ | शात | वीर, शृंगार, रौद्र, हास्य, भयानक. | ...... |

शृंगार–बीभत्स, वीर–भयानक, रौद्र–अद्भुत, हास्य–करुण, हे रस परस्पर वैरी आहेत–असेंही शृंगारतिलकांत सांगितलें आहे.

वृत्तासंबंधींही प्रसंगोपात् दोषाविष्करणहि करून दाखविल्यास प्रत्यवाय नाहीं–उदाहरणार्थः—**विषमवृत्त.**

प्रथम चरण—स्वागता SIS I I IS I IS S ( ११ अक्षरी. )

द्वितीय चरण-माल्यभारा (अ.स.) I IS I IS IS IS S (पूर्वार्ध) ११अक्षरी.

त्रितीय चरण–शालिनी SSSS–SIS S IS S ( ११अक्षरी )

चतुर्थ चरण–इंद्रवंशा SS ISS I IS IS IS ( १२अक्षरी )

वर कांहीं ठिकाणीं जे दोष म्हणून ग्रहित धरले आहेत तेच अर्धसमवृत्तांत गुणदर्शक ठरतात; पण यापेक्षां विशेषत्व हें कीं, चार चरण, किंवा २ विषम चरणें सारखीं असतीं, तरी चिंता नव्हती; पण तीन चरण ११ अक्षरी व शेवटचें चरण १२ (बारा) अक्षरी आहे. कुतूहलावर दृष्टी ठेऊनच अशा कविता कराव्या लागतात, व शास्त्रीयक्रम म्हणून वृत्ताच्या प्रवेशांतून गाळतां येत नाहींत.

वाचकवर्यांना सांगावयाचें माझें सर्व हृद्गत विस्तारभयानें थोडथांडके कां होईना पण मोकळ्या हृदयानें सांगितलें आतां या ग्रंथरचनेंत (१) वृत्तदर्पण, (२) गीर्वाण लघुकोशसूची, (३) समग्र पंत, (४) छन्दोमंजरी, (५) व्यंकटाध्वरि कृत लक्ष्मिस्तोत्रस्तबक, (७) अपटे कोश-( शृंगारतिलक ), व वृत्त रत्नाकर, इ. आधार ग्रंथ जे घेतले आहेत, त्यांत क्वचित् प्रसगीं वृत्तनाम व लक्षणेत्यादिकांत जो फरक दृग्गोचर झाला तो शंका या स्वरूपांत वाचकांपुढें मांडून रजा घेतो.

वरील रसकोष्टकांत "कुसुमविचित्रा" आणि " शाकर " हीं दोन नांवें अशीं आढळलीं कीं, ज्या पैकीं "शकरी" हें फक्त छन्दाचें नांव आहे व ज्यांत १४ अक्षरी वृत्तांचा समावेश झाला आहे. उपरिनिर्दिष्ट आधारग्रंथांपैकीं एकांतूनहि यांची लक्षणा दिसून आली नाहीं.

छन्दप्रस्तारप्रांगणांत पाऊल टाकल्यास कोटीच्यावर वृत्तसंख्या जाते. येथें फक्त उपलब्ध वृत्तांचाच समावेश केला आहे.

छन्दोमंजरीच्या वृत्तानुक्रमणिकेंत " रुचिरा " च्या पुढें कसांत ( प्रभावती ) असें नांव दिसतें तें चुकून पडलें असावेंसे वाटतें. कारण "रुचिरा" (१)हें आठ अक्षरी वृत्त तर "प्रभावती" १३ अक्षरी वृत्त ~~(१)~~ आहे.

समग्र पंत पु. ८ च्या पृष्ठ ५१ वर " अमृतध्वनि " अथवा " अश्वधाटीछन्द " हें नांव मुद्रणदोषांकित किंवा चुकून पडलें असावें असें

वाटतें; कारण उभय लक्षणांत विरोध आहे—वृत्तदर्पणांत "अश्वधाटी" किंवा " मंदारमाला " असें म्हटलें आहे.

छंदोमंजरीच्या ५० व्या पृष्ठावर ( वसुहययतिरिह मणिगुणनिकर: ) आणि पृ. ४९ वर ( द्विहतहयलघुरथगिति शशिकला ) असें लिहिलें आहे. दोहोंचीं १५,१५ अक्षरें ( १४ लघु व शेवटलें गुरु ) आहेत;पण दोन श्लोक उदाहरणार्थ निरनिराळे देण्याचें प्रयोजन समजलें नाहीं.

"उपचित्रा" या नांवाचें वृत्त स.पं. पृ.५१३(पु.८) वर अकरा अक्षरी ||S||S||S|S / S||S||S||SS असें दिलें आहे तर पृ.५१७(पु ८) वर ||S|||S||SS / ||S|||S||SS असा ७ वा श्लोक आहे; आणि त्या नंतरचाच दुसरा श्लोक ||S||||S||S, SS|S|SS||S ||||S|||S|||S,||S|S|SS||S परस्पर विरुद्ध आहे. पण या वृत्ता संबंधीं अपटेकोशांत चित्रा, उपचित्रा, विश्लोक व पादाकुलक या चारी वृत्तास "मात्रासमक" या सदराखालीं मात्रावृत्तच गणिले आहे व " या सर्वास १६ मात्रा असतात " असा स्पष्ट निर्णय दिला आहे. श्रीमन्मयूरपंतांच्या या ३ श्लोकांत यद्यपि ३ प्रकार दिसून आले तरीपण या पैकींच एकांत चार चरणें तर दुसऱ्यांत ३ चरणें, १६ मात्रात्मक असल्यामुळें आम्हींही षोडषमात्रात्मकक्रम पाळण्याचाच अनुवाद केला आहे.

मात्रावृत्तासही चार चरण असतात, पण प्रथम व त्रितीय निर्यमक, व द्वितीय आणि चतुर्थचरण यमकात्मक असल्यामुळें दोन चरणी लिहिण्याचा प्रघात पडला असावा. कविवर्य पंतांनीं "पज्झटिका" वृत्तांत (स. पं.पु. ८ पृ. २२) चार यमकात्मक ७९ कविता लिहिल्या आहेत आणि वृत्तनामावर लूण देऊन टिपेंत " हें मात्रावृत्त आहे" असा स्पष्ट उल्लेखही पण केला आहे.

शेवटीं या ग्रंथरचनेंत ज्यांची ज्यांची म्हणून मला मदत झाली त्यांचें हार्दिक आभार मानणें हें माझें आद्य कर्तव्य आहे. त्या शिवाय या

काव्य-कुसुम-कलिका द्वितीय-उद्भव "पुष्पपाकळ्या" सम्बन्धीं लेखनकार्य पूर्ण झालें असें म्हणतां येणार नाहीं. यांत प्रामुख्यानें वेदान्त वाग्व्यापृत विद्वद्वर्य श्री. **सदाशिव केशव श्रोत्रिय** आणि **शास्त्रसुधाकर आचार्यभक्त** श्री. **विष्णुशास्त्री बापट** तसेंच. श्रीमन्मयूरपंतकुलोत्पन्न श्री. **का. त्र्यं. भय्याशास्त्री पराडकर** यांचा उल्लेख केला पाहिजे.

याचें प्रकाशक श्री.रा. **रा.शंकररावजी दीक्षित वकील कार्यभारी श्रीसंस्थान** माणिकनगर व श्री. अप्पासाहेब देशपांडे बी. ए. (ऑनर्स्) एल्एल्.बी. (**दाक्षिणा फेलो डेक्कन** कॉलेज पुणें) हे होत; पण हृदैक्यभावनेच्या दृष्टीनें यांचें आभार मानणें म्हणजे मुद्दाम कृत्रिमता ओढून घेणें होय; म्हणून नुसत्या नामनिर्देशनावरच भागविणें भाग आहे.

मला ज्यांची साहित्यविषयक मदत वेळोंवेळीं झाली ती व्यक्ति म्हणजे श्री. रा. रा. श्री. कृ. **पांडव** होत. यानीं संशोधनकार्यांत बरेंच श्रम घेतले. प्रूफेंही बरींच तपासिलीं. यांचेंही प्रामुख्यानें आभार मानणें आवश्यक आहे.

शेवटीं याच्या मुद्रणासंबंधीं विद्यालंकार, बॅरिस्टर ॲट लॉ. श्री. कृ. सा. रा. रा. **विनायकरावजी कोरटकर** यांचें आभार मानावयास पाहिजे; कारण मुख्यतः त्यांच्या मुद्रणालयांत (दक्कन लॉ रिपोर्ट प्रेस मध्यें) हें पुस्तक मुद्रित झालें आहे. कालावधीचा विचार जरी बाजूस ठेवला तरी मुद्रणासंबंधीं सर्व प्रकारची मदत त्यांच्या व त्यांच्या हस्तकांकडूनच मिळाली आहे. शिवाय त्यांचे वडील येथील समाजधुरीण, साहित्याभिमानी कै. वा. **न्यायमूर्ति नामदार** श्री. **केशवरावजी साहेब कोरटकर** हायकोर्ट वकील यांनीं, येथलें असलें शास्त्रीय पुस्तक, येथेंच प्रसिद्ध व्हावें व त्यानंतर विश्वविद्यालयाच्या क्रमिकपुस्तकांतसुद्धां याचा प्रवेश व्हावा, अशा स्वाभिमानानें ( १६ व्या साहित्य सम्मेलनप्रसंगीं ) प्रेरित होऊन हें मुद्रणकार्य मोठ्या उल्हासानें व उत्सुकतेनें हातीं घेतलें

होतें. याच्या सहस्र प्रती तरी पुरतील कीं नाहीं अशी काळजी बाळगणारी व्यक्ति निर्घृण कालाकरवीं जरी हिरावली गेली तरी तोच स्वाभिमान व तोच अभिनिवेश धरून " आत्मावै पुत्रनामासि " हें उपनिषद्सूत्र बॅरिस्टर साहेबांनीं सार्थ करून दाखविलें.

आरंभीं वृत्तासंबंधींचा उल्लेख जरी ( अगदीं संक्षिप्तपणें म्हटल्यासहि) बराच विस्तृत दिसत असला, तरीपण त्यांतल्या अडचणींच्या दिग्दर्शनाची विस्तारभयास्तव बरीच कुचंबणा झाली आहे. तशीच किंबहुना तदाधिक्य, याच्या मुद्रणदोषासंबंधींच्या आवश्यक उल्लेखांतसुद्धां बरीच कुचंबणा होणार आहे हें आधीं ध्यानांत घेऊनच शक्य तो थोडक्यांत कळविण्याचा यत्न करावयाचा आहे.

प्रेसबद्दल विशेष कांहीं मला म्हणावयाचें नाहीं, पण न कळविल्यास, अनेक चुक्या ज्या त्यांतून झाल्या आहेत—झाल्या आहेत म्हणजे मुद्दाम केल्या आहेत, असेंही कांहीं चुक्यावरून साहजीक वाचकांच्या कल्पनेंत येणें अपरिहार्य आहे म्हणून माझ्या पहाण्यांत जीं बहुतेक प्रूफें आलीं आहेत त्या अनुभवावरून मुद्दाम केल्या नाहींत इतकें मी माझ्या माहितीच्या मर्यादे पर्यंत वाचकांना आधींच विनवून ठेवतों. खरें पाहूं गेल्यास चुक्या इतक्या मनस्वि झाल्या आहेत कीं, त्या वाचकांच्या सहज ध्यानांत येऊं शकतात; अशा $\frac{3}{4}$ जरी गाळल्या तरी शुद्धिपत्रांतील संख्या १४६ झाली आहे.

गाळल्यापैकींचा प्रकार म्हणजे, उदाहरणार्थ, पृ. १४० पहिल्या श्लोकाच्या दुसऱ्या ओळींतील "अवनि"च्या ऐवजीं "अवरुनि", तसेंच खालील ओळींत "अवरुनि"च्या ऐवजीं "अवनि" आणि पृ. २१४ श्लो. ५ यांत " आपुल्या " ऐवजीं " आपुल्यासहि " असें कम्पोझ झालें आहे. वृत्ताक्षराशीं ताडून पाहिल्यास कवितारचनेंत दोन अक्षरें अधिक चुकून पडणें कधींच शक्य नाहीं हें वाचकांना विदित नाहीं असें नाहीं. तसेंच

पृ. १४१ श्लो. ५ "अजुनि" नंतर, "हि" एक अक्षर अधिक पडलें आहे. असलीहि चूक शुद्धिपत्रांत दाखविली गेली नाहीं. वृत्तांच्या लक्षणांची विस्तृत सूचीच निराळी दिली असल्यानें, प्रत्येक कवितेवर दिलेल्या लक्षणेंत झालेली चूक आजिबात् मोजली नाहीं. बऱ्याच ठिकाणीं वृत्ताक्षरसंख्येंत यति दिग्दर्शक २ किंवा ३ आकड्यांची त्यापुढें अधिकाचें चिन्ह देऊनही, एकूण बेरीज दाखवितांना भलते आकडे पडले आहेत. २ किंवा ३ अधिक चिन्हान्वित आकड्यांची बेरीज सहज ध्यानांत येण्यासारखी आहे. तरी, संख्याविषयक चुक्यासंबंधीं विशेष न लिहितां, एकच चूक म्हणजे पृ.१६८ नंतर पुनश्च १६७ व १६८ आले आहेत यावरून कदाचित्त वाचकांना कांहीं वर्षामागें रत्नाकर मासिकांतून आलेल्या श्री. चिं. वि. जोशीकृत " कम्पॉझिटरचा सूड " या विनोदी गोष्टीची आठवण येणें सहजीक आहे; पण त्याची यत्किंचित् सुद्धां अन्वर्थकता या पुस्तकासंबंधीं प्रस्तुत प्रसंगीं मात्र नाहीं अशी कम्पॉझिटरची बाजू घेऊन सनम्र शिफारस करतों. प्रेसाशीं ज्यांचा वरचेवर संबंध येतो त्यांना यांतल्या भानगडी व अडचणी निराळ्या सांगणें नको. कारण, फायनल प्रूफ व फॉर्म एकदां तपासून पाहिल्यावर, साधारणपणें असें होतें कीं, तो छापला जात असतांना कांहीं कान्हे, मात्रे जरा कलते झाल्यामुळें उठलेच नाहींत. यावरून " बिनचूक प्रूफ मीं तपासलें" असें छातीठोकपणें म्हणणारा एकतरी भेटेल कीं नाहीं, याची शंकाच आहे. अस्तु. यानंतर निघणाऱ्या त्रितीय-उद्भव " सुमनसौरभ " पुस्तकांत तरी चुक्यांचें प्रमाण पुष्कळ कमी रहावें अशी इच्छा करून हा लेख संपवितो.

श्रावण वद्य ९ श. १८५४ गुरुवार.

भवदीय विनम्र
य. स. कोरेकर

॥ श्री व्यंकटेश प्रसन्न ॥

# उपोद्घात

श्री. रा. रा. **यशवंतरावजी कोरकल** यांच्या स्वरचित काव्य-कुसुम कलिकेचा द्वितीय उद्भव '**पुष्पपाकळया**' हें पुस्तक उपोद्घातात्मक चार शब्द लिहिण्याकरितां आमचेकडे येऊन फार दिवस झाले. इतर अनेक व्यवसाय, प्रकृतीचा अशक्तपणा, इतस्ततः पर्यटण इत्यादि अनेक कारणसमुच्चयामुळें आमच्या हातून योग्य वेळीं उपोद्घात लिहून झाला नाहीं याबद्दल यशवंतरावजींची व द्वितीयोद्भवाविषयीं उत्सुक असणाऱ्या वाचकांची प्रथमतः क्षमा मागणें हेंच या उपोद्घातांतील प्रथम कार्य होय. तें करून नंतर उपोद्घाताचे चार शब्द लिहितों.

भगवान् पाणिनि यांच्या शिक्षेमध्यें '**छंदः पादौ तु वेदस्य**' असें म्हटलें आहे. त्याचा रामजोशी यांनी 'छंदः हे चरण वेदनराचे। स्तंभ जेवि लघु थोर घराचे ॥ त्याविणें सदन सिद्ध न होते। काव्य याविण तसेंचि अहो ते ॥' असा अनुवाद केला आहे. त्यावरून काव्यांत छंदास किति महत्त्व आहे हें वाचकांस कळून येईल. '**यो हि अविदितार्षेयछन्दोदैवतविनियोगेन ब्राह्मणेन मंत्रेण याजयति वा अध्यापयति वा स स्थाणुं वर्च्छति गर्ते वा पद्यते वा प्रमीयते पापीयान् भवति यातयामानि अस्य छंदांसि भवन्ति** ।'(छांदोग्य ब्राह्मण) असा अविदितछंद अशा श्रोतियांचा श्रुतीनें अधःपात सांगितला आहे. त्यावरून वेदकालीं छंदोज्ञानाचें किति महत्त्व होतें हें समजून येईल. तसेंच '**अनुष्टुभा यजति, बृहत्या गायति, गायत्र्या स्तौति**' अशीं विधायक वाक्यें असल्यामुळें यज्ञादिकर्मांत छंदोज्ञान अवश्य आहे; हें समजून येईल. '**ब्राह्मणेन निष्कारणो धर्मः षडङ्गो वेदो ध्येयो ज्ञेयश्च**' अशी षडङ्ग वेदाध्ययन हे ब्राम्हणास नित्य आहे असें सांगणारी श्रुति आहे.

शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष हीं वेदाचीं सहा अंगें आहेत. या छंदाचें विवेचन करणारें जें शास्त्र त्यास छंदःशास्त्र असें म्हणतात. या शास्त्राचा कर्ता पिंगलनाग ही व्यक्ति होय. **छंदो-'ज्ञाननिधिं जघान मकरो वेलातटे पिङ्गलम्** ' हा श्लोक व '**चतुर्भिर्यकारैर्भुजंगप्रयातम्** 'इत्यादि लोकप्रवाद त्याविषयीं प्रसिद्ध आहेत. हा पिङ्गलनाग व भगवान् पतंजलि हे दोघे एकच असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. कांहीं विद्वान दोघे भिन्न मानतात. आह्मांस द्वितीय मत सयुक्तिक दिसतें परंतु तो विषय प्रस्तुत नसल्यामुळें येथें त्याची चर्चा करीत नाहीं. पिंगलाच्या नांवावर '**प्राकृतपैंगलम्** ' असा प्राकृत छंदःशास्त्राचा एक ग्रंथ आहे परंतु तो पिंगल व हा पिंगल एक नव्हेत. प्राकृत छंदःशास्त्रकर्ता पिंगल विशेष अर्वाचीन आहे. वेदांगभूत छंदःशास्त्रकर्ता पिंगल हा जरी विशेष प्राचीन आहे. तरी त्याच्यापूर्वीहि छंदशास्त्रप्रणेते यास्क, सैतव, काश्यप वगैरे होऊन गेले हें त्याच्याच या छंदसूत्रावरून दिसून येतें. ( अ.३।३०व ७सूत्र ९व१०) पिंगलाच्या या छंदःशास्त्रास '**छंदोविचिति** ' ही संज्ञा होती असें कांहीं विद्वान् मानतात तर कांहीं विद्वान् तो काव्यादर्शकार दंडी याचा छंदःशास्त्रावर एक निराळाच ग्रंथ आहे असें मानतात. यांतील पहिला पक्ष आम्हांस युक्त वाटतो. कात्यायनाच्या सर्वानुक्रमणिकेंतही छंदाची बरीच माहिती दिली आहे. निरुक्तांतही छंदासंबंधानें माहिती आहेच. तथापि छंदासंबंधानें संपूर्ण विवेचन पिंगलानेंच केलें असल्यामुळें त्याचाच ग्रंथ वेदांगामध्यें गृहीत आहे. 'छंदःकौस्तुभ,' 'वृत्तरत्नाकर,' 'वाणीभूषण' वगैरे अनेक ग्रंथ छंदःशास्त्रावर पुढें झाले. यांत वैदिक छंदांचें विवेचन नसून लौकिक छंदांचा विस्तारानें विचार केला आहे. छंदःशास्त्रावर 'भट्ट हलायुधाची' व वृत्तरत्नाकरावर 'भट्ट नारायणाची' सर्वमान्य टीका आहे. सरस्वतीकंठाभरण (भोजराज) मंदार मरंदचम्पू वगैरे साहित्यग्रंथांतहि वृत्तांचें विवेचन केलें आहे. याप्रमाणें संस्कृतांत छंदःशास्त्राचा विस्तार आहे.

मराठींत 'मोरोपंत,' 'रामजोशी,' 'परशुरामतात्या' वगैरे साहित्यभक्तांनीं छंदांचें विवेचन केलें आहे. परंतु तें अत्यंत संक्षिप्त आहे. व मराठींत संस्कृतवृत्तांचाच भरणा विशेष असल्यामुळें या विद्वानांचे ग्रंथ संस्कृतग्रंथांची प्रतिबिंबें आहेत असें म्हटलें तरी चालेल. केवळ मराठींत म्हणून समजलीं जाणारीं जीं ओवी, अभंग, साकी, दिंडी वगैरे वृत्तें त्यांचें विवेचन या ग्रंथांत केलेलें आहे; तथापि तें निश्चितस्वरूप प्रतिपादन करणारें नसल्यामुळें एक प्रकारें अशास्त्रीयच म्हणावें लागतें. कै. राजवाडे यांनीं सरस्वतीमंदिर मासिकांत केवळ प्राकृत वृत्तांचें विवेचन केलें आहे. परंतु तेंहि निश्चित स्वरूपाचें नसल्यामुळें त्याविषयीं मतभेद व विवाद आहेत. प्रो. माधवरावजी पटवर्धन यांनीं छंदोरचना म्हणून एक पुस्तक लिहिलें आहे त्यांत त्यांची स्वतंत्र बुद्धि व विचारप्रागल्भ्य दिसून येतें तथापि ओवी अभंग वगैरे केवळ प्राकृत वृत्तांचें त्यांचें विवेचन अपुरेंच वाटतें. यासंबंधानें गणांचें विवेचन करतांना विशेष विचार करूं. त्यानंतरचा छंदःशास्त्रांतील मराठींतील विस्तृत ग्रंथ म्हणजे प्रस्तुतचा '**काव्यकुसुमकलिका द्वितीयोद्भव**' हाच होय. यांत शास्त्रीय चर्चा विशेष न करतां जवळ जवळ २५०।२७५ वृत्तांचें रेषालिपीनें स्वरूप देऊन विविध वृत्तांत विविध विषय मनोहर रीतीनें ग्रथित केले आहेत. त्यामुळें छंदोज्ञान व सदुपदेश या दोहोंचा लाभ वाचकांस मिळतो. असो. येथपर्यंत दिलेल्या माहितीवरून संस्कृतांत व मराठींत छंद या विषयासंबंधानें कोठें विवेचन केलें आहे हें वाचकांस साधारणपणें समजून येईल.

आतां आपण छंदःशास्त्रांतील एकेका विषयासंबंधानें जरा विस्तृत चर्चा करूं. छंद शब्दाची व्युत्पत्ति यास्काचार्यानें '**मंत्रा मननात् छंदांसि छादनात्**' या सूत्रानें आच्छादन करणारे (रक्षण करणारे) तें छंद अशी केली आहे. व यास '**ते छंदोभिरात्मानं छादयित्वोपायन्। तच्छंदसां छंदस्त्वम्।**' '**छादयन्ति वा एनं छंदांसि**

पापात्कर्मणः । ' ' गायत्रेण छंदसा त्वां छादयामि । ' ' ते छंदोभिरात्मानं छादयन् । यदेभिराछांदयंस्तच्छंदसां छंदस्त्वम् । ' इत्यादि वेदवाक्यें प्रमाण आहेत. या सर्व वैदिक वाक्यांत छंद या शब्दाचा रक्षण करणें असा अर्थ आहे. शाकटायन महर्षींनें छंदःशब्दाचा अर्थ ' चदि आल्हादे सुखे च ' हा धातु घेऊन आल्हाद देणारा तो छंद असा केला आहे. व शब्दसिद्धीकरतां ' चदेरादेश्च छः ' असें सूत्र केलें आहे. तात्पर्य यास्काचें मतें ( पापादिकापासून ) रक्षण करणारा तो छंद असा त्याचा अर्थ आहे. शाकटायनाचें मतें आल्हाद देणारा तो छंद असा अर्थ होत आहे. प्रथम अर्थास श्रुति प्रमाण आहे तर द्वितीय अर्थ अनुभवसिद्ध आहे. तेव्हां दोन्हीं अर्थ युक्त असें आपण समजण्यास हरकत नाहीं. छंदःशास्त्रांत १ उक्था २ अत्युक्था ३ मध्या ४ प्रतिष्ठा ५ सुप्रतिष्ठा ६ गायत्री ७ उष्णिक् ८ अनुष्टुभ् ९ बृहती १० पंक्ति ११ त्रिष्टुप् १२ जगती १३ अतिजगती १४ शक्वरी १५ अतिशक्वरी १६ अष्टी १७ अत्यष्टी १८ धृति १९ अतिधृति २० कृति २१ प्रकृति २२ आकृति २३ विकृति २४ संस्कृति २५ अतिकृति २६ उत्कृति. या एकापासून २६ पर्यंत अक्षरांच्या संज्ञा आहेत. त्यांच्यापुढें छंदः शब्द जोडून उक्थाछंद, अत्युक्थाछंद म्हणजे एकाक्षरी छंद द्व्यक्षरी छंद अशा परिभाषेनें अक्षरछंद सांगण्याची पद्धति आहे. वैदिक छंद हे प्रायः अक्षरसंख्येवर अवलंबून आहेत. ते मात्रा व गण यांनीं नियमित केलेले नाहींत. तेव्हां त्यांचीं लक्षणें अक्षरसंख्येवरच बांधलेलीं आहेत. उदाहरणार्थ ' उष्णिग् गायत्रौ जागतश्च ' म्हणजे उष्णिक् हा छंद दोन गायत्रीचे पाद ( म्हणजे दोन अष्टाक्षरी पाद ) व एक जागताचा पाद ( बारा अक्षरी पाद ) असा तीन चरणानें होतो. ' अनुष्टुब् गायत्रैः ' गायत्रीचे (अष्टाक्षरी असे) चार चरण झाले म्हणजे अनुष्टुप् छंद होतो अशा रीतीनें अक्षरसंख्येनें छंदांचीं लक्षणें बांधलीं आहेत. तसेंच

विशिष्ट संख्यायुक्त पादांच्या प्रथमद्वितीयादि परिवर्तनानें कांहीं छंद होतात. उदाहरणार्थ '**मध्येऽन्त्ये च**' याचा अर्थ जगतीछंदाच्या पादाच्या मध्यें व शेवटीं जेव्हां गायत्रीचे पाद येतात तेव्हां तोहि छंद अनुष्टुभच होतो. अशा रीतीनें अक्षर संख्येची स्थानें सांगून हीं लक्षणें सांगितलीं आहेत याप्रमाणें वैदिक छंदाविषयीं पुष्कळ माहिती देतां येईल. परंतु त्याची मोडणी समजण्यास एवढी माहिती पुरी असल्यामुळें विस्तार करीत नाहीं. ही अक्षरसंख्येवरून निश्चित केलेली छंदोरचना मात्रा व गण यांच्या नियमानें बद्ध असलेल्या छंदोरचनेपेक्षां पुष्कळ शिथिल आहे हें वाचकांस कळून येईल. गणबद्ध रचनेच्या मानानें सुलभ परंतु अक्षरसंख्येवर अवलंबून असणाऱ्या वैदिक छंदाच्या मानानें क्लिष्ट अशी मात्राबद्ध छंदोरचना आर्या, गीति, वैतालीय वगैरे जातींत आहे. मात्राबद्ध छंदोरचनेस जाति व अक्षरगणबद्ध छंदोरचनेस वृत्त असें म्हणतात. असो. याचा विस्तारानें विचार पुढें लवकरच करूं. वेदांत **गायत्री, उष्णिक्, अनुष्टुभ्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुभ्, व जगती हे** सात छंद प्रामुख्यकरून येतात व अक्षरगणांवर जरी छंदांचीं लक्षणें नसलीं तरी त्र्यक्षरी गणांची कल्पना त्यावेळीं होती. या दोन्हीं गोष्टी '**त्र्यक्षरेण मिमते सप्त वाणीः**' या उल्लेखावरून उन्नीत होतात. या सप्त छंदांत गायत्रीचें प्राशस्त्य विशेष, तिच्या खालोखाल त्रिष्टुभाचें वगैरे आहे हें (प्रजापतिः) '**यदष्टौ कृत्वाक्षरत् सैवाष्टाक्षरा गायत्री अभवत्**' '**अष्टाक्षरा गायत्री तस्माद्ब्राह्मणोऽग्निरिति**' '**गायत्रो वै ब्राह्मणः त्रैष्टुभो वै राजन्यः जागतो वै वैश्यः**' '**गायत्र्या ब्राह्मणं निरवर्तयत् त्रिष्टुभा राजन्यं जगत्या वैश्यं न केनचिच्छंदसा शूद्रं निरवर्तयत्**' '**तेजो वै ब्रह्मवर्चसं गायत्री ब्रह्म गायत्री ओजो वा इंद्रियं वीर्यं त्रिष्टुभ् क्षत्रं वा त्रिष्टुभ्**' इत्यादि श्रुतिवाक्यांनीं निष्पन्न होत आहे गायत्री वगैरे वृत्तांच्या अक्षरसंख्येवर विविध कल्पना करून रूपकें केल्याचें वेदांत आढळून येतें. तैत्तिरीय संहितेंत

**सोऽब्रवीत्प्रजापतिः छंदांसि । रथो मे भवत । युष्माभिरहमेतध्वान-मनुसंचराणीति । तस्य गायत्री च जगती पक्षौ अभवताम् । उष्णिक च त्रिष्टुप् च प्रष्टयौ । अनुष्टुप् च पंक्तिश्च धुर्यौ । बृहत्यवोद्धि-रभवत् । स एतं छंदोरथमास्थाय एतमध्वानमनुसमचरत्** ' अशी सप्त छंदावर रथाची कल्पना केली आहे. शतपथ ब्राह्मणांत ' **पंचदशा वा अर्धमासस्य रात्रयः । अर्धमासशो वै संवत्सरो भवन्निति तद्रात्रीरवाप्नोति । पंचदशानामु वै गायत्रीणां त्रीणि च शतानि च षष्टिश्चाक्षराणि । त्रीणि च वै शतानि षष्टिश्च संवत्सरस्याहानि । तदहान्याप्नोति । तद्वदेव संवत्सरमाप्नोति** । या ठिकाणीं गायत्री-छंदाच्या अक्षर संख्येशीं संवत्सराच्या दिवसाचें सादृश्य दाखवून अशा ज्ञानी पुरुषाला संवत्सराची (तद्युक्त आयुष्याची) प्राप्ति होते असें सांगितलें आहे यावरून एवढें निष्पन्न होतें कीं ऋषींना छंद हे विशेष प्रिय होते व त्यामुळें छंदांचें विविध प्रकारानें वर्णन करण्याचा त्यांना छंदच लागला होता. असो. आतां यापुढें प्राकृतांत छंदाविषयीं काय आढळतें तें पाहू.

प्राकृत पिङ्गलानें ' जेम ण सहइ कणअतुला तिलतुलिअं अद्धअद्धेण । तेम ण सहइ सवणतुला अवछंदं छंदभंगेण ॥ ' ' ( **यथा न सहते कनकतुला तिलतुलितमर्धार्धेन । तथा न सहते श्रवणतुला अपच्छंदस्कं छंदभंगेन** ॥) ' व ' अबुह बुहाणं मज्झे कव्वं जो पढइ लक्खण-विहूणम् । भूअग्गलग्गखग्गहिं सीस खुडिअं ण जाणेइ ॥ ' ( **अबुधो बुधानां मध्ये काव्यं यः पठति लक्षणविहीनम् । भुजाग्रलग्नखड्गेन शीर्षं खंडितं न जानाति** ॥ ) अशा प्रथमतः उपक्रमांत छंदाचें महात्म्य सांगण्याकरतां दोन आर्या दिल्या आहेत. यांतील पहिलीचा अर्थ-ज्याप्रमाणें सोनें जोखण्याचा ताजवा अर्धा तिळ सुद्धां कमी जास्त सहन करीत नाहीं त्याप्रमाणें काव्य श्रवण करणाराची श्रवणतुला ही स्वल्पहि छंदोभंग सहन करीत नाहीं. तसेंच जो मूर्ख मनुष्य

विद्वान् लोकांपुढें अव्यवस्थितपणानें लक्षणहीन असें काव्याचें पठन करतो तो आपल्या हातांतील तरवारीनेंच जणुंकाय आपलें मस्तक तोडीत आहे ही गोष्ट जाणत नाहीं. याप्रमाणें छंदःशास्त्राचें महत्त्व सांगून पुढें गणछंद (मात्रागणछंद) मात्राछंद व अक्षरगणछंद (त्र्यक्षरात्मक **म, य, र, स** वगैरे गणांनीं नियमित छंद) अशा तीन प्रकारच्या छंदांचें विवेचन केलें आहे. त्यांत मात्रागणानें नियमित छंद हे आर्या, पथ्या, उद्गीति वगैरे आर्या आहेत. वैतालीय, औपच्छंदासिक, आपातालिका वगैरे छंद हे केवळ मात्राछंद होत व समानी, प्रमाणी वगैरे अक्षरगणछंद होत. पिङ्गलाच्या छंदःशास्त्रांत जे मात्रागणछंद, मात्राछंद व अक्षरगणछंद यांचे प्रकार दिले आहेत त्यापेक्षां प्राकृत पिङ्गलांत मात्रावृत्तांचा व गण-वृत्तांचा पुष्कळच अधिक विस्तार केला आहे. उदाहरणार्थ—गायत्री-छंदामध्यें ( षडक्षरीछंदामध्यें ) छंदःशास्त्रकारांनीं एक तनुमध्याच वृत्त दिलें आहे. प्राकृत पिङ्गलांत शेषा (विद्युल्लेखा), तिलका, विज्जोहा, चतुरंसा, मन्थान, शंखनारी, मालती अशीं अनेक वृत्तें दाखविलीं आहेत. हा वृत्तवृद्धीचा प्रकार प्राकृत पिङ्गलांत जागोजागीं आहे. तसेंच छंदः-शास्त्रांत मात्रागण चार कलांचे ( चार लघूंचा [कला म्हणजे एक लघु] एक गण असें ) मानिले आहेत व त्यांचे प्रस्तारपद्धतीनें दोन गुरु[SS] आदि गुरु [SII] मध्य गुरु [ISI] अंत्य गुरु [IIS] व सर्व लघु[IIII] असें पांच प्रकार दर्शवून त्यावर सर्व मात्रागणवृत्तांची मांडणी केली आहे. प्राकृत पिङ्गलांत सहा, पांच, चार, तीन, दोन अशा कलांचे (मात्रांचे) गण कल्पून त्यास ट, ठ, ड, ढ व ण अशा संज्ञा दिल्या आहेत. व नंतर पुन्हां यांच्या प्रस्तारपद्धतीनें होणाऱ्या भेदास विविध संज्ञा देऊन या गणविवेचनाचा बराच विस्तार केला आहे. उदाहरणार्थ 'ट' संज्ञक जो षण्मात्राक [षट्कल] गण त्याचीं प्रस्तारप्रकारानें तेरा रूपें होतात. त्यांस क्रमानें **हर** (SSS) **शशी** (IISS) **सूर** (ISIS) **शक्र** (SIIS) **शेष** (IIIIS) **अहि** (ISSI) **कमल** (SISI) **ब्रम्हा** (IIISI)

**कलि** (SS ।।) **चन्द्र** (।।S।।) **ध्रुव** (।S।।।) **धर्म** (S।।।।) **शालिकर** (।।।।।।) अशा संज्ञा दिल्या आहेत. याप्रकारानें पांची गणांच्या प्रस्तार-प्रकारास विविध स्वतंत्र संज्ञा दिल्या आहेत. एवढेंच नव्हे तर त्या त्या गणास व त्यांतील प्रस्तारभेदांस अनेक संज्ञा दिल्या आहेत. चतुर्मात्र-कांतील अंत्यगुरु जो प्रकार [।।S] यांस **कर, पाणि, कमल, हस्त, बाहु, भुजदण्ड, प्रहरण, अशनि, गजाभरण, भुजाभरण,** [कियूरादि] या संज्ञा आहेत. अशा विविधप्रस्ताराच्या इतक्या संज्ञा आहेत कीं त्यासंबंधीं जे पारिभाषिक श्लोक आहेत ते पाठ केल्यावांचून त्या संज्ञा ध्यानांतच राहणार नाहींत. अशा विविध संज्ञांचा उपयोग एवढाच कीं वृत्ताचे लक्षणात्मक श्लोक वस्तुवर्णनात्मकहि करतां येतात. उदाहरणार्थ **पादविराजन्नूपुरयुग्मा। कुण्डलशोभासङ्गिसुरूपा॥ शङ्खवती हारद्वयपूर्णा। चम्पकमाला भाति सुवर्णा॥** हा श्लोक चम्पकमालावृत्ताचें लक्षण असून त्यानें चम्पकमाला संज्ञक नायिकेचेंहि वर्णन केलें जात आहे. ही वृत्ताचें लक्षण सांगण्याची पद्धति विशेष प्रचारांत नाहीं. परंतु ती चमत्कृतिपूर्ण आहे यांत शंका नाहीं. असो. याप्रमाणें प्राकृतपिङ्गलांतील थोडिशी माहिती दिल्यावर आतां आपण अक्षरगणवृत्तासंबंधानें थोडिशी चर्चा करूं.

---

१ या पद्यांत चंपकमाला वृत्ताचें लक्षण पुढील संकेताप्रमाणें दिलें आहे. चतुष्कलाच्या प्रस्तारांत आदिगुरूच्या (S।।) प्रकारास "**आदिगुरुर्वसुचरणम्**" या परिभाषेप्रमाणें वसु, चरण (पाद) इत्यादि संज्ञा दिल्या आहेत. तसेंच

'**नूपुररसनाचामरकङ्कणमञ्जीरताटङ्काः।**
**कुण्डलहारौ वलयं गुरुनामानि कथितानि॥**

या पद्यांत नूपुर, कुण्डल, हार इत्यादि गुरूच्या संज्ञा सांगितल्या आहेत व "**शरभेरुदण्डकनकं शङ्खौ रूप गन्ध कुसुमानि।**
**स्पर्शरसाविति संज्ञा मात्रामात्रस्य पिङ्गलेनोक्ताः॥**

अक्षरगणवृत्तांचा विचार करतांना प्रथमतः आतांपर्यंत दिलेली माहिती संक्षेपानें क्रमवार सांगितली असतां वाचकांस तें सोईचें होईल म्हणून ती देतों. एकापासून सव्वीसपर्यंत अक्षराच्या विशिष्ट संख्येस उक्था वगैरे संज्ञा आहेत. अक्षराचे लघु व गुरु असे दोन भेद छंदःशास्त्रांत गृहीत आहे. लघूची एक मात्रा व गुरूच्या दोन मात्रा मानितात. **'मीयते अनया सा मात्रा'** अशी मात्राशब्दाची व्युत्पत्ति आहे. यावरून मात्राशब्द कालविशेषाचा बोधक आहे असें निष्पन्न होतें. पाणिनीय शिक्षेंत **' चाषस्तु वदते मात्रां द्विमात्रं तु वायसः। शिखी रौति त्रिमात्रं तु नकुलस्त्वर्धमात्रकः॥'** असें पक्षिविशेषांच्या शब्दावरून मात्राकालाचें रूप सांगितलें आहे. छंदःशास्त्रांत मात्राचा पर्याय म्हणून कला शब्दहि येतो. त्रिकल म्हणजे त्रिमात्राक छंदःशास्त्रांत व प्राकृत पिङ्गलांत चतुर्मात्रात्मक अथवा षण्मात्रात्मक वगैरे मात्रागण कल्पून त्यांचे प्रस्तारपद्धतीनें भेद सांगून आर्या गीति वगैरेचीं लक्षणें बांधलीं आहेत. व वैतालीय वगैरेचीं विशिष्ट मात्रांच्या संख्येवरच लक्षणें सांगितलीं आहेत. त्यांचीं लक्षणें गणांवर सांगितलीं नाहींत. परंतु पुढील छंदःशास्त्रज्ञ **केदारभट्ट** वगैरेनीं आर्या, गीता वगैरे सर्व छंद मात्रांच्या विशिष्ट संख्येवरच वैतालीयाप्रमाणें सांगितलें आहेत, त्यामुळें पुढें मात्राछंद व गणछंद असेच दोन प्रकार चालू झाले वैदिक अक्षरछंद हा पुढें विशेष प्रचारांत राहिला नाही. मात्राछंदास जाति व गणछंदास वृत्त अशा संज्ञा आहेत. छंदःशास्त्रांत त्र्यक्षरात्मक गण असून त्यांतील

---

*या कारिकेनें एककलाच्या (लघूच्या) संज्ञा सांगितल्या आहेत. ह्या लक्षात ठेवल्या म्हणजे पाद म्हणजे चतुष्कल आदिगुरु या गणांनीं शोभणारे असे नूपुरयुग (SS) दोन गुरु व कुण्डल (S) एक गुरू यानीं शोभणारें रूप (I) एक लघु व शंख (I) एक लघु व हारद्वय (SS) दोन गुरु यांनीं परिपूर्ण असणारें वृत्त तें चंपकमाला होय. म्हणजे चंपकमालेचें (SII SSS II SS) असें रूप निष्पन्न होतें.

लघु गुरूंच्या परिवर्तनानें प्रस्तारपद्धतीनें त्याचे आठ प्रकार होतात, व त्यांसच क्रमानें **म, य, र, स, त, ज, भ, न,** अशा संज्ञा आहेत. **'मगणस्त्रिगुरुस्त्रिलघुर्नगणो भगणादिगुरुर्यगणादिलघुः। गुरुमध्यगजो लघुमध्यगरः सगणोऽन्तगुरुस्तगणोऽन्तलघुः॥'** अशी या गणांचे स्वरूप सांगणारी कारिका आहे. केवळ मराठींतच असणारे ओवी अभंग हे छंद अक्षर, मात्रा व गण यावर अवलंबून नसून विशेषेंकरून ते अनुप्रासावर अवलंबून आहेत. गेय पद्यें हीं प्राधान्येंकरून स्वरान्दोलनावर अवलंबून असतात. कारण षड्ज, मध्यमादि जे सप्तस्वर आरोहावरोहयुक्त (ध्वनिविशेष) त्यांच्या आंदोलन व आवर्तनावर भैरवी, मालकंस, वगैरे रागांची उभारणी केली आहे, व त्यांत कालविशेषाचे नियमनहि केलेलें आहे, व पदें हीं अशा प्रकारच्या रागांतच म्हटलीं जातात. वृत्तांत मात्रापरिवर्तनास प्राधान्य असतें म्हणून छंदःशास्त्राकारांनीं विशेषतः संस्कृतछंदःशास्त्राकारांनीं राग विशेषावर अवलंबून असणाऱ्या गेयपद्यांचा आपल्या शास्त्रांत समावेश केला नाहीं. अशा पद्यांचा विस्तारहि विशेष असल्यामुळें संगीतशास्त्राचा तो विषय म्हणून सोडून दिला असावा. पोवाडा, लावणी वगैरेंचाहि छंदःशास्त्रापेक्षां (गण परिवर्तनापेक्षां) स्वरांदोलनाकडेच (संगीत शास्त्राकडेच) विशेष कल, तेव्हां त्यांचीहि चर्चा या विषयांत येऊं शकत नाहीं. चूर्णिका, उत्कलिका वगैरे प्रकार छंदःशास्त्रांत कांहीं पंडितांनीं विवेचिले आहेत.परंतु ते गद्यप्रकारांत येत असल्यामुळें त्यांचा विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. ते प्रकार 'वैदर्भी'व 'गौडी' म्हणून जे रचनाप्रकार आहेत त्यास उपयुक्त आहेत. अक्षरगणवृत्तें हीं छंदःशास्त्रकारांनीं अनुष्टुप् छंदापासून म्हणजे आठ अक्षरापासून देण्यास आरंभ केला आहे. परंतु पुढील छंदःशास्त्रकारांनीं एका अक्षरापासून सव्वीस अक्षरापर्यंत तीं मानिलीं आहेत, व त्यांचीं लक्षणें व उदाहरणें दिलीं आहेत. सव्वीस अक्षरापेक्षां ज्यास्त अक्षरांचें ज्यांचें चरण आहेत त्यांस **'दंडक'** म्हटलें आहे. हें दंडक वाटेल तितकें वाढवितां येतें.

मालतीमाधवांतील ' **प्रचलितकरिकृत्ति** ' हें एकावन अक्षराचे दंडक प्रस्तुत ग्रंथकार रा. **य.स.कोरेकल** यांनीं उध्दृत केलें आहे. एकाक्षरी, द्व्यक्षरी वगैरे वृत्तें संस्कृतसाहित्यवाङ्मयांत उपलब्ध नाहीत. तीं केवळ शास्त्रीय परिभाषेनें मागतां येतात एवढ्याकरतांच त्यांची लक्षणें व उदाहरणें अर्वाचीनांनीं तयार करून त्यांचा आपल्या ग्रंथांत संग्रह केला आहे. **केदारभट्ट, गंगादास** प्रभृति संस्कृतछंदःशास्त्रकारांनीं छंदाचें लक्षण हें त्याच छंदाच्या एका चरणांत गण, यति व छंदाचें नांव यांचा समावेश करून दाखविलें आहे. एक प्रकारें हीं छंदःसूत्रेंच बनली आहेत. व स्मरणांत ठेवण्यास उपयुक्त आहेत. कालिदासाचा एक लहानसा ' **श्रुतबोध** ' नांवाचा छंदःशास्त्रावर ग्रंथ आहे. त्यांत त्या त्या वृत्तांत लघुगुरूंचा क्रम सांगून वृत्तांचें लक्षण सांगितलें आहे. हा 'कालिदास' नाटककार 'महाकवि **कालिदास**' नव्हे हा कोणीतरी अर्वाचीन असावा. मराठींत छंदोमंजरीकार ' **रामजोशी** ' यांनीं त्या त्या वृत्ताच्या प्रथम चरणांत त्या त्या गणांचे संज्ञाभूत अक्षर गणारंभीं योजून चतुर्थ चरणांत वृत्ताचें नांव गोंविलें आहे. उदाहरणार्थ स्त्रग्विणी वृत्ताचें लक्षण त्यांनीं ' **राधिका रात्रिं दारीं उभी राहिली ।** श्रीधरानें शरत्कालिं ती पाहिली ।। पूर्णचंद्रानना ध्वांतविध्वंसिनी । पूर्णिमासी-वमुक्ताफल**स्त्रग्विणी** ।।' असें केलें आहे. वृत्तदर्पणकारांनीं संस्कृत कधीं-चीच माहिती मराठींत गोंविली आहे, यापेक्षां विशेष कांहीं केलें नाहीं. अलीकडे प्रो. माधवरावजी **पटवर्धन** यांनी ' छंदोरचना ' या नांवाचें उपयुक्त पुस्तक लिहून मराठी छंदोवाङ्मयांत उत्तम भर घातली आहे. त्यांत त्यांनीं पूर्वींची जाति व वृत्तें यांचा समावेश करून केवळ प्राकृत म्हणजे मराठी भाषेंत प्रचलित असलेलीं ओवी, अभंग, साकी, दिंडी, विविध चालींचीं पदें, आरत्या वगैरे यांचीही मात्रा व लघुगुरुक्रम यांची माहिती देऊन फोड केली आहे, त्यांचीं लक्षणें बनविलीं आहेत व त्याकरितां चतुक्षरी, पंचाक्षरी वगैरे गणांची कल्पना करून त्यांचा

उपयोग करून दाखविला आहे. कांहीं विशिष्ट वृत्तांत थोडासा मात्रांचा अथवा गणांचा फरक केला असतां अथवा कांहीं गणांचा लोप व कांहीं गणांची भरती केली असतां विविधवृत्तें कशीं बनतात हेंहि त्यांनीं मार्मिकपणें दाखविलें आहे, व ही त्यांची कल्पना पाहिली म्हणजे पिङ्गलानें **'ककुभ् मध्ये चेदन्त्यः ' ' पुर उष्णिक् पुरतः ' ' परोष्णिक् परतः'** इत्यादि सूत्रांचें स्मरण होतें. कारण यांतही गायत्री छंदाच्या दोन चरणामध्यें जगतीछंदाचा चरण आला तर तो ' ककुभ् ' छंद होतो. तोच जगती-छंदाचा चरण प्रथम आला तर तो छंद ' पुरउष्णिक् ' होतो. तोच जगतीछंदाचा चरण शेवटी आला तर तो छंद ' परोउष्णिक् ' होतो असें कांहीं विशिष्ट छंदांच्या चरणाच्या पूर्वोत्तर स्थितिमुळें भिन्न भिन्न छंद होतात म्हणून सांगितलें आहे. छंदोरचनेंत याहीपेक्षा सूक्ष्म विचार करून विविधवृत्तांची व्यवस्था समर्पक रीतीनें केली आहे. तसेंच पूर्ण, अपूर्ण, वृद्ध या संज्ञांचा त्यांनी जो उपयोग केला आहे तोहि पिङ्गलाच्या **'निचृत्, भूरिक्** या संज्ञाप्रमाणेंच आहे. कारण पिङ्गलानें ' **उनाधिकेनै-केन निचृद्भूरिजौ** ' (३–५९) या सूत्रानें गायत्री वगैरे छंद एका अक्षरानें न्यून असतील तर त्याला 'निचृत्गायत्री' म्हणावें व एका अक्षरानें ते अधिक असतील तर त्यास ' भूरिक्गायत्री ' म्हणावें असें सांगितलें आहे तात्पर्य प्रो. माधवरावजी पटवर्धन यांनीं छंदज्ञानाच्या सुगमतेसाठीं योजिलेले हे प्रकार पिङ्गलाच्या छंदःसूत्रांत बीज रूपानें असलेले पाहिले म्हणजे त्यांच्या मार्मिकतेविषयीं कोणासहि आश्चर्य वाटेल. प्रो. मजकुरानीं प्राचीन मराठी छंदःशास्त्रज्ञांच्या अनुरोधानें लघुगुरूंच्या लिपीसंबंधानें थोडासा घोटाळा केलेला दिसतो. तेव्हां त्यासंबंधानें थोडेसें लिहिणें भाग आहे. वृत्तरचना ही लघुगुरूंच्या विशिष्ट क्रमावर अवलंबून असल्यामुळें वृत्तांचें स्वरूप दाखविण्याकरतां छंदःशास्त्रकारांनी लघुगुरूंची सांकेतिक लिपी तयार केली आहे. 'लघु हा सरळ रेषेनें (।) दर्शविला जातो व गुरु वक्र

रेषेनें (ऽ) दर्शविला जातो. अर्वाचीन संस्कृत विद्वानांनीं लघु (–) अशा सरळ रेषेनें व गुरु (⌣) अशा अर्धवर्तुलानें दाखविण्याची पद्धति स्वीकारिली आहे. प्राचीन पंडित अक्षरप्रमाणें सरळ पंक्तींत लघु गुरू चिन्हें मांडित असत अर्वाचीन विद्वान अक्षरपंक्तीच्या वरच्या बाजूस शीर्षरेखवर लघुच्यावर लघूचें (–) असें व गुरूच्यावर गुरूचें (⌣) असें चिन्ह मांडतात. पहिली पद्धति नुसतें छंदाचें स्वरूप दाखविण्यास युक्त आहे. तर दुसरी पद्धति पद्यांतील अक्षरावर चिन्हें देऊन गण ओळखण्यास सोईची आहे. उदाहरणार्थ मृगी वृत्त घेतलें तर प्राचीन पद्धतीनें ऽ।ऽ असें त्याचें स्वरूप दाखवितां येईल. अर्वाचीन पद्धतीनें **सा मृगीलोचना राधिका श्रीपतेः** ॥ असें दाखवितां येईल. दुसरी पद्धति नागरलिपीच्या दृष्टीनें थोडीशी गैरसोईची आहे. कारण या लिपींत वेलांटी व मात्रा या विशेष असल्यामुळें त्यावर लघुगुरु हें लिपीनें दाखविणें गैरसोईचें होतें. गुरू वक्र रेषेनें व लघु सरळ रेषेनें दाखवावा याविषयीं **'रेखाभ्यामृजुवक्राभ्यां ज्ञेयौ लघुगुरू क्रमात्।'** अशीं छंदोग्रंथांत अनेक वचनें लघुगुरूंचें लिपींतील स्वरूप दाखविणारीं आहेत. तेव्हां लघुगुरूच्या लिपीसंबंधानें असा प्राचीनांचा स्पष्ट संकेत असतांना व संप्रदाय अनविच्छन्न चालू असतांना प्रो. **पटवर्धन** यांनीं आपल्या छंदोरचनेंत कांहीं कारण न सांगतां हा क्रम फिरविला आहे, म्हणजे ते लघु (⌣) अशा वक्ररेषेनें व गुरु (–) अशा सरळ रेषेनें दाखवितात. आमच्यामतें कारणावांचून पूर्व संप्रदायांत निरर्थक फरक करून घोटाळा करणें युक्त नव्हे. ही पद्धति अर्वाचीन मराठीसाहित्यभक्तांनीं अनुसरली असल्यामुळें कदाचित् त्यांनीं घेतली असावी; पण तें युक्त नव्हे. असो. यापुढें प्रस्तुत ग्रंथकार रा. **य. स. कोरेकल** यांची रचना पाहिली म्हणजे विविधवृत्तांचा समावेश त्याकरितां विविध मनोहर विषयांची निवडणूक व सर्ववृत्तरचनेविषयीं प्रतीत होणारें त्यांचें प्रभुत्व इत्यादि गोष्टींविषयीं त्यांचा

दृढ व्यासंग व सतत परिश्रम पाहून त्याबद्दल कौतुक वाटतें. असो.

आतां आपण छंदःशास्त्रांतील लघुगुरूंचा थोडासा विचार करूं; कारण छंदःशास्त्र हें लघुगुरूंच्या विशिष्ट संख्येवर व विशिष्टक्रमवार अवलंबून आहे. लघु अक्षराची एक मात्रा व गुरु अक्षराच्या दोन मात्रा मानितात. व्याकरणशास्त्रांत प्लुत म्हणून त्रिमात्राक स्वर मानितात. परंतु छंदःशास्त्रांत त्याचा उपयोग नाहीं म्हणून तो घेत नाहीत. सामान्यतः ऱ्हस्वस्वराची एक मात्रा व दीर्घ स्वराच्या दोन मात्रा असतात. त्यामुळें त्यासच क्रमानें लघु गुरु अशा संज्ञा आहेत. येथें सामान्यतः म्हणण्याचें कारण संयुक्त अक्षराच्या पूर्वीचा स्वर तसेंच ए, ओ हे दोन स्वर वैयाकरण द्विमात्राक अर्थात् गुरु मानतात. परंतु छंदःशास्त्रांत त्यांचा द्रुत उच्चार केला असतां त्यास लघु (एकमात्राक) मानितात. ' **अरेरे कथय वार्तां स्फुरति तस्य नासि चित्राम्** ।' ह्या मालिनीच्या चरणांतील पहिला नगण असल्यामुळें ' रे रे ' हीं दोन्हीं अक्षरें लघु मानावीं लागतात. छंदःशास्त्रकारांनीं ' **सानुस्वारो विसर्गान्तो दीर्घो युक्तपरश्च यः । वा पादान्तेत्वसौग्वक्रो ज्ञेयोन्यो मात्रिको लजुः** ॥' असें लघुगुरूंचें परिगणन केलें आहे. या कारिकेचा अर्थः—अनुस्वारानें युक्त, विसर्गान्त, दीर्घ, संयुक्तव्यंजनामागील ऱ्हस्वस्वर, हे सर्व गुरु समजावेत व ते लिपींत वक्र रेषेनें म्हणजे ऽ असें लिहावेत. श्लोकाच्या चरणाच्या शेवटीं असणारा लघु हा विकल्पानें गुरु समजावा. म्हणजे तो आपल्या सोईप्रमाणें लघु किंवा गुरु म्हणून मानावा. यावांचून इतर स्वर लघु (एकमात्राक) समजावेत. चरणाच्या अंतीं असणाऱ्या लघूला जें स्वच्छेनें लघु किंवा गुरु समजावें म्हणून सांगितलें आहे तें ज्या वृत्तामध्यें पादांतीं तो गुरु केला असतां वैरस्य उत्पन्न होईल तेथेंच लघु समजावा व तसेंच जेथें लघु उच्चार केला असतां वैरस्य उत्पन्न होईल तेथें गुरु समजावा असें वृत्तानुसारी हें लघुत्व गुरुत्व विकल्पें करून समजावें. उदाहरणार्थ 'समानी' वृत्त हें एक गुरु पुढें एक लघु अशा क्रमानें आठ अक्षरें आलीं

म्हणजे होतें. तेथें शेवटलें अक्षर गुरु केलें तर शेवटीं दोन अक्षरें गुरु होऊन पूर्वप्रक्रांतक्रमास विरोध येऊन वैरस्य उत्पन्न होतें. तेव्हां तेथें पादांतस्थ अक्षर लघु मानणें युक्त होते. '**ओं नमो जनार्दनाय।पापसंघ मोचनाय॥ दुष्टदैत्य मर्दनाय। पुण्डरीक लोचनाय॥**' येथें गुरु व लघु क्रमानें एकापुढें एक येत असल्यामुळें पादांतस्थ अक्षर लघुच शोभतें. दमनक, सुराज वगैरे वृत्तांचीहि अशीं उदाहरणें दाखवितां येतील. याचप्रमाणें पादांतीं जर गुरूच सौकर्योत्पादक होत असेल तर तेथें लघु अक्षरास गुरुत्व मानावें. उदाहरणार्थ 'प्रमाणी' वृत्त घ्यावें. त्यांत प्रथम लघु व नंतर गुरु या क्रमानें आठ अक्षरें येतात. तेव्हां तेथें पादान्तीं लघु ठेविला तर वैरस्य उत्पन्न होतें म्हणून शेवटीं गुरूच ठेवावा लागतो. असो. त्याचप्रमाणें '**तस्याः खुरन्यासपवित्रपांसु**' येथें शेवटचा उ गुरु करावा लागतो. नाहींतर वैरस्य उत्पन्न होतें. तात्पर्य पादांतस्थ लघूचा उच्चार लघु किंवा गुरु करणें हें कवीच्या इच्छेवर अवलंबून नसून वृत्ताच्या सुभगतेवर आहे.

संयोगाच्यापूर्वीं असलेल्या लघूस गुरुत्व येतें असा सामान्य नियम परंतु यासहि बरेच अपवाद आहेत. हे अपवाद '**संयुक्तपूर्वोऽपि लघुः क्वचित्स्याद्वर्णस्तु प्राकृतादिगतो विभाषा। ए ओ क्वचित्प्राकृतके लघूस्तः इंहीं तथा बिंदुयुते पठित्वा॥**' 'इहिआरा बिंदुजुआ ए ओ सुद्धा अ वण्णामिलिआ वि लहू। रहवज्जवणसंजोए परे असेसं विहोइ सविहासम्॥' '(**इंहिकारौ बिंदुयुतौ ए ओ शुद्धौ च वर्णमिलितावपि लघू। रेफहकारौ व्यंजनसंयोगे परे अशेषमपि सविभाषम्॥**) जइ दीहो विअ वण्णो लहु जीहा पढइ होइ सो वि लहू। वण्णो वि तुरिअ पढिओ दोत्तिण्णि वि एक्क जाणेहु॥' (**यदि दीर्घमपि वर्णं लघु जिह्वा पठति सोऽपि लघुः। वर्णौ (वर्णा वा) अपि त्वरित पठिता द्वौ त्रयो वा एकं जानीत॥**) '**पादादौ हि वर्णस्य संयोगः क्रम संज्ञितः। परस्थितेन तेन स्याल्लघुतापि क्वचिद्गुरोः**' या सर्व वचनांचा भावार्थ असा आहे कीं 'प्र' 'व' 'न्ह' या संयुक्त-

वर्णाच्यापूर्वी येणारा ऱ्हस्व स्वर लघु समजावा; किंवा साधारणपणें संयुक्त व्यंजनापूर्वीचा ऱ्हस्व स्वर विकल्पानें लघु समजावा. ए व ओ हे स्वर प्राकृतांत क्वचित् ऱ्हस्व असतात. सानुनासिक इकार व हिकार प्राकृतांत ऱ्हस्व समजावेत. त्याचप्रमाणें दीर्घ स्वराचा द्रुत उच्चार केला तर तेथें तोहि लघु समजावा. तसेच दोन अथवा तीन अक्षरें शीघ्रोच्चारित केलीं तर तें एकच अक्षर मानावें. या अपवादाचीं क्रमानें उदाहरणें अशीं आहेत:—' **तव ह्रियापह्रियो मम ह्रीरभूत्** ' ' **मम प्रिये क्व समेष्यति तत्पुनः** । ' पदाच्या आदि जो संयुक्तवर्ण असतो त्यास क्रम अशी पारिभाषिक संज्ञा आहे. तो पुढें आला असतां तत्पूर्वस्वरास गुरुत्व येत नाहीं उदाहरणार्थ—'**भ्रमति भ्रमरनारी कानने विप्रयुक्ता** ।' कोणी '**पदादि**' याबद्दल '**पादादि**' असा पाठ घेऊन पादाच्या आदि येणारा जो संयुक्तवर्ण तो क्रमसंज्ञक होय असा अर्थ करतात व ' **स्वल्प व्ययेन सुंदरि ग्राम्यजनो मधुरमश्नाति** । ' हें उदाहरण देतात. ' **अरेरे कथय वार्तां मे**' हें ऱ्हस्व एकाराचें उदाहरण पूर्वी दिलेंच आहे. 'ऐशा काव्या कराया हिकडुन तिकडुन आणुनी बुद्धि दे चक्रपाणी ' हें अर्वाचीन विनोदी पद्य द्रुतोच्चारामुळें अनेकाक्षरास एकाक्षरत्व येतें हें दाखविण्यास उपयुक्त होईल. येथें हिकडुन तिकडुन हीं आठ अक्षरें द्रुतोच्चारानें चार अक्षराबद्दल योजिलीं आहेत. अशी रचना युक्त नव्हे असें विद्वानांचें मत आहे व तें युक्त आहे. प्राकृत पिङ्गलांत अशीं क्वचित् उदाहरणें सांपडतात म्हणून अगतिक गतित्वानें या पद्धतीचा समावेश अपवादांत त्यांनीं केला असावा. प्राकृत पिङ्गलानें संयुक्तव्यंजनापूर्वीच्या स्वरास जें वैकल्पिक गुरुत्व सांगितलें आहे तें मराठी भाषेतील उच्चारास विशेष उपयुक्त असल्यामुळें त्याविषयीं थोडासा विचार करूं. संयुक्त अक्षराचा सावकाश उच्चार केला असतां त्यांतील पहिलें असणारें व्यंजन पूर्वस्वराशीं संबद्ध झाल्यासारखें होऊन त्याच्या उच्चारांत मिसळल्यासारखें होतें. अर्थात् तो उच्चार अर्धमात्रेनें वाढतो व त्यास

गुरुत्व येतें. संयुक्ताक्षराचा द्रुत उच्चार केला तर त्यांतील पहिलें व्यंजन पूर्वस्वरांशीं संबद्ध होत नाहीं. त्यामुळें पूर्वस्वर एकमात्रक राहात असल्यामुळें तो ऱ्हस्वच राहतो. असें संयुक्त अक्षरांचे द्रुत व सावकाश उच्चार केलें असतां अनुभवास येतें. स्वरापुढें व्यंजन आलें व तें स्वरोच्चारांत सामील झालें म्हणजे तो स्वर दीड मात्रेचा होऊन गुरु होतो याविषयीं एक उदाहरण घेऊन विवेचन करूं म्हणजे वाचकांस आम्हीं काय म्हणतों तें कळेल ' मी आत्मा हृत् इंद्रियें देह वाणी'हा शालिनी वृत्ताचा चरण आहे. शालिनी वृत्तांत दुसरा गण तगण म्हणजे अंत्य लघु असतो. व तो येथें 'हृ' या ऱ्हस्व स्वरांशी 'त्' हें व्यंजन संलग्न करून त्याचा उच्चार दीड मात्रेचा बनवून त्यास गुरुत्व आणून निष्पन्न केला आहे. संस्कृत पद्धतिप्रमाणें तो ' त् ' जर पुढचा ' ई 'शीं जोडून त्याबरोबर त्याचा उच्चार केला तर पाठीमागील हृ ला गुरुत्व येणार नाहीं. तात्पर्य जेव्हां 'त'हा हृ बरोबर जोडून ई पासून निराळा करावा तेव्हांच पूर्वस्वरास गुरुत्व येतें. ही गोष्ट ध्यानांत घेतली म्हणजे आतां संयुक्त व्यंजनापूर्वीच्या स्वरास प्राकृत पिङ्गलानें विकल्पानें गुरुत्व कां सांगितलें हें वाचकांस कळेल. ज्यावेळी संयुक्त व्यंजनांतील प्रथम व्यंजन सावकाश उच्चारामुळें पूर्वस्वरांशीं संबद्ध होतें तेथें तो स्वर गुरु होतो जेथें द्रुत-उच्चारामुळें तें पूर्वस्वराशीं संबद्ध होऊन उच्चारिलें जात नाहीं तेथें तो स्वर ऱ्हस्व राहतो व हे दोन्हीं प्रकारचे उच्चार व्यवहारांतील भाषेंत होणें स्वाभाविक असल्यामुळें व्यावहारिक भाषेंत संयुक्त व्यंजनापूर्वीच्या स्वरास गुरुत्व जें सामान्यतः विकल्पानें सांगितलें आहे तें बरोबर आहे. व्यंजनाध्यासंबंधानें पूर्व स्वराच्या उच्चारातील हा भेद लक्षांत घेऊन छंदःशास्त्रकारांनीं गुरूचें परिगणन करतांना ' **दीर्घं संयोगपरं तथा प्लुतं व्यंजनान्तमुष्माणम्** ' या कारिकेंत 'व्यंजनान्तं' असें पद घातलें आहे. तेव्हां व्यवहारांतील उच्चारासंबंधीं हा स्वाभाविक नियम लक्षांत घेतला म्हणजे मराठी भाषेमध्यें 'तुम्हीं' 'आम्हीं' वगैरे अनेक शब्दांतील

संयुक्तव्यंजनापूर्वीच्या स्वरास वैकल्पिक गुरुत्व मानून काव्यांत जो व्यवहार केला जातो त्याचा उलगडा होतो. या दोन प्रकारच्या उच्चारास शिथिलोच्चार, द्रुतोच्चार किंवा साघात उच्चार, निराघात उच्चार या शब्दांनीं संबोधण्यास हरकत नाहीं असें समजून आम्हीं छंदोमंजरींत आघात शब्द योजून लघुगुरु विचार केला आहे. परंतु हें लक्षांत न घेतां कांहीं विद्वान् मंडळींनीं आघात याचा 'ॲक्सेंट' हा अर्थ घेऊन "मराठी भाषेंत इंग्रजीप्रमाणें ॲक्सेंट नाहींत तेव्हां हें शास्त्रीबुवांचें लिहिणें उपेक्ष्य आहे " असा उपहासपूर्वक ध्वन्यर्थ जो प्रगट केला आहे त्याच्या युक्तायुक्ततेचा छंदःशास्त्रवेत्त्यांनीं विचार करावा.

आतां आपण यतीसंबंधानें थोडासा विचार करूं. 'श्लोकेषु नियतस्थाने पदच्छेदं यतिं विदुः ।' असें आचार्य दंडीनें यतीचें लक्षण केलें आहे.' यतिर्विच्छेदसंज्ञकः' असें केदारभट्टानें यतीचें लक्षण दिलें आहे. गंगादास 'यतिर्जिव्हेष्टविश्रान्तिस्थानं कविभिरुच्यते ' असें यतीचें लक्षण देतो. सहाव्या अध्यायाच्या आरंभीं 'यतिर्विच्छेदः' असें यतीसंबंधानें पिङ्गलानें सूत्र दिलें आहे. सर्वांचें तात्पर्य पद्यामध्यें ज्या ठिकाणीं थोडी विश्रांति घेणें अवश्य असतें त्या स्थानास यति म्हणतात व या यतीचा भंग म्हणजे तेथें विश्रांति घेतली असतां पदाचा अनुचित छेद होणें हा होय. 'संहितैकपदे नित्या नित्या धातूपसर्गयोः । नित्या समासे 'असा संहिताविषयीं(अविच्छिन्न उच्चाराविषयीं) नियम आहे. या नियमाचा यतिमुळें भंग झाला म्हणजे अथवा अविच्छिन्न उच्चारामुळें यतीचा भंग झाला म्हणजे तो यतिदोष समजतात. कारण त्यामुळें म्हणण्याच्या पद्धतींत वैरस्य उत्पन्न होतें. या यतीचे अनेक प्रकार आहेत. यति हा पादान्तीं, श्लोकार्धान्तीं किंवा कांहीं वृत्तांत विशिष्ट स्थानीं असतो. उदाहरणार्थ सर्व पद्यांच्या पादान्तीं, मंदाक्रान्तेच्या चवथ्या व दहाव्या अक्षरावर, स्रग्धरेच्या सातव्या अक्षरावर, शालिनीच्या चवथ्या अक्षरावर व शार्दूलविक्रीडिताच्या बाराव्या अक्षरावर यति असतो.

याप्रमाणें वृत्तांत जिल्हेला विश्रांति अवश्य असलेल्या ठिकाणीं जे शब्द विश्रांति न घेतां उच्चारावयास पाहिजे त्या शब्दांची योजना केली असतां किंवा अविच्छिन्नोच्चार्थ शब्दामध्यें यति येईल अशी रचना केली असतां यतिभंग हा दोष होतो. पद हें सविभक्तिक व लुप्तविभक्तिक असतें. प्लुतविभक्तिक जें सामासिक पद त्यांतील प्रकृतिरूपानें असणारी जीं पदें त्यांचा भंग न होतां सामासिक पदामध्यें विश्रांति घेतली तर ती विशेष दोषावह मानीत नाहींत. तात्पर्य तो यतिभंग विशेष वैरस्योत्पादक होत नाहीं. दोन पदांतील स्वराचा संधि होऊन ती एकवटली असली म्हणजे त्या संधीवर जर विश्रांति येईल तर तो यतिभंग होईल. चादि अव्ययें हीं या यतिविश्रांतीनें पुढील पदांशीं संलग्न होत असतील व प्रादि उपसर्ग यतिविश्रांतीमुळें मागील पदांशीं संलग्न होतील तर तो यतिभंग दोष होतो. कारण चादि हे पूर्वपदांशीं व प्रादि हे उत्तरपदांशीं संलग्न असलेले असेंच नेहमीं उच्चारांत असतात. व त्यांचा संबंधहि त्या पदाकडेच असतो. या सर्व प्रकारच्या यतिभंगाचीं ओळीनें उदाहरणें घेऊं. ' **नमस्तस्मै-महादेवा य शशांकार्धधारिणे ।**' येथें पादान्तीं यतिभंग होत आहे. '**तुझ्या पदाब्जीं मनभृंग नारा । यमा असो दे यदुनाथ धारा ॥ धरा समात्विन्मधुसूदना वा । मना दयासिंधु सदैव देवा ॥** ' येथें पादांतीं व अर्धांतीं यतिभंग साधें पद व सामासिक पद यांनीं झालेला आहे. ' **एतस्या रा जति मुखमिदं पूर्ण चन्द्र प्रकाशम् ॥** हा मंदाक्रान्तेचा चरण असल्यामुळें प्रथमच्या चवथ्या अक्षरावर यति आहे. त्यामुळें राजति पदाचा भंग होऊन यतिभंग झाला आहे. तेव्हां हें पदान्त यतिभंगाचें उदाहरण होय. ' **स्वादुस्वच्छं, च हिमसलिलं प्रीतये कस्य न स्यात् ।** ' येथें चवथ्या अक्षरावर यति असल्यामुळें 'च' हें अव्यय पूर्वपदाशीं संबद्ध न होतां उत्तरपदाशीं संबद्ध झाल्यासारखें होतें. त्यामुळें यतिभंगदोष होतो. ' **दुःखं मे प्र क्षिपति हृदयं दुःसहस्त्वद्वि-**

**योगः** ॥ येथें प्र या अक्षरावर यति आल्यामुळें तो पूर्वशब्दाशीं संबद्ध होतो; परंतु तो उपसर्ग असल्यामुळें **क्षिपति** या धातूबरोबर संबद्ध होणें युक्त आहे. त्यामुळें हा यतिभंग होत आहे. '**स्यादस्थानोपगत यमुनासंगमेवाभिरामा**' '**जम्भारातीभकुम्भोद्भवमिव दधतः।**' '**दिक्कालाद्यनवच्छिन्ना नन्तचिन्मात्रमूर्तये ॥**, '**यस्या वक्त्राम्बुजमजितपूर्णेन्दुशोभां बिभर्ति ॥**' ही संधीमुळें यतिभंग झाल्याचीं उदाहरणें होत. यांतहि अनेक भेद आहेत. ते पिङ्गलाच्या छंदःशास्त्रावरील टीकेंत पहावेत. विस्तारभयास्तव ते सर्व देतां येत नाहीत. कांहीं विद्वान् "पादांतीं यतिभंग मानूं नये. अर्धान्तीं असेल तर मानावा" असें म्हणतात. कारण '**स्पर्शोक्लिष्टामयमितनखे नासकृत्सारयन्तीम**' '**सप्तर्षिहस्तावचितावशेषा न्यधो विवस्वान् परिवर्तमानः।**' अशी सन्मान्य कवींची रचना दृष्टीस पडते. व तीस '**श्वेतमाण्डव्यमुख्यास्तु नेच्छन्ति मुनयो यतिम्।**' अशी पूर्वमहर्षींची संमतिहि आहे. **प्राकृतपिङ्गल, वाणीभूषण** यामध्यें यतिविचार दिलाच नाहीं. या सर्व गोष्टीवरून विशेष अरुच्युत्पादक यतिभंग असेल तर तो दोष समजावा नाहीतर समजूं नये असेंच निष्पन्न होत आहे. चरणांमधील कांहीं स्थलीं व पादान्तीं विश्रांति घेणें हें पाठकाच्या इच्छेवर अवलंबून असल्यामुळें व विश्रांतीवांचून यतिभंग होत नसल्यामुळें तो दोष चरणामध्यें व पादान्तीं वैकल्पिकच समजावा लागतो.

पिङ्गलप्रभृति छंदज्ञांनीं आपल्या ग्रंथांत '**उक्था**' वगैरे छंदांतील लघु गुरु भिन्न भिन्न प्रकारानें मांडावयाचें झालें तर किती प्रकारानें मांडतां येतील हें पाहण्याकरितां लघुगुरु मांडण्याची एक पद्धति ठरवून किती प्रकारानें लघुगुरु त्या त्या छंदांत मांडतां येतात हें दाखविलें आहे. यास **प्रस्तार** म्हणतात.पुढें प्रस्तारांतील अमका एक प्रकार कसा असावा? किंवा एखादें वृत्त हें त्या प्रस्तारांतील कितवा भेद असावा ? हेंहि गणितानें सिद्ध करून दाखविलें आहे. या सर्वांचें विशेष विवेचन छंदोमंज-

रीच्या परिशिष्टांत आह्मीं केलें आहे. तें वाचकांनीं तेथेंच पाहावें. येथें या विषयाचा उल्लेख करण्याचें कारण कै. **विश्वनाथ काशिनाथ राजवाडे** यांनीं सरस्वती मंदिरांत " मराठी छंद " ( श्रीसरस्वतीमंदिर वर्ष ६ वें अंक९ ) या मथळ्याखालीं एक विस्तृत लेख लिहिला आहे. व त्यांत केवळ मराठी छंद म्हणून प्रसिद्ध असणारे जे साकी, दिंडी, ओवी, अभंग इत्यादि छंद, त्याचें ऐतिह्य व स्वरूप यासंबंधानें विवेचन केलें आहे. त्यांतील बरेच विषय जरी चर्चा करण्यास योग्य आहेत तरी विस्तारभयास्तव तसें न करतां केवळ अभंग व ओवी या छंदाविषयीं त्यांनीं जें विवेचन केलें आहे त्याचा संक्षेपतः विचार करूं.

कै. **राजवाडे** यांनीं प्रथमतः **उष्णिक्, अनुष्टुप्**, **त्रिष्टुप्** वगैरे सात, आठ, अकरा इ. संख्येचे वाचक म्हणून संस्कृत छंदःशास्त्रकारांनीं संज्ञा कल्पिल्या आहेत त्या देऊन त्यांतील लघुगुरूंची प्रस्तारपद्धतीनें मांडणी केली असतां जे अनेक प्रकार होतात. ते सर्व ओवी व अभंग यांचेच प्रकार असें म्हटलें आहे. म्हणजे सामान्यतः त्या सर्व प्रकारास 'ओवी' अथवा 'अभंग' म्हणण्यास हरकत नाहीं अशी त्यांची समजूत दिसते. व या संख्येचे प्रस्तारानें लक्ष कोटि भेद होत असल्यामुळें अभंग व ओवीचेहि तितके भेद मानून त्यांनीं त्यांच्या विस्ताराचें महत्त्व वर्णिलें आहे. पुढें अभंग व ओवी या शब्दांची व्युत्पत्ति दाखवून अर्थ स्पष्ट करण्याची खटपट केली आहे.या पुढें ओवी व अभंग हे प्राकृत छंद वैदिक छंदोवाङ्मयापासून उद्‌भूत झाले आहेत असें सूचित केलें आहे. यांतील प्रत्येक विधान चर्चा करण्यासारखें आहे. प्रथमतः अभंग व ओवी ही दोन स्वतंत्र वृत्तें मानितां येतील कीं नाहीं हाच प्रश्न आहे; कारण **कै. राजवाडे** यांनीं दाहाव्या कलमांत पंचाक्षरी चरणापासून दशाक्षरी चरणापर्यंतच्या अभंगाचे सुप्रतिष्ठादि प्रकार सांगितले आहेत. तेच प्रकार ओवीचेहि आहेत म्हणजे सुप्रतिष्ठादि अभंगाप्रमाणें सुप्रतिष्ठादि ओवीहि आहे. दोहोंत फरक एवढाच कीं

अभंगांतील चरणाचें उपान्त्याक्षर 'प्लुत' म्हणावें लागतें तर ओवींत अंत्याक्षर प्लुत म्हणावयाचें असतें इ.इ. परंतु हें त्यांचें म्हणणें छंदःशास्त्रपरंपरेला धरून नाहीं. कारण वैदिक छंदःशास्त्रापासून छंदःशास्त्रांतील जे ग्रंथ आहेत त्यांत छंदांची लक्षणें देताना प्लुताचा कोणीहि समावेश केलेला नाहीं. फक्त ऱ्हस्व व दीर्घ (लघु व गुरु) यावरच सर्व छंदांची घटना करून दाखविली आहे, प्लुत हा त्रिमात्रिक आहे. त्रिमात्रिकापासून पुढचें चतुर्मात्रिक वगैरे याचा उपयोग संगीतांत आहे. छंदांत नाहीं. तेव्हां प्लुतोच्चाराच्या स्थानभेदामुळें अभंग व ओवी यांत भेद दाखविणें हें पूर्वसांप्रदयास धरून नाहीं. शिवाय कै. **राजवाड्यांच्या** मतें ओवी ही वैदिकवृत्ताप्रमाणें अक्षरवृत्त, अक्षरवृत्त म्हणजे केवळ अक्षरसंख्येवर अवलंबून असणारें वृत्त अशी आहे; तेथें लघुगुरु किंवा प्लुत यांचा कांहीं संबंध नाहीं. तेव्हां ओवी अभंग हीं अक्षरवृत्तें प्लुताच्या स्थानभेदानें भिन्न कशी होणार ? हीं मात्रावृत्तें मानावीं तरी हीच नड; कारण मात्रावृत्तांत ठरलेली मात्रांच्या संख्येची परिपूर्ति झाली म्हणजे झालें. तेथें अमक्या स्थानीं ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत आला पाहिजे असें नाहीं. अभंग ओवी यांस गणवृत्तें तर कोणीच मानीत नाहींत. तेव्हां यांच्यांतील गणांची चर्चा करण्याचें कारण नाहीं. तात्पर्य स्थानभेदानें प्लुतोच्चार होतो हा जो अभंग व ओवी यांच्यांतील भेद सांगण्याकरितां असाधारणधर्म म्हणून **कै. राजवाडे** यांनीं सांगितलें आहे तें युक्त दिसत नाहीं. शिवाय अभंग व ओवी ही दोन्हीं सारखींच असतात असेंहि त्यांचें एक दोन ठिकाणीं उल्लेख आहेत. तात्पर्य **कै. राजवाडे** यांनीं अभंग व ओवींचें पृथक्करण करण्याकरितां हा जी प्लुतोच्चाराच्या स्थानभेदाची कल्पना काढली ती त्यासच पूर्ण संमत नव्हती. असो. वस्तुतः अभंग व ओवी हीं वृत्तें अक्षर, मात्रा व गण यावर अवलंबून नसल्यामुळें यांचें लक्षण बांधणें दुर्घट आहे. आमच्यामतें संस्कृतांत " वृत्तगंधी " म्हणून जो एक गद्याचा प्रकार आहे त्यांत यांचा समा-

वेश करावा. ह्मणजे हीं गद्येंच होत. परंतु त्यांच्यांत पद्याची थोडिशी झाक आहे. " **वृत्तैकदेशसंबद्धं वृत्तगंधि पुनः स्मृतम्** " असें वृत्तगंधीचें लक्षण आहे. त्याचें तात्पर्य ज्यांत वृत्ताची थोडिशी छटा आहे. परंतु त्याचें निश्चित स्वरूप अमुक एक प्रकारचें ह्मणून सांगतां येत नाहीं. थोडेसें वृत्ताक्षरसाम्य व अनुप्रास प्राचुर्य यामुळें जीं वृत्तासारखीं भासतात तीं वृत्तगंधि गद्यें होत. ओवी अभंगामध्यें जर कांहीं विशेष असेल तर तो तिन्हीं चरणांत अनुप्रास अथवा पहिल्यातिसऱ्या वगैरे चरणांत अनुप्रास ठेवणें हाच होय. या दोन्हीं छंदांत अनुप्रासावांचून अन्य विशेष दाखविणारें गमक नाहीं.

**कै. राजवाडे** यांनीं भंग शब्दाचा अर्थ कर्णमधुरध्वनि असा घेऊन व अभंग म्हणजे मधुरध्वनिशून्य असा करून हा अर्थ बसविण्याकरतां अभंगांत कर्णमधुर गणांची योजना नसते अशी कांहींतरी कल्पना केली आहे. वस्तुतः भंग याचा अर्थ मधुरध्वनि असा प्रसिद्ध नाहीं. भंगी हा शब्द विशिष्टरचना याअर्थी " **वैदर्भभंगीजुषाम्** " असा आढळतो. परंतु त्यांत माधुर्यगुणाचा संबंध नाहीं. तेव्हां भंग याचा अर्थ कर्णमधुर असा कल्पून अभंग म्हणजे मधुररचनाशून्य असा अर्थ करणें युक्त नव्हे. शिवाय अभंग कर्णमधुरध्वनींनें युक्त नसतात हेंहि अनुभवास सोडून आहे. आतां अभंग याचा अर्थ तसा घेतला तरी अभंगसदृश ओवींहि कर्णमधुर गणशून्य असल्यामुळें तो शब्द तिला कां लावूं नये हें समजत नाहीं. तेव्हां अभंग म्हणजे ज्यांत प्रतिपादिलेला अर्थ अथवा तत्त्व विनाशी नाहीं अथवा जो आपल्या गुणवैशिष्ट्यामुळें भंग पावत नाहीं तो अभंग अशी त्याची व्युत्पत्ति करणें युक्त आहे. संस्कृतांत ज्याप्रमाणें 'सुभाषित हा मनोहर पद्याला शब्द योजितात त्याप्रमाणें मराठींत मनोहर अर्थविषयक पद्याला 'अभंग' म्हणतात. 'ओवी' ह्यांत "वे" धातु घेऊन त्याचा अर्थ ओवणें असल्यामुळें जींत संपूर्ण विषय-मग तो वेदान्त असो किंवा इतर कोणताहि असो—गोंवला असतो ती

ओवी असा करणें युक्त होय. ज्ञानेश्वरांनीं संपूर्ण गीतार्थ (वेदान्तविषय) तींत ओवीला आहे म्हणून त्यांच्या पद्यास ओवी म्हणणें सयुक्तिकच आहे. तात्पर्य 'अभंग' हें स्फुट पद्या (सुभाषित वगैरे) प्रमाणें व 'ओवी' संपूर्ण विषय जींत गोंविला आहे (संस्कृतांत ज्याला कोश वगैरे म्हणतात त्याचप्रमाणें) असें अर्थावरून शब्द प्रसृत झाले आहेत. त्यावरून यांच्या रचनेंत विशेष फरक असतो असें मानण्याचें कारण नाहीं.

कै. **राजवाडे** यांनीं उक्थादि शब्दांनीं ज्या अक्षरसंघाचा बोध होतो त्यांचें प्रस्तारांनीं जितके प्रकार होतात तितकीं सारीं वृत्तें असतात असें गृहीत धरलें असावें, असें त्यांच्या या लेखांतील विवेचनावरून प्रतीत होतें. व ही गोष्ट त्यांनीं मानिल्यामुळें तिच्या अनुरोधानें पुढें त्यांनीं चतुरक्षर अभंग चौकाचे ४०९६ प्रकार होतात वगैरे विवेचन केलें आहे. या सर्व त्यांच्या विवेचनावरून ओवी, अभंग वगैरे वृत्तांचे लक्षावधि प्रकार होतात असें सिद्ध होत आहे. तें बरोबर दिसत नाहीं. कारण उक्था वगैरे संज्ञांनीं सूचित होणाऱ्या अक्षरसंघाचे प्रस्तारपद्धतीनें लक्षावधि भेद झाले तरी ते सर्व भेद वृत्तात्मकच असतात असें समजण्याचें कारण नाहीं. कारण प्रस्तारानें सिद्ध होणारे सर्व प्रकार पद्यें मानूं लागलों तर मग गद्याला अवकाशच मिळणार नाहीं. कारण गद्यांतील कोणतेंहि वाक्य प्रस्तारांतील एखाद्या संख्येच्या प्रस्तारांत येणारच. कारण वाक्यांतील अक्षरें लघुगुरुस्वरूपी असल्यामुळें तीं वाक्यें कोणत्या तरी एका विशिष्ट संख्येच्या प्रस्तारांत आलीं पाहिजेतच. वृत्तांत समान अक्षरी चरण असतात, वाक्यांतील अक्षरें समान नसतात म्हणून तीं वृत्तें मानतां येणार नाहींत, असेंहि म्हणतां येत नाहीं; कारण विषम वृत्तांतील अक्षरें सम कोठें असतात ? उपजातीचे अनेक भेद आहेत ते समाक्षरी चरणात्मक कोठें आहेत ? तेव्हां विशिष्टसंख्याक अक्षरांचे जितके प्रकार तीं सर्व वृत्तेंच असतात असें मानल्यास गद्यास अवका-

शच राहणार नाहीं व मग **'गद्यं पद्यमिति प्राहुः वाङ्मयं द्विविधं बुधाः'** हा अलंकारिकाचा उद्घोष व्यर्थ होईल. तेव्हां सर्व प्रस्ताराचीं रूपें वृत्तात्मकच आहेत हें म्हणणें बरोबर नाहीं. आमच्या मतें वृत्तांत अंगभूत ह्मणून स्वरांदोलनाची थोडिशी अपेक्षा असतेच. नाहांतर श्लोकहि गद्यासारखें वाचण्याची पद्धति पडली असती. तशी पद्धति नाहीं. विशिष्ट पद्यें विशिष्ट स्वरांदोलनांतच आपण ह्मणतों. तेव्हां पद्य व गद्यांतील हा फरक ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. तेव्हां प्रस्तारांतील ज्या ज्या स्वरूपास स्वरांदोलनाच्या विशिष्ट पद्धतीनें ह्मणतां येईल तेवढींच पद्यें होण्यास उपयुक्त असतात. इतर प्रकार वृत्तांत उपयुक्त नसतात. वृत्तांत संगीताप्रमाणें स्वरांदोलनास प्राधान्य नसलें तरी अंगभूत ह्मणून अंशतः तें असतेंच नाहीतर गद्य व पद्य यांच्या पठणांत भेदच दाखवितां येणार नाहीं. आह्मीं म्हणतों ही गोष्ट हरिणी, शार्दूलविक्रीडित वगैरे वृत्तें ऐकलीं असतां कोणासही पटण्यासारखी आहे. वाचकांच्या लक्षांत ही गोष्ट सहज येण्यासारखी आहे कीं लघु गुरूचे उच्चार दोन प्रकारचे आहेत. एक आपण भाषेंत साधेपणानें उच्चारतों तें व दुसरें संगीतांत षड्जादि स्वरांत सुरेलपणानें उच्चारतों तें. कवितेंतील लघुगुरूंचें उच्चार हे भाषेंतील साध्या उच्चारापेक्षां संगीतांतील सुरेल उच्चारांस विशेष जवळ असतात. स्वरास प्राधान्य संगीतांतच. परंतु छंदांतहि त्यास अंगभूतपणा असतोच. कवितेंत शब्दलाघव, अर्थलाघव जसें उपयुक्त असतें तसें स्वरलाघवहि उपयुक्त असतेंच. व हें साधण्याकरतांच गुरुंलघूंचें त्रिविध आन्दोलन त्यांत असतेंच. आतां कविता ही केवळ गाण्याकारितां नसते. ती तालबद्ध क्वचित् असते. तींतील तानांचें वैपुल्य किंवा शब्दावर्तन हें अर्थावगतिप्रवाहाला घातक असते. कवितेचा प्रधान उद्देश अभिप्रेतार्थ श्रोत्यांच्या मनांत खुलवून भरून द्यावयाचा; ध्वनि अथवा स्वर यांची चमत्कृति दाखविणेचा नसतो म्हणून कविता संगीतांत मोडत नाहीं. व सर्व कविता संगीतांत गायल्या

तर रसहानिहि होते. म्हणून कविता गाण्याकरतां नाहींत हें खरें तथापि त्यांस स्वराचें साहाय्य पाहिजेच. असो. तात्पर्य हेंच कीं प्रस्तारांतील जे प्रकार स्वरांदोलनास उपयुक्त तेवढेच छंदास उपयुक्त, इतर नव्हेत. आतां हें खरें आहे कीं प्रस्तुत उपलब्ध जीं वृत्तें आहेत त्यापेक्षां पुष्कळच अधिक वृत्तें पुढें प्रचारांत येतील. व तीं या प्रस्तारांतीलच असावयाचीं. परंतु तसें झालें तरी सर्वच प्रस्ताराचे प्रकार वृत्तात्मक होऊन भाषा गद्यमय नष्ट होईल असें वाटत नाहीं. सर्व प्रस्ताराचे प्रकार वृत्तात्मक मानूं लागलों तर 'उत्कृति'छंदाचे सहा कोटी एक्काहत्तर लक्ष आठ हजार आठशें चौसष्ट(६,७१,०८,८६४)इतके प्रस्तारानें प्रकार होतात. इतकीं वृत्तें होणें शक्य आहे कां? प्रस्तार वगैरे पद्धतीचा उपयोग इतकाच कीं कोणतेंहि वृत्त घेतलें तरी तें कोणत्या अक्षरसंख्येच्या प्रस्तारांत कितवें बसतें, किंवा अमुक एक अक्षरसंख्येच्या प्रस्ताराचें अमुक रूप कसें असेल, विशेषतः अमुक संख्याक अक्षराचे लघुगुरूंच्या क्रमभेदानें किती प्रकार होतात? ह्या गोष्टींचा उलगडा करणें हा होय.

असो. येथपर्यंत कै. **राजवाडे** यांच्या दोन चार मुद्यांचें विवेचन केलें तें त्यांच्या पश्चात् दोषबुद्धीनें त्यांच्या लेखांतील न्यूनत्व दाखविण्याकरतां केलें नसून त्यांनीं जो प्रतिभापूर्ण विचार केला आहे त्या संबंधानें चर्चा होऊन त्यांत भर पडावी हाच मुख्य उद्देश ठेवून केलें आहे. नाहींतर त्यांच्या पश्चात् आज १९।२० वर्षांनीं त्यांच्या लेखाचा खल करण्याचें कांहीं कारण नव्हतें. तेव्हां वाचकांनींहि हाच आमचा उद्देश पुढें ठेवून या विषयाची चर्चा करावी व विषयाचें स्वरूप विशद करावें अशी आमची प्रार्थना आहे.

असो. येथपर्यंत छंदःशास्त्रासंबंधानें संक्षेपतः विवेचन, अर्वाचीन विद्वानांनीं छंदःशास्त्रासंबंधानें केलेल्या विवेचनाची थोडिशी चर्चा वगैरे गोष्टीं झाल्या. आतां शेवटीं एक आनंदाची गोष्ट करून हा **उपोद्घात** पुरा करूं. वस्तुतः **उपोद्घात** म्हणजे प्रतिपाद्य विषयाची पीठिका.

त्यांत प्रतिपाद्य विषयाचे ऐतिह्य, संप्रदाय, त्या विषयाची उत्क्रांती वगैरे गोष्टींची माहिती दिली म्हणजे उपोद्घाताचें काम संपलें; कारण "**चिन्तां प्रकृतसिद्धार्थामुपोद्घातं विदुर्बुधाः॥**" असें उपोद्घाताचें लक्षण आहे तेव्हां प्रकृत विषयाला उपयुक्त अशी माहिती देऊन विषयाचें स्वरूप संक्षेपानें सांगितलें म्हणजे उपोद्घातलेखकाचें काम संपलें.तथापि ग्रंथलेखकाची विद्वत्ता परिश्रम वगैरे संबंधानें प्रेमानें दोन शब्द लिहिलें तर त्यावरूनहि एक प्रकारें ग्रंथाचें महत्त्व समजून वाचकांची त्याच्या वाचनाविषयीं प्रवृत्ति होते. व त्यामुळें त्या विषयाचें ज्ञान होतें. तेव्हां ती माहितीहि एक प्रकारें उपोद्घाताच्या विषयांत प्रविष्ट होतेच. असो. **काव्यकौस्तुभ,वृत्तसम्राट,सकलकलाकोविद** इत्यादि पदव्यांनीं विभूषित असलेले कविवर्य श्री.**यशवंतरावजी कोरेकल** यांचा व आमचा साक्षात्परिचय नसला तरी **राजहंस**-मासिक व **महाराष्ट्र सांवत्सरिक, बृहन्महाराष्ट्र** इ. त त्यांचे जें त्रोटक चरित्र प्रसिद्ध झालें आहे त्यावरून रा. **यशवंतरावजी** हे सदाचरणी व विरक्त असून आत्मज्ञानप्रवण आहत असें दिसून येते. प्रस्तुतकालीं अशा अधिकाराचीं माणसें दुर्मिळ असल्यामुळें त्यांच्याविषयीं प्रेमयुक्त आदर उत्पन्न होणें युक्त आहे. रा. **यशवंतरावजींचा** असा अधिकार असूनहि गायनवादनादि कलांत ते निपुण आहेत हें विशेष आश्चर्याचें होय. कारण विषयविन्मुख गृहस्थ हे काव्यकलादिकाविषयीं पराङ्मुखच असावयाचे; परंतु अनासक्तियोग म्हणून भगवंतांनीं गीतेंत जो उपदेशिला आहे तो ग्रहण कर ण्याचा अधिकार रा. **यशवंतरावजींचा** असल्यामुळें अध्यात्मवृत्ति असून गायनवादन कलादिकांमध्यें त्यांना नैपुण्य संपादितां आलें आहे. त्यांच्या काव्यकर्तृत्वाविषयीं आह्मीं कांहीं विशेष लिहावें असें नाहीं; कारण **महामहोपाध्याय श्रीमुकुंदजी शास्त्री. रा. विष्णुशास्त्री बापट. रा. सदाशिवराव श्रोत्रिय, रा. भय्याशास्त्री** प्रभृतींनीं त्यासंबंधानें त्यांची मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे. तेव्हां आह्मीं तरी विशेष काय

सांगणार ? तथापि प्रस्तुत पुस्तकावरून आम्हांस हें कळविण्यास आनंद वाटतो कीं रा. **कोरेकल** यांचें सर्व वृत्तांवर प्रभुत्व असून कवित्व हें सहजोद्गार रम्य आहे. तसेंच त्यांचें पर्शियन व उर्दू भाषेवरहि प्रभुत्व आहे हीं गोष्ट त्यांची त्या भाषेंतील अभिजात काव्यें सिद्ध करीत आहेत तेव्हां अशा कविसम्राटाच्या हातून अशीच ग्रंथनिर्मिति होण्यास श्रीप्रभु त्यांस दीर्घायुष्य, आरोग्य व उत्साहशक्ति देवो ! अशी सद्भावना व्यक्त करून हा लांबलेला उपोद्घात पुरा करतों.

**वाई.** रामडोह–आळी.
मि. अ. वै. शु. १२ गुरुवार
शके १८५६

**वाई रंगाचार्य.**



*

॥ श्रीगुरु माणिक समर्थ ॥

# प्रकाशकाचे चार शब्द.

जी मति काव्योच्छ्वासवती । चिज्जगतीं अव्याहत ती-॥
चालत आकाशीं वितरे । काव्यसमुद्रीं तेविं तरे ॥१॥

का. कु. क. द्वितीय-उद्भव "पुष्पपाकळ्या"

केवळ प्रकाशक एवढाच या पुस्तकाशीं माझा संबंध नाहीं, तर यापेक्षां जास्त जिव्हाळ्याचा आहे हें मी प्रथमोद्भवावरील प्रकाशकाच्या चार शब्दांतील प्रथम वाक्यात नमूद केलेंच आहे; आणि विशेषतः कविवर्य यशवंतरावजीशीं व त्यांच्या काव्याशीं माझें जें उत्कट सान्निध्य आहे त्यामुळेंच या द्वितीयोद्भव "पुष्पपाकळ्या" वरीह प्रकाशक म्हणून मी पुढें येत आहे. हा प्रेममय स्वकीयतेचा मान आहे, व तो मिळाल्या-बद्दल कोणासहीं आनंदच वाटेल.

श्री. प्रो. श्री. नी. चापेकर. एम. ए. एल. एल. बी. यांनीं याच कवीच्या प्रथमोद्भवावर अत्युत्कृष्ट प्रस्तावना लिहून जसें माझें कार्य सुकर केलें आहे त्याचप्रमाणें या पुस्तकास विद्वद्वर्य वे. शा. सं. पंडित रंगाचार्य रड्डि यांनीं उद्बोधक व विद्वत्ताप्रचुर उपोद्घात लिहून आणि छंदशास्त्राचा बहुतेकांना अज्ञात असा इतिहास आपल्या व्यासंगी व परिपक्व लेखणीनें उध्दृत करून या शास्त्राच्या अभ्यासूंवर उपकार करून ठेवलें आहेत त्याबद्दल शब्दानें त्याचे कितीहि आभार मानलें तरी ते अपुरेंच ठरतील. त्यांनीं फक्त मजकडे प्रकाशक या नात्यानें औपचारिक भाग लिहिण्याचें शिल्लक ठेविलें आहे म्हणून या उभयतां विद्वानांनीं आस्थेनें आपल्या अधिकारयुक्त लेखनीद्वारां केलेल्या ज्ञानसंतर्पणाबद्दल कवि यशवंतरावजी प्रमाणें मीहि त्यांचा अत्यंत आभारी आहे. 'उपोद्घात' लाभण्यापूर्वीं किंबहुना त्याबद्दलचें आश्वासन

मिळण्यापूर्वीच "**वाचनापूर्वी**" हा लेख कविवर्य **यशवंतरावजी कोरेकल** यांनीं लिहिला व त्याचें मुद्रणही होऊन चुकल्यामुळें ही त्यांची हार्दिक इच्छा हृदेकता व आत्मीयता या नात्यानें माझ्या लेखणींतून आज ती अशा स्वरूपांत पूर्ण होत आहे.

स्वतःचा थोडा परिचय व आभारप्रदर्शनाचें गोड काम संपलें; आतां प्रस्तुत पुस्तकाच्या प्रकाशनास आवश्यक अशा विषयाचा उपन्यास करूं.

या शास्त्रीय पुस्तकाचा उद्देश संस्कृतांत उपलब्ध असलेल्या समग्र वृत्तांचें मराठीकरण करून शास्त्रीय कार्यांत भर घालावी असा आहे. अशा तऱ्हेचा प्रयत्न यापूर्वीं आर्याप्रभु **मोरोपंत**, कविराय **रामजोशी** इ.नीं केला होता; पण तो अपूर्णच राहिला. ही अपूर्णकृति पूर्णतेस आणून मराठी भाषेचें वैभव वाढवावें असा विचार, जुन्या संस्कृत काव्यावर चौफेर नजर टाकणाऱ्या व वृत्तप्रसारक्रमाचा सदाभिमान बाळगणाऱ्या एखाद्या कवीच्या मनांत येणें स्वाभाविक होतें. योगायोगानें तो विचार **कवि यशवंतरावजींच्या** मनांत उद्भवून त्यांनीं या बिकट कामाचा पत्कर हौसेनें घेतला व "**निभ्रांतत्वें कृति करित जो नित्य सातत्य** ठेवी" ( पृष्ठ १६७ ) या आपल्या वचनाप्रमाणें सातत्य ठेवून बहुतेक वृत्ताची संपूर्णता या पुस्तकांत केली आहे; व हें पुस्तक हातानिराळें झाल्यानंतर त्यांना आणखी जीं नवीं वृत्तें आढळलीं त्यांची परिपूर्तता— **तृतीयोद्भव** तयार असल्यामुळें—**चतुर्थोद्भवांत** करण्याचें अभिवचन देऊन, या संकल्पित कार्यांत ते प्रथितयश झाले आहेत.

कवि असो किंवा लेखक असो, हे दुसऱ्यानें सांगितलेलें एखादें कार्य करण्यास व त्याचें बंधन पाळण्यास जितकी अमनस्कता धारण करतात त्यापेक्षां अधिक तत्परतेनें ते आपल्या मनांतील नियोजनेबद्दल आपखुषीनें अडचणींचीं अशीं अनेक बंधनें आपल्या भोंवतीं घालून घेतात,

इतकेंच नव्हें तर तीं पाळण्याची योग्य खबरदारीहि घेतात. यामुळें त्यांनीं आंखून घेतलेल्या कार्याची धुरा कार्यसमाप्तीनंतर जेव्हां खालीं उतरतें तेव्हां त्यांचें हृदय आनंदानें उचंबळूं लागतें. हाच भाव " चित्रा " (पृ.५६) "भद्रिका" (पृ.५९) "विश्रांता! " (पृ.६२ ) "प्रहर्षिणी" (पृ.११४) "भद्रक" (पृ.२११) इ. कवितांतून कवि यशवंतराजींनीं वर्णन करून आपण कृत्यकृत्य झाल्याची तृप्ति दिग्दर्शित केली आहे, व ती अयथार्थ नाहीं असें पं. श्री. रड्डि शास्त्र्यांच्या " छंद:शास्त्रांतील मराठींत विस्तृत ग्रथ म्हणजे प्रस्तुतचा का.कु.क. द्वितीयोद्भव 'पुष्पपाकळ्या' हाच होय. यांत शास्त्रीय चर्चा विशेष न करतां जवळ जवळ२५०-२७५ वृत्तांचें रेषालिपीनें स्वरूप देऊन विविधवृत्तांत विविध विषय मनोहर रीतीन ग्रथित केले आहेत त्यामुळें छंदोज्ञान व सदुपदेश या दोहोंचा लाभ वाचकांस मिळतो " या अभिप्रायसारावरून कोणा-सहि वाटेल.

सामान्यत: कोणत्याहि विषयाचे शास्त्र आणि कला असें दोन भाग असतात. शास्त्रांत अभिप्रेत असलेल्या विषयाची प्रत्यक्षता कलेशिं-वाय होत नाहीं. कला ही अभ्यासामुळें कमावली जाते व दीर्घ प्रयत्नानें उत्कर्ष पावते म्हणून तिला तपाची–अभ्यासाची–आवश्यकता आहे. शास्त्राची फलश्रुति या कलेच्या उत्कर्षावर निरंतर अवलंबून असते. उदाहरणार्थ:—गायनासंबंधीं केवळ शास्त्राचेंच यथाप्रकार ज्ञान अस-णारा गायनाचार्य, कलापूर्ण सुस्वर आलापन करून हृदयाची तळमळ नाहींशी करूं शकत नाहीं, म्हणून कोरडें शास्त्र कलेशिवाय पुरुषार्थ-प्रद होत नाहीं; पण कलेला तर शास्त्राशिवाय दुसरा आधार नाहीं. भाषेमंतर व्याकरणशास्त्र निर्माण झालें असलें तरी कोणताही शब्द जसा व्याकरणशास्त्राच्या बाहेरचा होऊं शकत नाहीं तद्वत् कलेची भरारी कितीहि उंच जावो, ती शास्त्रीयवितानाचा भेद करूं शकणार नाहीं. शास्त्र

हें कलेच्या नंतरचें असलें तरी त्यांतील प्रमेयें समर्थ, प्रज्ञावान् अशा हृदयांतून प्रसृत पावतात व आपल्या अमोघ शक्तीनें कलेच्या अंगोपांगावर सत्ता प्रस्थापित करतात. सत्ता म्हटली कीं तींत कडकपणा आलाच व असा कडकपणा असणें हा तिचा सहजालंकार आहे. हा अलंकार काव्यकला व काव्यशास्त्र या दोहोंची मीमांसा करण्याचें विशेच्या संस्कारानें पवित्र झालेलें सामर्थ्य ज्यांच्यामध्यें होतें अशा कविपुंगवांनीं तिच्यावर चढविला असल्यामुळें, अलंकाराच्या ठिकाणीं सूचित होणारी कृत्रिमता नाहींशी होऊन, त्याला विधिसूत्र किंवा मंगळसूत्राचें स्वरूप प्राप्त झालें आहे, म्हणून त्याच्या जरूरीची अनास्था बाळगणें योग्य नव्हे. कारण ज्या प्रमाणें कायद्याच्या कडकपणामुळें राज्यकारभार दरोबस्त राहतो, किंवा धर्म व नीति यांच्या नियमांखालीं स्वैराचारास आळा बसतो, त्याचप्रमाणें प्रतिभेच्या बेजबाबदार वळणाला शुचित्व प्राप्त व्हावें म्हणून शास्त्राचीं बंधनें पाळावीं लागतात. एरव्हीं नागड्या प्रतिभेच्या जोरावर निःशंकतेनें मनांत आलेले सर्व विचार, काव्यशास्त्राचीं आवश्यक बंधनें न पाळतां एकादा सरस्वतीचा मानसपुत्र बरळूं लागला तर अनवस्थाप्रसंग ओढवल्यावांचून राहणार नाहीं. कवींना "सरस्वतीचे मानस पुत्र" अशी संज्ञा आहे. हे स्वतंत्र बाण्याचे असल्यास चालतील; किंबहुना या स्वतंत्रतेचा अभिमान बाळगून त्यांनीं यशोगिरि हस्तगत करावा म्हणून सरस्वतीमाता त्यांना स्फूर्तिरूप शक्तिही देईल, पण तेच तिचे पुत्र जर स्वैर झाले तर तें तिला खपणार नाहीं. स्वैरता म्हणजे कसलेंच बंधन न पाळण्याचा आग्रह होय. अस्तु. प्रतिभेच्या उपजत शक्तीवर प्रेम करून तिचे संगोपन करणें सोपें असलें तरी तिच्यावर शास्त्रीय नियमाचा साज चढविणें हें सोपें नाहीं; म्हणून कलेच्या सिद्धीवर शास्त्रीय बंधनांची कटकट पुष्कळांना नकोशी वाटते. शिवाय कित्येक वेळां, कला जास्त आळविली गेली तर तिच्यांत शास्त्रीय नियमांवर मात करून, त्या नियमांचें पंगुत्व प्रत्य-

यास आणून देण्याचें सामर्थ्य उत्पन्न होतें असें आहे तरी हे दोन विषय एकमेकांपासून विभक्त होऊं शकत नाहींत. स्वतः स्वयंभु ईश्वर व त्याचें नांव या दोघांत वैर लागल्याचें एक सुंदर रूपक आर्याप्रभु मोरोपंत यांनीं "संशयरत्नमालेंत" योजिलें असून आपलें नाव आपलें वैर कां करतें हें सांगतांना "........अमृत उधळितो स्वैर ॥ न पुसे न भी न ऐके, यास्तव दोघांत लागलें वैर ॥" ( नवनीत पृ.३५१ ). हें कारण दिलें आहे. हाच प्रकार कला व शास्त्र यांना लागू आहे. वस्तुतः हा प्रकार उद्यानांतील रम्य व हर्षद फुलें तोडतांना ज्या कारागीरानें अत्यंत परिश्रमानें बागेची जोपासना केली व झाडें बहारीस आणलीं, त्याची कांहींच किंमत न समजणें, अथवा सुतीं दाण्याची नथ आणून देणाऱ्या नवऱ्याचे गुणानुवाद गातांना, नाक देणाऱ्या देवाची आठवणही न करणें असा आहे. असें असलें तरी कारागीर परमेश्वर लोकांच्या आनंदानें स्वतः आनंदित होतो. तत्त्वतः कारणावांचून कार्याच्या ठिकाणीं स्वतंत्र सत्ता नसल्यानें कार्याचें महत्त्व कारणलक्षित होय. अर्थात् कार्याची स्तुति, तीच कारणाची स्तुति व दोहोंमधील उत्कर्ष एकस्वरूप आहे. अशा मधुरमीलनांत द्वैत कल्पिणें म्हणजे लाकडानें पाण्यावर प्रहार करून पाणी द्विधा करण्याचा आगंतुक आनंद उपभोगण्यासारखें आहे. या योगें अज्ञानतः पाण्याचे दोन भाग झाल्यासारखे वाटतील; पण रसिकांस 'अखंडप्रवाहित्व' या पाण्याच्या सहज धर्मास प्रतिरोध झाल्यामुळें सहज लीलेनें उसळून व किंचित् द्विधा-भाव प्रगट करून पुन्हां एकरूप होणाऱ्या लहरींचें कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. तरंग पाण्याहून भिन्न नाहींत; त्याच प्रमाणें सूर्यकिरणानें व वातप्रकोपानें उसळत्या लहरां-बरोबर भासमान होणारे विविध मनोहर रंगही पाण्याहून पृथक् नाहींत व पाणी समुद्राहून वेगळें नाहीं; म्हणून कलाव्यासंगानें पल्लवित झालेलें काव्य देखील काव्यशास्त्राचाच प्रस्तार होय. हा विषय अधिक सुलभ

होण्याकरितां काव्याचे दोन भाग कल्पून त्याचें थोडक्यांत विशदीकरण करूं.

(१) काव्य हें एक शास्त्र आहे या दृष्टीनें त्याची संपूर्णता, शाश्वतता व व्यापकत्व सिद्ध करून आनंद प्राप्ति व पुरुषार्थ प्राप्ति हें त्याचें फल सिद्ध करणें.

(२) आनंदप्राप्ति हें काव्याचें अंतिम फल कलेच्या परिश्रमानें अनुभवण्यायोग्य करणें.

यांचें व्यावहारिक स्वरूप 'राज्य मिळविण्याचें शास्त्र व राज्य करण्याचें शास्त्र' असें होईल. राज्य मिळविण्याचा शास्त्रांत विजय या प्रधान भाव असल्यानें त्या विजयाच्या आड येणाऱ्या अल्पशा कारणाचाही उच्छेद केल्यावाचून गत्यंतर नसतें. छापा घालून, अडवून, रहस्यस्फोट करून, प्रसंगीं माघार घेऊन तात्पर्य ज्या ज्या उपायांनीं यश प्राप्ति होईल त्यां सर्व प्रकारांचा अवलंब करावा लागतो याच प्रमाणें शास्त्ररीत्या शास्त्राची व्यापकता व संपूर्णता सिद्ध करण्याकरितां इतर शास्त्रांत सांगितलेलें सर्व पुरुषार्थ या शास्त्रानेंही सिद्ध आहेत असें पटवावें लागतें. शाश्वतता सिद्ध करण्याकरितां हिंदुसंस्कृतीचें परमप्राप्तव्य फल मोक्ष, हा सुद्धां या शास्त्रानें सिद्ध आहे हें दाखवावें लागतें. कामशास्त्रासारख्या इंद्रियसुखलोलुप शास्त्राची फलश्रुति कशी मोक्षाभिमुख केली गेली आहे, हें खालील अवतरणावरून सूचित होईल.

**" सुविदितपरमार्थः कामशास्त्रस्य विद्वान् । विविधतिविनोदैः कामिनीनां मनांसि ॥ अनुदिनमनुरागाद्रञ्जयेद्यः सलीलं । फलमविकलमेव प्राप्नुयान्मानवः सः ॥ ५ ॥**

भौतिकवादी पाश्चिमात्यांत, मोक्षाची कल्पना नसल्यामुळें, ते शाश्वतीचा अर्थ " दीर्घकाल किंवा चिरकाल टिकणारें " असा करतात; व तो तसा मानला तरी चिंता नाहीं. कारण प्रत्यक्ष लक्ष्मीदेखील लाजेल

इतक्या चंचलतेनें धावणाऱ्या व प्रत्यहीं नाविन्याची प्रथा पाडणाऱ्या कालाच्या अखंड प्रवाहांत आपल्या अभिजात रुचीनें टिकून सारख्या प्रमाणांत आनंदप्रदानाचें सदावर्त खुलें ठेवण्याचें सामर्थ्य ज्या काव्यांत आहे, तें काव्य व तसलें काव्य उत्पन्न करणारा कवि, या दोघांचें स्थान शाश्वत मोक्षापासून फारसें दूर नाहीं. शाश्वतीप्रमाणें शास्त्राला संपूर्णता यावी म्हणून, त्याच्या थोरपणास शोभतील अशा कोट्या, प्रतिकोट्या, श्लेष, लाटानुप्रास, दूरान्वयी-वाक्यसमूह, व्याकरणाचा व्यापार इत्यादि क्रिया कराव्या लागतात. हा प्रकार फलाकांक्षी वर्गास आनंदप्राप्ति सुलभतेनें होत नाहीं म्हणून क्लिष्ट, नीरस शब्दावडंबरयुक्त व अप्रासादिक असा वाटतो. शास्त्राच्या दृष्टीनें कला सुलभ आहे व साधारण—वाचकवर्ग फलाकांक्षी असल्यानें शास्त्रीय वाङ्मयाचा प्रसार विशिष्ट समाजाशिवाय रुचणार नाहीं. गायनशास्त्राची साधीसुधी माहिती नसणारे कितितरी तानपरायण ख्या, संगीतशास्त्रकोविद म्हणून मिरवितांना दृष्टीस पडतात. त्याच प्रमाणें किती एक कवि, मंजूळ भावगीताच्या सुस्वर आलापानें मधुर संगीत उत्पन्न करून काव्याचार्य म्हणवून घेतात. त्यांचें कवितागायन ऐकून, कवितेच्या फलाच्या सिद्धीचा मोद वाटतो हें खरें, पण त्यायोगानें काव्याच्या शास्त्रीय प्रांतांत प्रगति झाली आहे असें म्हणतां येणार नाहीं. हा प्रयत्न चिकाटीचा व बिकट असल्यानें शास्त्रीय काव्याला काय श्रम पडतात याची कल्पना, या ग्रंथांतील विविधवृत्तांकडे पाहून कोणासही करतां येण्यासारखी आहे. शास्त्रीय विषयाचा स्वाद घेण्यास शास्त्रीय भूमिका तयार असावी लागते. अर्थात् श्रोत्याला व कवीला शास्त्राशीं झगडावें लागत असल्यामुळें हा कष्टप्रद मार्ग **"रुची तोच जाणें असे जो भुकेला"** (पृ.९०) किंवा **"उत्पस्यतेहि मम कोऽपि समान धर्मा"** म्हणून काव्याच्या शास्त्रीय अभ्युदयेच्छूंकरितां राखून ठेवणें प्रसंगप्राप्त आहे.

राज्य करण्याच्या —उपभोगण्याच्या — शास्त्रांत राजाच्या सत्तेचें प्रदर्शन पाहून प्रजेनें औत्सुक्यानें निरंतर आनंद मानावा असा उपाय शोधावयाचा असतो. त्यामुळें प्रजेच्या अंतःकरणाचा ठावठिकाणा तपासून त्यांना रुचेल व पटेल अशा सुलभतेनें राजनिष्ठेचे धडे शिकवावयाचे असतात, व ज्या उपायानीं हें फल प्राप्त होईल, ती प्रथा उत्तम असें ठरते; पण यांत शौर्याचा —म्हणजे प्रतिभेला अडचणींत घालून ती त्या अडचणींतून अडवणूक करून न घेतां कशी धावते, हें पाहण्याचा योग नसल्यामुळें —शास्त्रीय दृष्टीनें हा भाग प्रासंगिक, अल्प—परिणामी अतएव अशाश्वत असा वाटतो. अशा काव्यांत प्राय: भावगीत, प्रज्ञागीत, गेयगीत, वीणागीत, नमुनेदार चालींवर म्हटलीं जाणारीं मात्रागणवृत्तें इत्यादिकांचा समावेश होतो. शिवाय या कलामय काव्यांना व्यावहारिक विषयाची भरपूर सामग्री उपलब्ध असते, व रागतः आवडणारे शृंगारादि भाव थोड्याशा शब्दाच्या कमावण्यानें प्राप्त होऊं शकतात. म्हणून एका दृष्टीनें हीं भावनामय काव्यें कवितेच्या अभिजात रसानें आनंद उत्पन्न करतात असें म्हणण्याऐवजीं सामाजिक व सांसारिक प्रीतीच्या विषयामुळें तीं अधिक लौकर आनंदपर्यवसायी होतात असें म्हणतां येईल. ही भावनेला उचंबळविणारीं साधनें अशास्त्रीय वाटलीं तरी त्यांचा समावेश शास्त्रीय विस्ताराच्या वाढत्या क्षेत्रांत होण्यासारखा आहे. मात्र या मानानें विस्ताराचें क्षेत्र वाढविलें पाहिजे. ही वर्धिष्णु सोय वृत्तप्रस्ताराच्या योगानें होणारी आहे. तिचा अवलंब न केल्यास्तव वरील वृत्तें बाहेरून आणलेलीं असें वाटतें, व अशा वाटण्याची किंमत सारग्राही रसिकांच्या दृष्टीनें विशेष नाहीं पण शास्त्रीय व्यासंगानें दृढावलेल्या कवींना "नवीन वृत्त" असें म्हटल्यानें, शास्त्रीय व्यापकतेच्या व संपूर्णतेच्या भागांत न्यूनता वाटते. यांत जुन्याचा गौरव किंवा आधुनिकांचें लाघव हा भाग नसून, शास्त्राच्या व्यापकतेचा गंभीर व सात्विक आवेश आहे. असा स्वाभिमान कवीला असणें अयथार्थ म्हणतां येणार नाहा.

या विवेचनांत काव्यशास्त्र व काव्यकला या दोन्हींतला फरक अधिक स्पष्ट होऊन कवि यशवंतरावजी यांच्या काव्याचें स्वरूप चांगल्या प्रकारें लक्षांत यावें एवढाच हेतु आहे. शास्त्रापेक्षां कलेला अधिक महत्त्व द्यावें किंवा कला ही शास्त्रापेक्षां कमी दर्जाची ठरवावी असा हेतु नाहीं; कारण या वृत्तसम्राटांनीं शास्त्रीय काव्यांत जसे परिश्रम केले आहेत, तसाच आमोदप्रद-विलास कलात्मक काव्यांतही केला आहे. पहिल्याची साक्ष हा द्वितीयोद्भव "पुष्पपाकळ्या" व पुढें प्रसिद्ध होणारा "चतुर्थोद्भव" पटवील तर "प्रथमोद्भव" व लवकरच प्रसिद्ध होणारा तृतीयोद्भव "सुमनसौरभ" हे कलात्मक काव्याची यथार्थता जाणवून देतील. वेलीला भरपूर पाणी मिळत असलें म्हणजे तिच्या फांद्या कितीहि लांब पसरल्या तरी त्याची टवटवी व चेतोहरत्व जशी कमी होत नाहींत तद्वत् या कविवर्यांची सहजोद्गम कविता-रचनाशक्ति विविधवृत्ताच्या अरुंद रस्त्यांतूनही उच्च विचार, सुंदर कल्पना, अनुरूप भावना यांसह प्रसृत होत असल्यामुळें कोणत्याही विषयाच्या संचारी भावांचीं वर्णनें चेतोहर व आकर्षक अशींच दिसून येतील.

वृत्तांची परिपूर्तता हें या ग्रंथाचें ध्येय असल्यामुळें, त्याच्या शोधार्थ शास्त्रीय विषयाच्या प्रांतात गेलें पाहिजे हें उघड आहे. वृत्तप्रस्ताराची सुरवात "उक्ता" या एकाक्षरी वृत्तापासून होऊन "उत्कृति" या सव्वीस अक्षरी वृत्तापर्यंत जाते व या सर्वांची १३,४२,१७,७२६, इतकीं प्रस्तारात्मक रूपें होतात. मुख्य वृत्त व त्यांत बदलणारे लघु गुरु यांचें तारतम्य वेगळें कल्पिण्यानें, प्रस्तारक्रमांत व श्रुतिमनोहरत्वामध्येंहि विशेष सौकर्य येतें. वृत्तप्रस्ताराचा वाढता व्याप व त्याचें छंदानुसंधान, गायनोपलब्ध लय व तालप्रस्तार, यावरून चागलें कळून येईल. पण वृतप्रस्ताराप्रमाणें तालप्रस्ताराचें शिक्षणहि हल्लीं लुप्तप्राय होत चाललें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. लयानुसंधान कायम ठेऊन वेगवेगळ्या तालांत त्याचा आस्वाद

केलें हें छंदशास्त्रज्ञान "प्रतिपर्व रसोदयः" याप्रमाणें आनंदवर्धन करणारें आहे. गाण्यांत किंवा वाजविण्यांत जशी लयकारी बीजभूत असते, तशीच वृत्त-प्रस्तारांत छंदाची स्थिति आहे. छंदाची संवेदना अनेक वृत्तांतून नाद-मधुर-शब्दावलीनें आंदोलनें घेत राहते. विषयाच्या तादात्म्यतेनें हृदया-काशांत ज्या मननशील लहरी उठतात तिचीं आंदोलनें वृत्ताच्या अड-वणुकीमुळें वेडींवाकडीं वाटलीं तरी त्यांच्यांतून छंदाची अनुस्यूतता ढळत नाहीं. या प्रस्तारक्रमास "छंदोवीचि" असें नांव आहे, व तो कसा काढावा याची माहिती प्रस्तारात्मक पुस्तकांतून मिळतें. वाटल्यास जिज्ञासूंनीं पहावी. आतां वृत्तप्रस्तार सोडून फक्त वृत्ताचा विचार केल्यास, वृत्तांत बीजभूत असलेल्या छंदाची रूपरेषा कायम करावी लागते. हेंच काव्याचें मुख्य आधारभूत क्रीडांगण होय. म्हणून जगांतील कोणत्याही भागांतील कोणतीहि भाषा गृहित धरली तरी कांहीं विवक्षित वृत्तविष-यक शास्त्रीय पद्धत ( कोणी यास बंधन म्हणतात—पण ) कांहीं एक मर्यादेशिवाय काव्यविलासाला स्थल तरी कसें मिळणार! अर्थात् तें आव श्यक असें स्थल या वृत्तप्रस्तारापैकींच एखादें असतें. अष्टप्रास, वर्णमाला-स्तोत्र या पद्धतींचें साम्य चीनी, जपानी—कवितेशीं आहे असें ज्ञान-कोशकार म्हणतात. भुजंगप्रयाताची धर्तीच ( कारण " भुजंगप्रयात " म्हणूं गेल्यास शेवटला एक गुरु कमी पडतो ) फारसी "करीमा" नामक मौ. " शेख सादी "च्या कवितेला लागूं पडते. व पुष्कळ फारसी कवीचे विचारही पण समानार्थीसुद्धां दाखवितां येतात. कवि यशवंतरावजींनींहि "गुरुकरुणामृत" या पुस्तकाच्या ' सद्गुणनिरीक्षणांत ( निजामविजय-वृत्तपत्र ९,१,३४) कवि " उमरखय्याम "च्या कांहीं चरणांचें कवि-राज "भर्तृहरी"च्या नीतिशतकांतील कांहीं कवितांशीं शब्दक्रमांतही साम्य दाखविलें आहे.

साधारणरीत्या वृत्त व छंद हे अगदीं विभक्त असें न मानतां एकाच अर्थानें मोडतात, व ध्वन्यार्थानें त्यांत दाखवितां येण्यासारखा

भेदही नाहीं; पण दोहोंच्या उगमाच्या दृष्टीनें पाहतां छंद हे आरंभीचे असून वृत्तें त्यानंतरचीं असावीत असें वाटतें, कारण वेदांची सर्व संहिता छंदोबद्ध आहे. उपनिषदेंही छंदोमयच आहेत. अर्थात् उपनिषत्कालीं वृत्ताचा प्रस्तार झाला असावा असें आढळत नाहीं. छंद हे स्फुरणाचे आघात आहेत व ते ज्या क्रमानें निनादित होत गेले किंवा म्हणण्यास सुकर झाले, त्या मानानें पुढें वृत्तांची वर्गवारी करण्यांत आली असावी. वृत्तांतील रसाचा विचार केल्यास त्यांतही राग-रागिणीसारखा प्रकार दिसून येतो. गायनशास्त्रांत सहा मुख्य राग व तीस रागिण्या आहेत. ( रागविलास पृ. ७३ ) या रागिण्यांचें मुख्य रागाशीं पत्नीत्वाचें नातें असून प्रत्येक रागाच्या पांच पांच सहधर्मचारिणी आहेत व मनुष्याच्या अंतःकरणावर, पत्नीत्वाच्या भावावरून होणाऱ्या सर्व भावनांचा संबंध आहे. हा स्थायीभाव लक्षांत घेऊन संचारीभावाच्या अनेक कल्पनांनीं राग आळवला म्हणजे रसाचा उत्तम परिपोष होतो. वृत्तांतही असाच प्रकार आहे. साधारणपणें रसानुकूल वृत्तांची यादी " वाचनापूर्वी " या लेखांत श्री. यशवंतरावजी यांनीं दिलेली आहे पण वृत्तप्रस्ताराच्या मानानें ती फार लहान व त्रुटित असून त्यांचें विशदीकरण हें फारच कठीण कार्य आहे. काव्यविषयक ग्रंथांतून बहुतेक काव्यगुणदोषचर्चा, अलंकारांचें निरूपण, शद्बाच्या (१) अभिदा, (२) लक्षणा, (३) व्यंजना या वृत्ती, विषयविषयी व अंगांगी—भाव, लक्षणेचे (१) शुद्ध सारोपा उपादान लक्षणा, (२) शुद्ध साध्यावसाना उपादानलक्षणा, (३) शुद्ध सारोपा लक्षणलक्षणा, (४) शुद्ध साध्यावसाना लक्षणलक्षणा, (५) सारोपा गौणीलक्षणा, (६) साध्यावसाना गौणीलक्षणा हे सहा प्रकार वैदर्भी, पांचाली, गौडी या तीन रीती, प्रसाद, ओज, माधुर्यादि गुण, वाक्यांत शोभा देणारे अर्थालंकार व शद्बालंकार, शद्बालंकाराचे श्लेष, अनुप्रास, यमक, चित्रादि प्रकार, वृत्यनुप्रास, भुज-

नुप्रास, छेकानुप्रास, लाटानुप्रास, यमकाचे संदष्टक यमक, समुद्रक यमक, पुष्पयमक, दामयमक, संयुतावृत्ति यमक, असंयुतावृत्ति यमक अश्वघाटी यमक, अलंकाराचे उपमा, मालोपमा, पूर्णोपमा, प्रतिव, स्तूपमा, लुप्तोपमा, उत्प्रेक्षा, रूपक, निदर्शना, अप्रस्तुत, प्रशंसा, अर्थांतरन्यास, विरोध, व्याजस्तुति, अपन्हुति, समासोक्ति, अतिशयोक्ति, विशेषोक्ति, सहोक्ति, स्वभावोक्ति, विनोक्ति, समुच्चय, पर्याय, परिकर, परिसंख्या, व्याघातादि प्रकार व खड्गबंध, पद्मबंध, मुरजबंध, छत्रबंध, नागबंध इत्यादि चित्रकाव्यें, यांचें निरूपण असतें. विशेषतः यांचेंही अध्ययन आतांशा दुर्मिळ झालें आहे. तेव्हां हा दुर्मिळ होत असलेला भाग नव्या जोमानें मराठींत संकलित करण्याचा कविवर्य यशवंतरावजी यांचा उपक्रम खरोखरीच अभिनंदनीय होय. अनेक वृत्तांतून काव्य रचना करण्यास जी कुशलता व मनाची विशिष्ट भावना असावी लागते, त्यांचें समर्पक व आटोपशीर विवेचन "काव्यविचार" या पुस्तकांत श्रीयुत श्री. बा. रानडे यांनीं केलें आहे तें कवि यशवंतरावजींच्या काव्याशीं पूर्णपणें जुळतें असल्यामुळें त्याचें अवतरण खालीं देऊन या पुस्तकांतील कवितांचें विहंगमदृष्ट्या अवलोकन करूं. "भरदार विचार, अर्थपूर्ण वेचक मोजके शद्व इत्यादि उत्तम काव्याचे गुण आवश्यक असून अर्थानुकारी आंदोलन विशिष्ट वृत्तरचनेंत दाखविणें हें अत्यंत कौशल्याचें काम, भाषेवर व वृत्तांवर प्रभुत्व असून शिवाय मनाची वळण उदात्त असल्याविना साधणें दुरापास्त आहे.

काव्यकौस्तुभ यशवंतरावजी यांना जन्मजात अध्यात्माची आवड असल्यानें त्यांच्या कवितेंत "एकाद्याचें विकृतविभवें वाकुडें चित्र घ्यावें। वर्णावें तें विकृतवचनें, वाचकां हांसवावें ॥ ४ ॥" (पृ. १६८). असा प्रकार सहसा दिसून येत नाहीं. भक्तियुक्त अंतःकरण व अध्यात्मचिंतन यामुळें "तदेव सत्य तदुहैव मंगलं। तदेव पुण्यं

**भगवद्गुणोदयम्** " अशी त्यांची भावना आहे. ते म्हणतात –"**नाम-मोड जंव मानासिं रुजला । छंदरूप मग वृक्ष उभवला ॥ वाढ घेत किति दूर पसरला** " (पृ. ७५). त्यांची अभिजात रुचि पारखण्यास "**खूणगांठ**" (पृ ३२), "**शुद्धाविराट**" (४८), "**माझें मला ना मिळे?**" (१९४), "**जाणे कुणा कोण तो**" (१९५) या कविता साधन आहेत. भक्ति कितीहि सोज्वल असो, तींत द्वैत असतें; पण तें द्वैत, अद्वैत अशा स्वरूपाला प्राप्त झाल्यामुळें जी गोड व द्वैताद्वैत अशी भावना उदित होते, त्याचें वर्णन करितांना ते म्हणतातः–

> **" उदित जाहल्या ललित-भावना । चित्त इच्छितें चित्र साधण्या । आणि लागतां चिकटतें पिसें । त्यांत वृत्तिही रुजुनियां वसे ॥ १३ ॥ सौख्य लाभतें अवचनीयसें । चित्रकार तो कविच होतसे ॥ गायनासही विसरतो झणीं । ध्येयरूप कीं सहज होउनी** " ( पृ. ६५ )

याचप्रमाणें "**धावना**" (४१) या कवितेंत आरंभीच्या भक्तहृदयाचें अविभक्त अशा गूढ स्थितींत झालेलें पर्यवसान वर्णिलें आहे. यावरून **काव्यकौस्तुभ यशवंतरावजी** यांचें काव्य ठोकळ मानानें तीन तऱ्हेनें विभागता येईल.

[ १ ] **उपदेशपर**–Didactic.
[ २ ] **विचारात्मक**–Reflective.
[ ३ ] **प्रगूढ**–Mystic.

अध्यात्माचा ध्येयवाद धरून यांचीं भरपूर उदाहरणें, सहज काव्यालोडणांतही दिसून येण्यासारखीं असल्यामुळें उतारे न देतां कवितेच्या **वर्गीकरणाचें कोष्टकच खालीं देतों:**—

**१ "भक्तिपर"–विश्वाधारा ! (पृ.४९), विश्वाद्यंता! (६२), हृत्प्रसून-(६९), नामछंद (७३), भुकेला (९०), मौक्तिकदाम (९६), हुडकुं तुला कुठेंतरी! (११८), विभावरी (१२०), तूणक (१४३), धन्यभक्ति ! (१६९), इ.**

२ 'अध्यात्मपर"-एक (१६), अजूनि वाट चालतो (१८ते२२), चित्तस्थैर्य (२४), खूणगांठ (३२), आनंद (४०), मी नसतांना (४२), शुद्धविराट (४८) एकरूप(५४), माझी मणिमाला (९२), लीलाखेल (१४५), तैजस-(१७२), जननमरण (१८३), तो माझा (१९३), जाणे कुणा कोण तो? (१९५), भार तुझ्यावरि (२१८), माझा प्रभु (२२९), अपरवक्त्र (२२६) कोण बरें ?-(२२९), विश्वव्याख्या (२५४) इ.

३ "करुणारसात्मक"–काल कसें आज कसें? (पृ.२२), वृत्ति(३८), धावना (४१), नवमालिका (८४), कविरोदन-(१०९),वासंती(१३७)सुहृत्पत्निनिधन (१६३) इ.

४ 'वैराग्यपर"–आयुष्य (५९), क्षण न भरवंसा (६१), कुणीतरी (९४), उलट–कामना (१६६) इ.

५ "रूपक उत्प्रेक्षाद्यलंकारात्मक"–मौक्तिकमाला(५१),ललित(६४), कार्याकार्य (७७), गिरिराज (८१), सागरा! (१०६), घड्याळ का सिंहनाद ? (१११), दुःख (१२३), शशिकला (१४०), चित्र (१५२), शारदागायन-(१६१), बहुरत्ना (२०६), देवाचा खेळ (२५१)इ.

६ "भावनाप्रधान"–प्रेम(६३), स्वागता (७१), ती–ही(७३), चित्ते-च्छित दाता (७९), वारा (९८), वावटळ (१००), प्रतिबिंब (१०१), भावनामंदिरीं (१६५), कुसुमित लतावेल्लिता (१७९) इ.

७ "साहित्येत्यादि" चित्रा–(५६), भद्रिका(५९), प्रहर्षिणी (११४), चित्रकचिरा (११७), साहित्यसेवक (१२६), सुरा-(१५७), जगतिं एक तूंच (१५८), सगुणघोषणा

निर्गुणीं ? (१६७), विबुधाप्रिया (१८३), माझी मराठी मला (१८८), गीतिका (२००), वाक्सेवा- (२१३), कवि-रसिक (२१७) इ. इ.

यावरून कविता विविधरसात्मक असून कवितेचे विषयही भारदस्त आहेत हें सहज समजून येईल. कविवर्य यशवंतरावजी हे वैदर्भीरीतीचे पुरस्कर्ते आहेत, त्यामुळें प्रौढता त्यांना विशेष आवडते; पण असें असलें तरी विनोदाला किंवा हास्यरसाला कवीनें अगदींच टाळा दिला आहे असें नाहीं. विनोद व हास्यरसाचीं उदाहरणेंही भरपूर देण्यासारखीं आहेत, पैकीं कांहीं खालीं दिलीं आहेतः—

८ "हास्यरसात्मक"—गुर्जरप्रांतप्रवास (पृ.५३), मनाचे मांडे (५७), शालिनी (६७), ईण (६८), माझें अश्वारोहण- (१४९), व्यवहारममनुजा ! (१८९), व्याख्यान- (१९१) इ.

विशेषतः शृंगारात्मक काव्य लिहिणाऱ्यांना या कवीनें जो इषारा दिला आहे, तो मननीय असून उद्बोधक वाटतो—

" शृंगाराचें कवन रचण्या आज नाहींच काल। ती तेव्हांची संवय कविना ! काय सोडून द्याल?॥ पाहा आतां पडलि अपुली माय-भू संकटांत। त्यागोनीयां विदुषि मृदुता तीस देतात हाल ॥१॥ (पृ. १७०).

त्याचप्रमाणें कवीच्या मनांत उसळत असलेली देशप्रीतीची झांक " सोडा दिवाळी दसरा। कार्यें करा देशांचीं " " दैन्य पावलों- पावलीं। मुचे कैसी दीपवाली!" इत्यादि सूचक चरणावरून व्यक्त होते.

काव्योत्पादक शक्तिबलावर काव्यशास्त्राची मजल लीलेनें गांठणाऱ्या कवीलाहि रस्त्यांतील खांच खळग्यामुळें अडथळा होतोच या सामान्य नियमाचा सर्व वृत्तांतन अप्रतिहतपणें संचार करणाऱ्या कवि

**यशवंतरावजी** यांच्या प्रतिभेला " **पुट** " (पृ.८५), **मंदाकिनी** (८६), **चंद्रिका** (१०७), **अचलधृति** (१४७), **ऋषभगजविलसित** (१५१), **नय** (१६०), **नाराच**(१८२)इ. वृत्तांनीं अनुभव आणून देऊन आपल्या काठिण्याचा दर्प जाणवला आहे असें दिसतें. वस्तुतः शास्त्रपरिपूर्तता म्हणून अशा कविता नमुन्यादाखल किंवा नगास नग म्हणून एखादी घडवून ठेवण्याचा प्रघात आहे; पण **कविवर्य यशवंतरावजींनीं** अशा कठिण वृत्तांनाहि, आपल्या रचनानैपुण्य व बुद्धिबलानें आपलेसे करून साधारण सुलभवृत्ताप्रमाणें, त्यातही बऱ्याच कविता रचिल्या आहेत हें विशेष होय. यावरून त्यांचें भाषाप्रभुत्व व छंदानुगामित्व चांगल्याप्रकारें दिग्दर्शित होतें. याला कारण त्यांची बलवत्तर क्रियाशक्ति होय. वस्तुतः उपकरणाच्या दृष्टीनें कवि यशवंतरावजींची स्थिति "**रथस्यैकं चक्रं भुजगयमिताः सप्त तुरगा । निरालम्बो मार्गश्चरणरहितः सारथिरपि ॥ रविर्यात्येवान्तं प्रतिदिनमपारस्य नभसः । क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे** ॥२०४॥(पृ ७८सु.र.भा.) या कुटुंबकवीच्या श्लोकावरून यथार्थ आहे. असो. त्यांच्या सर्व काव्याचें धावत्या दृष्टीनें अवलोकन करून आवश्यक उदाहरणें देऊं म्हटल्यासहि लेखाचा फार विस्तार होईल, म्हणून तो मोह आवरणें भाग आहे. एकंदरींत हा कवितासमूह शास्त्रीय काव्यांत कायमची भर घालणारा असा असल्यामुळें या योगें **कविवर्य यशवंतरावजी** यांनीं आपलें नांव अजर व अमर केलें आहे यांत शंका नाहीं.

आतां राहिली गुण-दोषांची तुलना व चर्चा, पण हें कार्य प्रकाशक अगर उपोद्घात लेखक यांचें नसून रसिक टीकाकारांचें आहे. व तें योग्य कालीं त्यांचेकडून होईलच.

" **वाचनापूर्वी** " या लेखांत शुद्धिपत्रासंबंधीं १४६ही संख्यासुद्धां निर्दिष्ट केली होती, तद्वत् शुद्धिपत्र शेवटीं दिलें असूनही प्रत्येक

प्रतींत हस्तलिखित शुद्धिकरण अनेक ठिकाणीं दिसून येईल. तेव्हां त्या-संबंधीं आवश्यक असा खुलासा म्हणजे, शुद्धिकरणावांचून अगदींच नडेल अशी ती संख्या होती म्हणून ते श्रम वाचकांना देणें कवि य.स. कोरे-कलकरांना योग्य न वाटल्यावरून त्यांनीं पृ. १७ते२०, २५ते४०, ४९ ते५२, ६१ते७२, ८१ते८४, १४१ते१५६व १७९ते२६६ एकूण १८४ पृष्ठें प्रत्येक प्रतींतून काढून त्या त्या टाइपाच्या खिळ्यांनीं व भागतच नसेल तशा स्थलीं लेखणीनें पुनःसंशुद्धिकरण केलें आहे व १४६संख्या अशा किरकोळ चुक्यांची ठेविली आहे ज्या सहज ध्यानांत येऊं शक-तात व शुद्धिपत्रानुसारें शुद्ध करणें न झाल्यासही वाचनांत विशेष अड-थळा येऊं नये.

शेवटीं विशेषत्वानें सांगावयाचें म्हणजे, कविवर्य यशवंतरावजी यांना त्यांच्या काव्यगुणावरून अनायासें प्राप्त झालेल्या (१)काव्यकौस्तुभ, (२) वृत्तसम्राट, (३)सकलकलाकोविद इत्यादि सन्मान–सूचक पदव्यांचा इतिहास द्यावयाचा पण श्री. पंडित रड्डी शास्त्री यांनीं त्याचा अनुवाद केला असूनहि "कविसम्राट" ही अक्षरें वाहविलीं आहेत व कविवर्य यश-वंतरावजी यांचे काव्य विद्वत्प्रशंसेस पात्र झाल्याचा साभिप्राय उल्लेख उपोद्घात [पृ. ६३व६४]यांत केल्यामुळें तो दिला नाहीं. व्यावहारिक मानपानाला सत्तेचें भरीव पाठबळ असल्यामुळें त्यांत एक प्रकारचा दर्पयुक्त खुसखुशितपणा असतो, तसा प्रकार विद्वानांनीं दिलेल्या प्रशस्तिपत्रांत नसला तरी सारस्वतांना प्रेमानें यापेक्षां अधिक असें काय देतां येणार ? व सरस्वतीभक्तांना तरी यापेक्षां दुसरें बहुमोलाचें असें काय द्यावेसें वाटणार ! विद्वत्ता व सत्ता यांचीं क्षेत्रें वेगवेगळीं असलीं तरी त्यांत प्राप्त होणारा विजय मिळविणाऱ्यास सारख्या प्रमाणांत हर्षाची लयलूट करणारा आहे. शिवाय कविवर्य यशवंतरावजी हे निर्लोभानें सतत काव्य करणारे "काव्यपुरुष"असल्यानें त्यांच्या प्रसिद्ध व अप्रसिद्ध काव्यसंभाराकडे

पाहून "नाहि कस्तुरिकामोदः शपथेन विभाव्यते" इतकेंच म्हणावेसें वाटतें हाच अभिप्राय **महामहोपाध्याय श्री. मुकुंदजी शास्त्री** सभापति श्री काशीपण्डितसभा यांनीं आपल्या "भवद्गुण सम्मुग्धचेतसो वयं किमन्यदाशास्महे" या चेतोहर वाक्यानें दर्शविला आहे. म्हणून या लेखांत **कवि** किंवा **कविवर्य** या सहज आदरार्थी विशेषणाचाच मी जास्त उपयोग केला आहे.

सरते शेवटी "आपरितोषात् विदुषां न साधुमन्ये प्रयोगविज्ञानम्" ही कविकुलगुरु कालिदासोक्ति आठवून हा विविधवृत्तांत परिश्रमानें गुंफलेला पुष्पगुच्छ रसिक विद्वानांच्या परितोषास कारण होऊन, कवींचे श्रम कारणीं लागोत! अशी सदिच्छा प्रगट करतों व खालील कविविजय-सूचक श्लोकांत हे "चार शब्द" संपवितों.

ते वंद्यास्ते महात्मानस्तेषां लोके स्थिरं यशः ।
यैर्निबद्धानि काव्यानि ये वा काव्येषु कीर्तिताः ॥१॥

---

माणिकनगर
भाद्रपद शु. १२ शके १८५६
गुरुवार.

आपला—
शं. के. दीक्षित.

## " पुष्पपाकळ्यां "तील कवितांची आद्याक्षरानुक्रमसूची

| पृष्ठ | कवितेचे क्रमांकासह नांव | प्रकाशन स्थल | पृष्ठ | कवितेचे क्रमांकासह नांव | प्रकाशन स्थल |
|---|---|---|---|---|---|
| ५३ | मध्यमंगल(क क ५४) | | | ल | |
| ८९ | मन (क.क्र.८५) | | ६४,६५ | ललित (क.क्र.६५) | |
| ५७,५८ | मनाचे मांडे (क.क्र ५९) | | १४५,१४६ | लीलाखेल (क.क्र.१२२) | |
| ४५ | मनोरमा (क.क्र ४५) | | | व | |
| ४६ | मयुरसारिणी (क.क्र.४६) | | [illegible] ते [illegible] | वधुवरांस (क.क्र.१६६) | |
| [illegible] ते [illegible] | मरणीं मरे (क.क्र.२१०) | | १७१ | वंशपत्र (क क्र.१४५) | |
| १२२,१२३ | मागणी (क.क्र.१०८) | | ९ | वसुमति (क.क्र.१२) | |
| २१९,२२० | माझा प्रभु (क.क्र.१८६) | | २१३ | वाक्सेवा (क क्र.१८०) | |
| १२,१३ | माझी मणिमाला क.८७ | [त.शा | १५५,१५६ | वाणिनी (क.क्र.१३०) | |
| १८८/१८९ | माझी मराठी मला(क.१६०)- | | ३५ | वाणी (क क्र ३२) | |
| | | [राजहंस. | ६६ | वातोर्मी (क.क्र.६६) | |
| १४९/१५० | माझें अश्वारोहण(क.क्र.१२५) | | ९८,९९ | वारा (क क्र.९१) | |
| १९४/१९५ | माझें मला ना मिळे!(क.१६४)- | | १००ते१०१ | वावटळ (क.क्र.९२) | |
| | | [त शा.मं. | [illegible] ते [illegible] | वासंती (क क्र.११७) | |
| १३०/१३१ | मानव्य(क.क्र.११३) | | १६८.१६८(अ) | विकृति (क.१४०) | |
| ४२ | मी नसतांना (क.क्र.४१) | | १२ | विचारा कुणाला?(क क्र.१५) | |
| ११९,१२० | मुलें(क.क्र.१०६) | | २५ | वितान (क.क्र.२७) | |
| ४,५ | मृगी(क.क्र.६) | | १०,११ | विद्युल्लेखा(क क्र १३) | |
| १८७/१८८ | मेघविस्फूर्जिता (क.क्र.१५९) | | २३७ | विपरीताख्यानकी(क.२०४) | |
| ९६,९७ | मौक्तिकदाम (क.क्र.८९) | | १८४ | विबुधप्रिया(क क्र.१५७) | |
| ५१,५२ | मौक्तिकमाला(क.क्र.५१) | | [illegible] ते [illegible] | विभावरी(क.क्र.१०७) | [त.शा. |
| | य | | १७६ | वि-योगी (क.क्र.१४९) | [मं. |
| २५३ | यत्स्फूर्ति(क.क्र २२०) | | १६८(अ) | विरोध (क.क्र.१४१) | |
| २६१/२६२ | यशलाभे त्यास (क.क्र.२२८) | | २५४ | विश्वव्याख्या क.१२२ | [त.शा. |
| २६७ | येवढें श्राणि द्यावें(क.क्र.२३६) | | ६२ | विश्वाद्यंता ! (क.क्र.६३) | [मं. |
| | र | | २२५ | विश्वाद्यानंगक्रीडा (क.१९१) | |
| ३६,३७ | रसिक (क.क्र.३४) | | ४९,५० | विश्वाधारा! दिसशि नच कां?- | |
| | | | २४५ | विषमकाल(क.२११) | [क.५० |

॥ श्री सद्‌गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

# काव्य कुसुम कलिका

## द्वितीय–उद्भव

# पुष्पपाकळ्या.

### कविता क्रमांक १ "तें"

१ लें वृत्त—श्री ( एकाक्षरी. ग ) ऽ

तो
जो
त्या
ध्या ॥१॥

मां[1]
वा
क्ष्मा[2]
ध्या ॥२॥

बा !
ध्या
ती
श्री ॥३॥

ज्ञी
वी!
धी[3]
ह्री[4] ॥४॥

ही
धी
जी
वी—॥५॥

ध्या !
ध्या !
त्या
मां ॥६॥

---

१ लक्ष्मी. २ पृथ्वी. ३ बुद्धि. ४ विनय.

जी
जैं
ती
श्री ॥७॥
की
ही
गौ[5]
नौ[7] ॥८॥

हें
दें[6]
तें[9]
ने ॥९॥
तें
जें
ध्या
व्हा ! ॥१०॥

प्रभुदरबार शालिबंडा हैद्राबाद द.
रविवार का. शु. २ शके १८५१ ]

---

क. क. २ स्त्री, श्री.

२ रें वृत्त—स्त्री ( दोनअक्षरी. ग ) ऽ ऽ

भूक
भू[11] खं[12]
व्यापी
वा पी ॥१॥
वेद्यां[13]
आढ्यां[14]
रथ्यां[15]
पथ्यीं[16] ॥२॥
स्त्री, श्री
नाशी—

लोभ
क्षोभें ॥३॥
देई
घेई
दाता
मोक्ता ॥४॥
देवें
ध्यावे
भावें
गावे ॥५॥

---

५ बीज. ६ पृथ्वी. ७ नाव. ८ ग्राह्य. ९ त्याज्य. १० ब्रह्म. ११ पृथ्वी. १२ आकाश. १३ जाणणाऱ्याला. १४ श्रीमान्सामर्थ्यवानास. १५ मार्गी. १६ हितकर.

## क. क्र. ३ हेवा, देवा.

२ रें वृत्त स्त्री ( दोनअक्षरी. ग ग ) ऽ ऽ

बाहीं
ध्यायीं
नामें
प्रेमें ॥१॥
ज्याला
त्याला
मोदें
ओ दे ॥२॥
ईशा
देशा
गायीं !
बाहीं ॥३॥
देवा !
न्यावा
हेवा
देवा ॥४॥
लावा
भावा !
सेवा
सेवा ! ॥५॥

[ मु. सैफाबाद, फा. हैद्राबाद द.
सोमवार का. शु. ३ श. १८५१ ]

---

## क. क्र. ४ अतृप्तां

३ रें वृत्त—नारी ( तीनअक्षरी. म ) ऽ ऽ ऽ

आद्यंतीं
संव्याप्ति[१]
नित्याची
आद्याची[२] ॥१॥
निर्माता
उद्भूता[३]
आकाशीं
आकर्षी ॥२॥
त्या कालीं
कैवल्यीं
ती क्रांती
दे मुक्ति ॥३॥
तेव्हांही
कीं राही—

---

१ पुनर्जन्म. २ ईश्वराची. ३ दृग्गोचरास.

| | |
|---|---|
| ⁴आकांक्षा | अतृप्ता- |
| ⁵अन्वक्षा ॥४॥ | ना शांती |
| ⁶उद्भ्रांता | ना मुक्ति ॥५॥ |

---

## क. क्र. ५ आवृत्ती

३ रें वृत्त—नारी ( तीनअक्षरी. म ) ऽऽऽ

| | |
|---|---|
| श्री, नारी | त्यां प्राप्त- |
| संहारी | ते होत ॥३॥ |
| सद्बुद्धि | विज्ञप्ति |
| संशुद्धि ॥१॥ | अव्यक्तीं |
| त्यायोगें | व्हावी ती |
| तो भोगे- | आज्ञाप्ति- ॥४॥ |
| आवृत्ती | आवृत्ती |
| सव्याप्ति ॥२॥ | आसक्ति |
| घ्याती जे- | ज्या रीतीं- |
| ⁷अव्याजें | जावी ती ॥५॥ |

प्रमुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार का. शु. ४ श. १८५१

---

## क. क्र. ६ "मृगी"

४ थें वृत्त—'मृगी' ( तीनअक्षरी·र ) ऽ।ऽ

| | |
|---|---|
| घे उडी | ही मृगी ॥१॥ |
| केवढी ! | ना कुणीं |
| कां उगी | या वनीं |

---

४ इच्छा. ५ इंद्रियगोचरास. ६ गोंधळलेल्यास. ७ अकृत्रिमपणें.

पारधी
हे वधी ? ॥२॥
हा कृशा
सवश:
बावरे
कां बरें ! ॥३॥
ही भिते
नाहिं त
कां मनीं
आणुनी ? ॥४॥
तेविं या—
मानवा
कां भिती
कोणती ! ॥५॥
कां वृथा
ही व्यथा
या जगीं
बाळगी ॥६॥
ही भिती
विस्मृति—
देववी
कष्टवी ॥७॥
मानवा
ज्ञान, वा
भक्ति दे
मुक्तिते ॥८॥
वाटली
लाभली
धी भली—
भूतलीं ॥९॥
विश्व वी
देववी—
भक्ति ही
मुक्ति ही ॥१०॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार का. शु. ५ शके १८५१ ]

---

क. क्र. ७ "सुकन्या"

५ वें वृत्त—कन्या ( चारअक्षरी. म ग ) SSSS

ऐशी कन्या
मोठी धन्या
कामें सारीं
नेमें सारी ॥१॥
कार्यीं दक्ष
ठेवी लक्ष
ना जी माने
मोदें वागे। ॥२॥

जैसें बोले
तैसें चाले
मर्यादेनें
सांगू जाणे ॥३॥
विद्याभूषा
वागे, दूषा-
सांडोनीया
ठेवी माया ॥४॥
वागे मानें
आनंदानें
जेथें राही
ही श्री होई ॥५॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार का. शु. ५ शके १८५१

---

क. क्र. ८ 'कुकन्या'

५ वें वृत्त —कन्या ( चतुराक्षरी. म ग ) SSSS

ओठीं हास्य
दृष्टीं लास्य
कांहीं बाही
ऐके, पाही ॥१॥
दावी मोद
चित्तीं क्रोध
वागूंजाणे
वर्चस्वानें ॥२॥
ऐशी वृत्ति
ठेवी चित्तीं
लोकीं रीती
सांगे नीती ॥३॥
सारल्याची
सत्यत्वाची
ताटातूटी
फाटाफूटी ॥४॥
काढी वर्म
जाणें धर्म
ऐशी कन्या
तीही धन्या!! ॥५॥

फायनान्स हैद्राबाद द.
बुधवार का. शु. ५ शके १८५१

---

क. क्र. ९ "सती"

६ रें वृत्त—सती ( चारअक्षरी. न ग ) । । । ऽ

निजकरीं
असु धरी
तरिच ती
खरि **सती** ॥१॥
जरि ¹मता
वसत ती
म्हणवि कां
**सति** फुका ! ॥२॥
**सति**कृता
जरि न ती
अजि दिसे
परि असे– ॥३॥
गत **सती**–
कृत कृती
श्रुतिपथीं
पडत ती
²पुनित ही
अजुनिही
स्मरण तें
करवितें ॥४॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार का. व. ६ शके १८५१

क. क्र. १० "पंक्ति"

७ वें वृत्त—पंक्ति ( पंचअक्षरी. भ ग ग ) ऽ । । ऽ ऽ

भ्रांति पडे ती
पाहुनि **पंक्ति**
स्वर्नगरीची
अमृत⁴वींची ॥१॥
वीज नभीं ती
फांकवि कांती
कीं ललनांची
**पंक्ति** रदांची ॥२॥
हंसिनि³**पंक्ति**
भक्षित मोती
कीं उगळीती
दाटुनि तृप्ति ॥३॥
काय सुराचें
स्वर्ललनांचें

१ प्राण. २ पावन. ३ ओळ. ४ अमृतलहरी. ५ दांत.

हास्य म्हणावें
लास्य गणावें ! ॥४॥
मौक्तिकराजी
कीं बिसं अब्जीं
काढि सुदंती
अक्षरपंक्ति ॥५॥

मु. प्रभुदरबार हैद्राबाद द.
गुरुवार का. शु. ६ शके १८५१ ]

---

क. क्र. ११ देही

८ वें वृत्त—तनुमध्या ( सप्ताक्षरी. त. ज. ) ऽ ऽ । । ऽ ऽ

ओंद्या अनुवद्यों—
दिव्या तनुमध्या—
तूझ्या प्रतिपाद्या—
नाहीं तशि विद्या ॥१॥
जाणों तुज बुद्धि—
जाते तव शुद्धि
जावा तनुबुद्धि
व्हावी तव शुद्धि ॥२॥
जो कां तवसक्तीं—
ऐशा निजभक्तां
देशीं लव शक्ति
होई अनुरक्ति ॥३॥
तेव्हां अनुरथ्या—
वाटे अति पथ्या
तेथें मन राहे
दाहीं दिशि वाहे ॥४॥
त्याच्या अनुकंपे—
सारे झणिं सपे
मी तो जडबुद्धि
तत्स्थान निषेधी ॥५॥
जों त्वत्पदिं आलों
तेव्हां लव धालों
अभ्युत्थित आहे
अभ्यागत पाहे ॥६॥
नेई प्रभुपायीं—
याच्याविण कांहीं

---

१ हावभावयुक्त नृत्य. २ ओळ. ३ कमलतंतु. ४ कमलांत. ५ मूळचा. ६ अनुलक्षून सांगण्या जोगें. ७ सूक्ष्मगाभा. ८ स्पष्टकरण्यास्तव. ९ तपासणी शोध. १० तन्निष्ठ, तत्पर. ११ भक्ति, निष्ठा. १२ बाजूची पायवाट. १३ हितकारक. १४ कृपेनें. १५ उभा राहिलेला. १६ जवळ आलेला.

दूजी नच इच्छा
व्हावी मम पृच्छा[1] ॥७॥
द्यावा मज भाक—
'काहीं तरि शीक !'
आज्ञा अशि व्हावी
तैसा पथ दावी ॥८॥
विद्या अशि यावी—
भूत, स्थित, भावी
वर्त्तीत मुरावी
नैसर्गिक व्हावी ॥९॥
सद्वृत्ति वसावी
इच्छाच नुरावी
ही देहि सुटावी
देहीं न रमावी ॥१०॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शुक्रवार चै. व.३ शके १८५१ ]

---

क. क्र. १२ "वसुमती"

९ वें वृत्त—वसुमती ( सहाअक्षरी. त स ) SSI I IS

माता वसुमती[3]
प्रीती करि अती
बाळा भरविते
आम्हां जगविते ॥१॥
श्रीमंत म्हणवी
लाभोनि पदवी
भूमाय विसरे
झांकीच पदरें ॥२॥
रंकांस हंसवी
दुष्टांस शमवी
देई नित नवी
सौख्यादि पदवी ॥३॥
दीनावरि तरी
माया अति करी
दैन्यांत ज़गवी
दुःखां विसरवी ॥४॥
वृद्धा वसुमती[3]
इच्छी जरि न ती
सेवा करुं तिची
सत्पुत्रकृतिची ॥५॥

फायनन्स हैद्राबाद द.
रविवार का. व. १ श. १८५१ ]

---

१ चौकशी. २ असलेलें, हजर. ३ पृथ्वी.

## क. क्र १३ "विद्युल्लेखा"

### १० वें वृत्त—विद्युल्लेखा ( सहाअक्षरी. म म ) SSSSSS

श्री ही विद्युल्लेखा[1]
भोज्या भूषा ज का
—भाग्यीं वांटे ज्यानां—
आतां सांगे दैना ॥१॥

ऐश्वर्याचे भोक्ते—
येथें होतेना ते ?
आतां कोठें हो ते ?
ऐकूं आले हाते ! ॥२॥

नेत्रीं एक्या रात्रीं
पाहे श्रीची ज्योती
सांगूलागे जों ती—
गेली वाऱ्यानें तीं ॥३॥

एका काळीं जते[5]—
होतों—तेव्हां—जे ते—
साधूं, भोगूं सारे
होते ऐसे वारे ॥४॥

ओठीं लावायाला—
गेलों जो तो पेला
हातीचाही गेला
झालें अन्नामेला ॥५॥

वाटे आतां आम्हां
भाग्याची ती भामा—
स्वप्नीं आली होती
गेली केव्हांची ती ॥६॥

मातीचेंही सानें—
झाले होते ज्यानें
आतां त्याची मातां
झाली हातोंहातीं ! ॥७॥

गेल्यानें ती दीप्ति[6]
भ्रांष्ट भ्रष्टाहातीं—
अशी ती जन्माची
झाली ना नांवाची ॥८॥

एकाकाळीं जेते—
होतों, आतां जे ते
पाहोनी आम्हाते
हातीं देतीं जाते ॥९॥

तेव्हांच्या त्या श्रेष्ठां
पाहोनी हीं चेष्टा
होते जी का दैना
तीही सोसावीना ॥१०॥

सेवेचें हें जाते—
कोणां ठावे जाते—

---

१ वीज. २ लक्ष्मी. ३ उपभोगाला. ४ शोभा. ५ जिंकणारे. ६ तेज. ७ खापर. ८ च्युत.

कीं ना जाते ! देवा !
धांवा हा ऐकावा ! ॥११॥
भाग्याचा ही रेखा
झाली विद्युल्लेखा
आतां दैन्यासाठीं
लावी मोठी काठी ॥१२॥

शालबिंडा हैद्राबाद द.
गुरुवार फा. शु. २ शके १८५१ ]

---

क. का. १४ "शशिवदना"

११ वें वृत्त—शशिवदना ( सहाअक्षरी. न य ) ।।। ।ऽऽ

शशिवदना कीं
असति न नाकीं
दिसति इथेंही
जरि कुणि पाही ॥१॥
विषयमदानें
कनकबलानें
परिणिति ...
लभतिहि ... ॥२॥
वरुनि अनका
परि न पडे का-
सुखकण दृष्टी
करि मन कष्टी ॥३॥
गरिब बिचारा
गणि निजदारा—
कुवलयगात्रा
तशि मृगनेत्रा ॥४॥
कशिहि असो कीं
शशिसम लेखी
अमरपुराही
नच गणि कांहीं ॥५॥
म्हणत मुखानें
अति अभिमानें
शशिवदना ही
अशि दुजि नाहीं ! ॥६॥

फायनन्स हैद्राबाद द.
रविवार का. शु. ३ श. १८५१ ]

---

१ स्वर्गी.

## क. क. १५ "विचारा कुणाला"

१२ वें वृत्त—सोमराजी. ( सहाअक्षरी. य य ) ।SS।SS

कुणींही कुणाला
जगाच्या जिवाला—
विचारा 'कशाला—
तुला जन्म आला?' ॥१॥

कुणीं प्रश्न केला
महा पंडिताला—
'कुठोनी निघालां
कुठें जावयाला?' ॥२॥

कधींही न कोणीं
न ऐकेच कानीं
खरीं उत्तरें तीं
जरि कांणि देतीं ॥३॥

जिथें जन्म व्हावा
तिथें मृत्यु यावा!
अशा मानवाला—
विचारा कशाला! ॥४॥

कसेंही विचारा
कुठेंही न थारा
म्हणोनी बिचारा
करी येर झारा ॥५॥

यदा जन्म झाला
करी बारशाला
कधीं मुंज लागे
मुदें भीक मागे ॥६॥

कधीं लग्न आलें
सुखानेंहि झाले
तरी शांति ना ती
जपे नातु नाती ॥७॥

असा हा अजोबा
न सोडीच लोभा
वृथा जन्म झाला
वृथा मृत्यु आला ॥८॥

क्षणाचा विसावा
कसा तो न ठावा
अशा मग्न जीवा
कधीं बोध व्हावा ॥९॥

कुठें जावयाचें
नसें भान त्याचे
कशालागिं आलां?'
विचारा कुणाला? ॥१०॥

प्रमुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार ज्ये. व. ८ शके १८५१ ]

## क. क्र. १६ "सोमराजी"

१२ रें वृत्त—सोमराजी ( सहाअक्षरी. २+४=६ य य ) ।ऽऽ।ऽऽ

असे कोणि याजी
म्हणे सोमराजी[3]
अम्हां नांव ठावें
कसें त्यास गावे ? ॥१॥

अम्हां ठाउकें हें—
सुधा गोड आहे
परी गोडशब्दें
कुणां कोणिहि दे ॥३॥

असे ओषधी[2] ती
सुधा बोलताती
तरी तेहि कानीं
असे आयकोनी ॥२॥

जगी लाभली जी
अम्हां सोमराजी[1]
वचें बोलताती
असें तत्प्रतीति ॥४॥

मुखें गोडबोलूं
मुदें नित्य डोलूं
अशी सोमराजी[1]
पडे आज काजीं ॥५॥

मु. श्री संस्थान माणिकनगर
ज्ये. शु. १२ शके १८५३ गुरुवार

---

१ सोमलता. २ ओळ. ३ यज्ञकेलेला, सोमकर्म.

क. क्र. १७ "घडेल कधिं कां हें?"

१३ वें वृत्त—कुमारललिता ( सप्ताक्षरी. ज स ग) । ऽ । । । ऽ ऽ

कुमार सुख वंध्या ॥ उषासमय संध्या
न शक्य लव पाहे ॥ घडेल कधिं कां हें ? ॥१॥
तसेंच जगिं दुखः ॥ गणे असह, मूर्ख
स्वयेंच सुखभूप ॥ तरीहि करि दुःख ॥२॥
सुखां सतत याजी ॥ उपाय किति योजी
श्रमेच दिन रात्र ॥ लभे न लवमात्र ॥३॥
स्वतत्व कुणिं द्यावें ॥ असें कधिं घडावें ?
सुखास विसरावें ॥ तरीच लव पावे ! ॥४॥
म्हणोनि फल त्यातें
मुळीं नच मिळे तें
सदा फसत यत्न
रडे हृदयभग्न ॥५॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द. ]
शुक्रवार का. शु. ७ शके १८५१ ]

---

क. क्र. १८ "मदलेखा"

१४.वें वृत्त—मदलेखा ( सातअक्षरी म स ग ) ऽ ऽ ऽ । । ऽ ऽ

भाग्याच्या मदलेखा
त्या कोणां गणवे कां
यद्भालीं वसल्यानें
न्यायान्याय न जाणे ॥१॥
भाग्याची अतिवृष्टी
झाल्या लोपवि दृष्टि
भील्याला मच रक्षी
तद्दैन्यास न लक्षी !॥२॥
धुंदीनें उलटें तो
दीनां मीचवितो

१ गर्वाची खूण.

लादी वृत्तिनुसारें
त्यातें वाकवि भारें ॥३॥
आठया वाळुनि मोळा
तुच्छत्वें सकळांला—
पाहे त्यातचि लेखा
स्पष्टत्वें मदलेखा ॥४॥
"साऱ्यानीं मज गावें
मी कांहीं न करावें"
जाणां या अतिरेका—
निर्भ्रांतें मदलेखा ॥५॥

प्रभुदरबार हैद्राबाद द.
सोमवार का. व. २ शके १८५१ ]

---

## क. क्र. १९ मधुमति

१५ वें वृत्त—**मधुमती** ( सातअक्षरी. न न ग ) ।।। ।।।ऽ

नच सरळ पथीं
दिसत पदततीं
यदि विचरतें ती
कुणींहि **मधुमती** ॥१॥
नयन न बघती
पद अडखळती
आशि चलितमती
म्हणुनि **मधुमती** ॥२॥
कशि विनयवती—
म्हणाविल जगतीं
जरि क्षणिकमती
असुनि **मधुमती** ॥३॥
किति तरि कुमती
जगतिं अढळती
तरिहि समजती
स्वमनिं **मधु मती** ॥४॥
त्यजुनि चलधृती—
प्रभुपद भजतीं
तरि परमगती
मिळवि **मधु मति** ॥५॥

फायनान्स हैद्राबाद द.
सोमवार का. व. २ शके १८५१ ]

---

१ गर्वाची खूण. २ कपाळाला. ३ निःशंकपणानें. ४ हिरस.

## क. क्र. २० *एक

१६ वें वृत्त—अनुष्टुप् ( आठअक्षरी:—अनुष्टुप् छंदास यद्यपि गणांचा नियम नाहीं तरी प्रतिचरणाचें पाचवें अक्षर लघु, सहावें गुरु, आणि सम (२,४) चरणाचें सातवें अक्षर लघु, व विषम (१,३)चें सातवें अक्षर गुरु असावें. )

नच तें ब्रम्ह केव्हांही ॥ साध्यसें तत्व कीं असें ॥
ना तरी लोपतें कां तें ? ॥ साधिल्यानेंच होतसें ॥१॥
कोण जो साधि एकातें ? ॥ साधितस्थिति सिद्ध ती ॥
शून्यही मोजिल्यां-त्यातें संख्यावाचक बोलती ॥२॥
ज्यायोगें मोजितो सर्वा ॥ प्रत्येकीं एक तें असें
तेंच कीं दाखवी विश्वां ॥ अद्वयाचिंत्य दिव्यसें ॥३॥
काय तें? कुणिं साधावें? ॥ साधनश्रमही नको ॥
जाहलाच तदाभावें ॥ अज्ञ-ब्रह्मविहीन कां ? ॥४॥
नाहिं कांहींच कोठेंही ॥ जाणतो आणि सांगतो
तोच तो सिद्ध केव्हांही ॥ सर्व विश्वहि होय तो ॥५॥

शालीबंदा मार्ग. शु. ७
शके १८५० बुधवार

---

## क. क्र. २१ "गजगति"

१७ वें वृत्त--गजगति (आठअक्षरी.४+४ = ८ न भ ल ग ) IIIS-IIIS

रमविते गजगति ॥ परि तया बघति कां? ॥१॥
बधिरही करि मति ॥ हलति ते पद जिथें
नयन हे टकमकां— ॥ मन तिथें चिकटतें

---

*ही कविता तत्वज्ञानमंदिर वर्ष ११ अंक २–१९२९ च्या मासिकां वून आली आहे.

नवलही न गमतें
नच कसें चिरडतें ? ॥२॥
हळुहळू सरकतां
नच दिसे **गज** अतां
नयन जे बांधिरले
असु जणूं न उरले ॥३॥
बघुनियां मनहरि[1]
करि पळे म्हणु जरी
अजुनिही न दिसलें:—
मन कुठें बहकलें ॥४॥
जरि म्हणूं लवभरी
बिचकला मनहरि[3]
कितितरी गज[2] दुरी
न परते तरि घरीं ॥५॥
कितितरी झडकरीं
**गजगती** मन हरी
कुणितरी अठवलें
म्हणुनि ना परतलें ॥६॥
मृग कधीं अठवुनी
फिरतसे घनवनीं
कधिं कुठें, कधिं कुठें
फिरतसें नित हटें ॥७॥
मधु बघें—मग पळें
नच शकें तरि बळें
जरि मुखीं नच मिळें
मग उगीं हळहळे ॥८॥
सुम दिसे चुळबुळें
मगतरी अति चळें
वरिवरीं वुटमळें
न मिळतां तळमळें ॥९॥
परि तया नच कळें:—
मिळतसे विखिवळें
क्षणिक हें जरि पटे
धडपडे तरि हटें ॥१०॥
नच बसें उगि कधीं
वळवळे मधिं मधीं
शिणविण्यां निजपदां
हुडकितें नव सदा॥११॥
आजि बघे **गजगति**
अचरितें द्रुतगति
कधिं कसें कधिं कसें—
धरितसें नवपिसें ॥१२॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
शुक्रवार(माध्यान्हीं)माघ व१२शके१८५० ]

---

१ मन हाच कुणी सिंह. २ हत्ती. ३ घोडा.

## क. क्र. २२ "वृत्ति"

१८ वें वृत्त चित्रपदा (अष्टाक्षरी. भ भ ग ग) SIISIISS

मंजुल वाद्यांह वाजे
गायन नर्तन माजे
लोभति चित्रपदाला
खिन्न न पाहि तयाला ॥१॥
चित्त नसे जरि जागीं
तो सहजेंच विरागी।
आंतरवृत्ति हंसावी
शांति तदाच वसावी ! ॥२॥
कोंव सुखास्पद वाणूं
दाविल वृत्ति सुकाणूं
योग्यदिशें मन नाव
घेइलही मग धांव ॥३॥
वृत्ति असे जरि शांत
मौजहि बाह्यमुखांत
सौख्य जरी क्षणिं नासे
जाणुनि आंतरिं हांसे ॥४॥
स्वांतर कीं जवं दोही
पाहुनि, लभ्य न कांही
सुंदर चित्रपदांही
क्षोभुच देउं नका ही ॥५॥

मु. फायनान्स हैद्राबाद द.
शनिवार का. शु. ८ शके. १८५१

---

## क. क्र. २३ "*अज्ञानि वाट चालतो"

१९ वें वृत्त —नगस्वरूपिणी
२० वें „ प्रमाणिका
(आठअक्षरी.ज र ल ग)।S।S। S।S

सुदिव्यगोल सप्रभा
महीध्रमस्तकीं उभा—
असे, गमे—परंतु तो—
'अज्ञानि वाट चालतो' ॥१॥
ववावयां न तारकां
असे विधु- परी--फिका--
दिसे जरीहि लोपतो
अज्ञानि वाट चालतो ॥२॥
जगत्प्रवास येवढा
थके करोनि वापुडा
बघाल अस्तकालि, तो
उदास भानु भासतो ॥३॥
विरक्त पूर्ण वाटतो
म्हणोनि संथ चालतो

---

१ चित्रविचित्र, पदगतीला. २ जाळते. *ही कविता तत्वज्ञान मंदिराच्या जुलै १९३० च्या अंकांत प्रसिद्ध झाली आहे.

जरीहि अस्त होय तो
**अजूनि वाट चालतो ॥४॥**
शशिप्रभेस पाहतां
गमे जरीहि हर्षिता
जिथोनि झाल्हि ती गता--
तया विधूस पाहतां--॥५॥
गतप्रहर्ष वाटतो,
विषादमग्न भासतो
कळे न कां ? तरीहि तो
**अजूनि वाट चालतो ॥६॥**
विहगकूजितध्वनि
विशाल भाग कोंदूनी
प्रबंध मंजुळस्वरें--
कुणास ऐकवी बरें ! ॥७॥
नसेच एकही घरीं
सुशांत या जगांतरीं
कुणी पहा दिसेल तो--
**अजून वाट चालतो ॥८॥**
निसर्गकांति दिव्यशी
स्वभावमाधुरी, तशी
मनोज्ञ ही वसुंधरा
गमे जनांस सुंदरा ॥९॥
वसे न स्वस्थ एकही
नभार्णवास्थिता मही
ग्रहादि सूर्य, चंद्र तो
**अजूनि वाट चालतो ॥१०॥**
वृथाच कीं धरा फिरे
तशी गृहेंहि कां बरे !--
कशास भोगिती सदां--
अशी प्रवास--आपदा ? ॥११॥
तमा प्रकाश पारखा
तरीहि द्वेष सारखा--
करीत पाठलाग तो
**अजूनि वाट चालतो! ॥१२॥**
कळे न काय ध्येय तें
असेल कार्य कोणतें ?
उदास हा प्रवास कां--
जिवास लागला फुका? ॥१३॥
कधीं कुठोनि चालिला
क्षणैकही न थांबला
कुणासही पहाल तो--
**अजूनि वाट चालतो!॥१४॥**
जगांत मृत्यु पावला
जनांस शोक जाहला
न तो प्रवास थांबला
पुनश्च फार लांबला ॥१५॥
नवीन जोम यावयां
प्रवासशक्त व्हावयां--
जिवास गर्भवास तो
**अजूनि वाट चालतो ॥१६॥**
जणूं शिळी शिदोरी ती
त्यजोनि देतिही पथीं

उगीच मृत्युभीति ती
जयास अज्ञ बोलती:— ॥१७॥

"मनुष्य मृत्यु पावतो
दिसे न कीं फिरोनि तो"
परी न होय मुक्त तो
**अजूनि वाट चालतो** ॥१८॥

मनुष्य मृत्यु पावला
नवीन जन्म आहला
विरोध दावि ही स्थिती
तरीहि गोष्ट एक ती ॥१९॥

कुणीं विचारिल्यां असें
मनांत येतसें हंसें
तयास हेंच सांगतो :--
**अजूनि वाट चालतो** ॥२०॥

जिवां जगांत यावयां
प्रवास लागतो हवा
परी इथोनि जावयां--
क्षणैकही नको तया ॥२१॥

पुढील सौख्यदस्थिती
धरोनि भाव्रि हांव ती
करीत पुण्यकर्म तो--
**अजूनि वाट चालतो** ॥२२॥

कितीक जन्म घालवी
तरीहि हांव कां हवी !
गणोनि हालही नवे
सहर्ष धांवती थवे ॥२३॥

वसुंधरा जिवां नवी--
दिसात्रि कां अजूनिही !
गणाल काय काल तो !
**अजूनि वाट चालतो** ॥२४॥

विशुष्कसैकताविणें—
नसेच कांहिं पाहणें
अशा मरुस्थलीं जिणें
जलास नित्य शोधणें ! ॥२५॥

तशीच कीं सुखस्थिती
कधीं न प्राप्त होय ती
तयास सेवु इच्छितो—
**अजूनि वाट चालतो** ॥२६॥

"कराल काल वाटतो
जिवांस तोच मारतो
जनांस ईश तारतो
मनुष्य आयु सारतो" ॥२७॥

असें अनेक बोलती
विरोध कांणिं दाविती
जरीहि सत्य शोधितो—
**अजूनि वाट चालतो** ॥२८॥

असोत कृष्ण कोळसे
करोनि घेति गोडसे
हिराहि कोळसा—मतें
सुतत्वसार एक तें ! ॥२९॥

प्रसिद्ध आणि सिद्ध तें
जरी विरोधि वाटते

निघे, फिरे परंतु तो—
**अजूनि वाट चालतो** ॥३०॥
सशक्त शक्ति दाविती
बळें अशक्त पाडिती
पुढें पुढेंच धांवती
न ते फिरोनि पाहती ॥३१॥
सुखास साधु साधिती
जगद्धितार्थ कष्टती
असो कसाहि कोणि तो—
**अजूनि वाट चालतो** ॥३२॥
छळींत सुष्ट दुष्ट तो
स्वयेंच सौख्य इच्छितो
म्हणोनि देइ दुःख तो
अशस्त्र घाव घालतो ॥३३॥
असेंहि भेदितो मधीं—
न ये भरोनियां कधीं
तरी अतृप्त राहतो
**अजूनि वाट चालतो** ॥३४॥
कुणी सुपंथ चालतो
कुणी उमाच लक्षितो
त्वरेंच धाइनें पळे
पडोनि कोणि विव्हळे ॥३५॥
धुळींत कोणि लोळतो
दुजा रथीं विराजतो
परी प्रवासमार्ग तो
**अजूनि वाट चालतो** ॥३६॥
कुणी थकोनि टेंकतो
कुणी सदैव पेंगतो
सुयानि झोपती बडे
तरी प्रवास त्यां घडे ॥३७॥
दरिद्रि पायिं चालतो
सदैव गात राहतो
अनेक जन्म धांवतो
**अजूनि वाट चालतो** ॥३८॥
कुणास शुद्धि आलियां—
"उगेंच सांडिले वयां
करावि ही कितीतरी
बरी न कीं मुशाफरी" ॥३९॥
समूळ हौसही फिटे
खराच तो जरी विटे
प्रवासदुःख सांगतो
**अजूनि वाट चालतो** ॥४०॥
कितीक मार्गि भेटती
कुणास प्रेम लाविती
करोनि साह्यही किती
कितीक त्याग सांगती ॥४१॥
उपाय एक इच्छितो
दुजा तयास सांगतो
परंतु हाहि आणि तो—
**अजूनि वाट चालतो** ॥४२॥
सदैव काम त्यागुनी
शमादिषट्कसाधनीं

नितांत श्रांत होतसे
करीत साध्यही तसे ॥४३॥
सुकीर्ति, मोह सांडुनी
अशेष बंध तोडुनी–
विमुक्त होऊं इच्छितो?–
अजूनि वाट चालतो ॥४४॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार का.व. १४ शके १८५० ]

---

क. क्र. २४ **"काल कसें आज कसें ?"**

२१ वें वृत्त—माणवक
२२ वें „ माणवकक्रीडित (आठअक्षरी. भ त ल ग) SIISSIIS

येत उषा विश्व हंसे
तोंच निशा येइ जसे
काय वदू ते कितिसें
होत असे हाय ! कसें ॥१॥

कालचि की जी सधवा
एक दिनें काल नवा–
ये, अथवा–कांहिं नसें–
काय वदूं हाय ! कसें ॥२॥

विश्व हसे तीहि हंसे
भास्कर जो रक्त दिसे
हाय ! वदू तें कितिसें
**काल कसें? आज कसें?**॥३॥

पूर्वदिशा रम्य दिसे
कुंकुमहि भालिं वसे
तीच निशाकालिं जशी
ही हतबालाहि तशी ॥४॥

जाउनि सौभाग्यश्री
कोंवि नभोभाल दिसे
कालवितें जें हृदयीं
हाय ! वदू काय कसें ! ॥५॥

हे हृदयांतील घरे
सांगुतरी काय बरें !
ऐकुनि पाषाण झरे
वाळुनि जातील झरे ॥६॥

देह जरी दोन म्हणा
प्राण परी एक गणा
एक असें एक नसे
काय वदूं-कोंवि वसे ? ॥७॥

शाश्वत कांहींच नसें
कालहि वेताल असे
वागत वाटेल तसें
लागत कीं त्यास पिसें ॥८॥

नेडीत प्रकाश तसें
टाकित सुवास असा
जाळुनि हृद्देश, हंस
हाय ! वदूं काय कसें ? ॥९॥
वृश्चिक ज्या हृत्तरुणीं
शोक सदा पांघरुनी
घेउनियां खेदउशी
झोंप तरी यावि कशी ? ॥१०॥
प्राण कसा काठिं वसे
हेंच किं आश्चर्य असें

शोकबळें शुद्धि नसे
हाय ! वदूं काय कसें ॥११॥
सिंचुनि बाष्पोष्णजळें
केंवि फुलावात फुलें ?
दग्धचि उष्ण श्वसनें—
होतिल आराम वनें ॥१२॥
काळहि होताच निशी
काळनिशी आज कशी ?
उज्वलसें कृष्ण दिसें
काल कसें? आज कसें? ॥१३॥

शालीबडा हैद्राबाद द.
शुक्रवार आश्वि. व. ६ शाके १८५१ ]

---

## क. क्र. २९ "तळमळ"

२३ वें वृत्त—*रुचिरा १( आठअक्षरी. न न ल ल ) ।।।।।।।।

रुचिर[1] मधुरतर ॥
अजर[2] अज[3] अमर ॥
प्रभु पटुतर[4] पर[5] ॥
अकरण[6] परतर[7] ॥१॥
प्रभुस कुणि म्हणत
नच नयनिं दिसत ॥

म्हणुनि मनिं गमत
प्रभुवर अनुमित[8] ॥२॥
प्रभुवर अघहर[9] ॥
भयद–भव, अचिर[10]–॥
क्षणिक जरि पटत ॥
नित नव पटवित ॥३॥

*रुचिरा वृत्त २ प्रकारचें आहे 'रुचिरा'(१) हें अष्टाक्षरी वृत्त तर रुचिरा(२)तेरा अक्षरी आहे. "चिररुचिरा" क. क्र.(१०४) पहा ! १ मोहक, सुंदर. २ जरारहित. ३ जन्मरहित. ४ अतिचतुर. ५ श्रेष्ठ. ६ परब्रह्म. ७ परेच्याही पलीकडील. ८ तर्कानें–जाणलेला. ९ पाप हरणकरणार. १० न टिकणारें.

त्रिभुवनपरिवृत[1] ॥
अविरल अविकृत[3] ॥
अघहर[4] तवपद ॥
वसत नित यशद ॥४॥
म्हणतिहि अनुसृत[5] ॥
प्रभु हार्दिंच वसत ॥
दशादिशिं अविरल ॥
अचरम[6] अविकल ॥
चिर सुषम रुचिर ॥
अनुपम सुखकर ॥
त्यजुनिच अनुषंग ॥
मनुज जगिं भ्रमत ॥६॥
प्रमुक्षप अविरत ॥
यदि हृदयिं घडत ॥
वसताचि पटविर
नच लय अनुमिते[11] ॥७॥
प्रभु झाणें रुजवान— ॥
तवतळमळ मानिं ॥
हरि मम कलिमल[12] ॥
करवि यश विमल[13] ॥८॥

खालीबंडा हैद्राबाद द.
रविवार शु. ४ शके १८५१

---

## क क्र. २६ "चित्तस्थैर्य"

२४ वें वृत्त—वक्त्र
२५ वें „ वक्र
अक्षरें ८ गणांचा नियम नाही

चित्तस्थैर्यस्थिती जाणा ॥ साक्षी आत्माहि तो माना ॥
आनंद चित्ति दाटावा ॥ कारणावीण जेधवा ॥१॥
चित्तस्थैर्या नको कष्ट— ॥ घेणें तेही नसे इष्ट ॥
केव्हांही होतसें स्थीर ॥ वस्तुतः मूळचें धीर ॥२॥
आद्यंतीं स्थीर ते आहे ॥ वाटे कीं भंगतेही हें ॥
मध्येंच कोण कां बाहे ॥ ज्यामुळें स्थैर्य जातें हें ॥३॥

---

१ पसरलेलें २ दाट. ३ स्वाभाविक रूपांतर—न झालेला. ४ पापहरण करणारा. ५ शरणागत. ६ श्रेष्ठ, पहिला. ७ अव्यग. ८ सुंदर. ९ अनुकूल-रस्ता. १० निरंतर. ११ तर्कानें, जाणलेला. १२ पाप. १३ निर्मल, स्वच्छ.

नृत्यांदोळें असें हाले-॥ टोचले तीव्र कीं भाले ॥
वाटे क्षणैक नाटोपे ॥ पूर्वींचें स्थैर्यही लोपें ॥४॥
केव्हांही ती स्थिती राहे ॥ अस्थैर्यें जो कुणी पाहे-
स्थैर्यांतुनी निघोनीयां- ॥ ती स्थिती न्याहळा वाया ॥५॥
आलेलें तें दुजें होतें ॥ जाणतां तत्क्षणीं जातें ॥
प्राक्सिद्ध शांतचित्ताची-भूमिका त्यास ना जाची ॥६॥
स्थैर्यांतुनीच जागावें ॥ जाग्रताच्या गुणां गावें ॥
जेव्हां पुनश्च झोंपावें ॥ पूर्वीची स्वस्थिती पावे ॥७॥
स्वाधीना सिद्धि सोडावी ॥ प्राक्सिद्धा शांति मोडावी
आल्यास वक्र तेथोनी भासती भाव हे दोन्हीं ॥८॥
होतां अंतर्मुखा वृत्ती ॥ निद्रिस्थां लभ्य जी शांती-
नित्यानुभाव्यसंसिद्धि ॥ लोपते विश्वसंशुद्धि ॥९॥
स्थैर्यीं कीं राहनां मोदें ॥ कोणाला कोण-जो ओ ! दे
आनंद नांदतो जेथें ॥ केविं राहे दुजें तिथें ॥१०॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार आश्वि.व.१३ शके १८५१

---

## क. क्र. २७ "वितान"

२६ वें वृत्त—**वितान**(आठअक्षरी.प्रमाणिकाविभिन्न,त र ल ग)SSISISIS

आकाश हें **वितान**सें
आच्छादिलें असें दिसे
जो जो जिथें जिथें बसे
सर्वांस सारखें असें ॥१॥

कौशल्य पाहुनी गमे
आश्चर्यही इथें दमे ॥२॥
वाटे तरी दुजें असें-
नाहींच निर्मिलें कसें

ईशेंच निर्मिलें असे
ऐसें **वि**[१]**तान** दिव्यसें
कां जाहलें न शक्य तें
त्यातें अशक्य काय ते ? ॥३॥

---

१ छत.

केव्हां गमे—असें नव्हें
तैसेंहि कां न संभवे
तत्साम्यता नसे कुठें
हेंही तसेंच एकटें ॥ ४॥

सम्राट तो जसा तसें
साम्राज्य विश्व हें असें
तत्छत्र हेंच कां नसे !
वाटे जरी विलासेंं ॥५॥

प्रभुदरबार हैद्राबाद द.
शनिवार का. शु. ७ शके. १८५१ ]

---

## क. क्र २८ "कोठें कांहीं कोठें कांहीं"

२७ वें वृत्त—विद्युन्माला ४+४=८त म ग ग SSSS-SSSS

**कोठें कांहीं--कोठें कांहीं**
कांहीं आहे कांहीं नाहीं
आहे तेथें कांहीं बाहीं
नाहीं त्याची चिंता वाही ॥१॥

जागा नाहीं रम्योद्यानीं
आहे जेथें त्या आरण्यीं–
काम्यांचीही संख्या नाहीं
**कोठें कांहीं! कोठें कांहीं!** ॥२॥

विद्या नाहीं पैसा हातीं
विद्वांसानां द्रव्यासक्ति
विद्या लक्ष्मी दोन्हीं जेथें
रोगाचें कीं ठाणे तेथें ॥३॥

दत्ताजी संन्यासा घेती
वैपुल्यानें धान्यें येतीं
होते तेव्हां खाण्यां नाहीं
**कोठें कांहीं! कोठें कांहीं !** ॥४॥

गेले त्यांची गाणीं गाती
आहे त्यांचीं होते माती
साडेसाती वाटे चित्तीं
गेल्यानें की होते खंती ॥५॥

आजा मेला—नातू झाला
आनंदाचा पान्हा आला
आई गेली, बाबा नाही,
**कोठें कांहीं ! कोठें कांहीं !** ॥६॥

वृष्टी गेली, शेतें मेलीं
झाडें जीं–तीं काष्ठें झालीं
वृक्ष्याविक्रयें मेले माळी
झाली तैशीं वया गेली ॥७॥

रानीं मोठी वृष्टि झाली
प्रोद्यानें पुष्पें आलीं

---

१ छत.

काली कोणी त्यातें नाहीं
कोठें कांहीं! कोठें कांहीं! ॥८॥
ब्रम्हांडाची आटाआटी
जन्मांधाची जैशी काठी
यत्नें सारीं सौख्यासाठीं
त्याची सुद्धा नाहीं भेटी ॥९॥
आत्मेच्छाही ज्याची खोटी
येती दुःखें पाठोपाठीं
छोटी मोठी सर्वांनाही
कोठें कांहीं! कोठें कांहीं!॥१०॥
प्रत्यक्षाची ना आकांक्षा
नाहीं त्याची मागे भिक्षा
त्याला देई कीं ही शिक्षा--
आहे त्याची होते रक्षा ॥११॥
कारागारीं इच्छी मोक्षां
मुक्तां नाहीं कर्तव्येच्छा
कोणां जाची केलें तेंही
कोठें कांहीं! कोठें कांहीं! ॥१२॥
ओढे, नाले वर्षाकाळीं
आले गेले शांती झाली
वक्ता होता जो वाग्जाली
तेव्हांची ती स्फूर्ती गेली ॥१३॥
वीराच्या ज्या मोठ्या मोठ्या—
बाता झाल्या साऱ्या खोट्या
कर्में केलीं कीर्ती नाहीं
कोठें कांहीं! कोठें कांहीं !॥१४॥
जो लाभाला मरी भाला
लाथाडी जो सर्वस्वाला
होणें जाणें--गेलें त्याचें
संपूर्णांशें व्यक्तित्वाचें ॥१५॥
त्याचें ऐसें कांहीं नाहीं
झाला, होता, भावी पाही
अद्वैतानें सारें कांहीं
कोठें कांहीं! कोठें कांहीं! ॥१६॥

[ शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार आश्वि. व. ४ शके १८५१ ]

---

## क. क्र. २९ "आत्मघातकी"

२८ वें वृत्त—**समानिका** ( आठअक्षरी. र ज ग ल) ऽ।ऽ।ऽ।ऽ।

वाट पाहतां थकोनि
त्रस्त होति नेत्र दोन्हि
झांकुं लागले म्हणोनि—
मीहि बसे सांवरोनि ॥१॥
ट्रंक ओढिली मधून
बॅग हातिं आवळून

पर्स ठेविली बघून
कीं खिसेंहि चाचपून ॥२॥
पाहिले कितीकवेळ
रिस्टवाच वा घड्याळ
स्टेशनावरील काळ
काय हो ! कसा खटयाळ! ॥३॥
जाहल्यां अम्हां उशीर
अल्पही न त्यास धीर
जात कीं निवोनि खीर
धीरना धरीच वीर॥४॥
आधिं आलियां असाच–
रेंगतो जणूं ससाच
तोंच झोंप लागतांच–
धांवुं लागतो त्वरेंच ॥५॥
वाढतां तदीय हीट
कीं पळेच काळवीट
कां अतांच त्यास फीट–
आलि–कीं कळे न नीट! ॥६॥
वाट गाडिची फिरून–
पाहुं लागलों–मधून
उंच मानही करून–
यत्नि लागलों कसून ॥७॥
एकचित्त व्हावयास
ठेउनी प्रशांत त्यास
कान लाविले ध्वनीस
श्वास घेत सावकाश ॥८॥
शीट ऐकुं यावयास–
झांकि अर्धपापणीस
ये दया न पापिणीस
व्यर्थ गेलि तीहि आस ॥९॥
नेत्र झांकती मधेंच
ते वटारुनी बळेंच
पाहि जों दिसें तिथेंच–
झोंपले किती तसेच ॥१०॥
वाटलें मनीं तसाच
मीहि झोंपल्या पुनश्च
जागवील ना कुणीच
त्रास कीं पुढें उगीच ॥११॥
लागला प्रसंग तोंच
एक आठवे असाच
घाबरोनि त्या भयेंच–
राहिलों तदा उभाच ॥१२॥
झोंप कीं तरीहि त्रास
देउ लागली मनास
नेत्र घेति तोच ध्यास
चाललाहि तो प्रवास ॥१३॥
बॅग घेउनी उशास
ट्रंककंधरीं शिरास--
टेकिलेंच ज्या क्षणास
काय त्या वदूं सुखास ! ॥१४॥
तोहि संपला प्रवास
सत्वरेंच दिव्य भास

भास?--छे नव्हेच, खास--
ती प्रिया मदीयहास! ॥१५॥
खास ती प्रियाच खास
रूप तेंच मंदहास्य
दिव्यतेजसामरस्य--
कीं फिकेंच तें रहस्य ॥१६॥
ती लवैक दिव्यकांति--
पाहतां पडेच भ्रांति
नेत्रही दिपोनि जाति
येइ तत्क्षणींच सुप्ति ॥१७॥
आद्वितीय तो प्रकाश
झांकितो अहा! नभास
कोण तो म्हणेल भास?
बुद्धि टाकिते तयास ॥१८॥
येउनी प्रियाच तेथ
अमृतोपमस्वरांत
बोलते--कशास नाथ--
होतसां श्रमी मनांत? ॥१९॥
कां मदीय काळजींत
देह नित्य वाळवीत
ही अभागि आठवीत
कष्टतां कशास व्यर्थ?' ॥२०॥
त्यापुढें न शब्द येत
शुष्क, रुद्ध कंठ होत
अश्रुपूर लोचनांत--
वाहुं लागले क्षणांत ॥२१॥

प्रश्न आणि उत्तरास
बाष्प एक त्या क्षणास
शुद्धि कोठली अम्हांस
कोण बोलते कुणांस? ॥२२॥
व्यक्ति दोन चित्त एक
तेचि होति एकमेक
दिव्यभाव जो लवैक
लोपवी पहा! अनेक ॥२३॥
पूर लोटतां बराच
नेत्र जाहलेच स्वच्छ
धांउ लागले तिथेंच
पाहतों पुन्हां प्रियाच ॥२४॥
एक भव्य तेजगोल
आंत-आंत-फार खोल
देखिले प्रियाकपोल
ती विविक्षिता विलोल ॥२५॥
खेद वाटला मनास:--
'हाय! दैव दुर्विलास
आलियां प्रिया तरीहि
मी विचारिलें न कांहिं ॥२६॥
तत्क्षणींच घाबरोनि
हांक देत ओरडोनि
त्यामुळें अहा! त्वरेंच--
आलि कीं प्रिया खरेंच! ॥२७॥
मी विचारिलें प्रियेसि
"एकटीच केंवि येसि?

गेलि जी मला त्यजून
भेटि नाहिं कीं चुकुन ॥२८॥
आठवे मला अजून
'पान वाजतां पळून
तूंच ना स्वतेजयान-
वेष्टिशी मला मिळून ! ॥२९॥
तू असा दुज्या जगांत
मी जसा अजूनि येथ
चिंतना तुझ्याच चित्त
मीहि कीं वसे तुझ्यांत ॥३०॥
स्थान दोन देह भेद
ध्येयिं तत्वतः अभेद
दिव्यतेज-रूप होशी
कां न तें मलाहि देशी?"॥३१॥
तेधवां वदे हंसून
कीं खुलें नवप्रसून
'शीघ्रगामि एक दूत-
आणिला सवेंच येथ ॥३२॥
कांचनांकिता जमीन
स्वर्णनीर, हेममीन
दिव्यता जरीहि प्राप्त
प्रेमशांति नाहिं नाथ ! ॥३३॥
ध्यानमूर्ति ही इथेच
ध्येय सर्व राहिलेंच
नाथ! नाथ! त्यामुळेंच........
काय सांगु-तेंच तेच ! ! ॥३४॥

लोह मार्ग डावलोनि-
या, पहा ! पहा ! जपोनि
पक्ष फेंकुनीच दोन्हि
या असें ! असें ! उडोनि ॥३५॥
व्योमयान वा विमान
व्यर्थ विश्वतो प्रयत्न
त्याग साधुनीच पूर्ण
सर्वकांहिं या त्यजून ॥३६॥
येथ राहि सर्वकाहिं
कीं अपक्ष्य कांहिं नाहिं
वागवूं नकाच कांहिं
सोडुनी मदीयताहि—॥३७॥
सांगु कां तुम्हां खरेंच
व्हा तुम्हीहि **एकटेच**
सर्व ऐथल्या तिथेंच--
टाकुनी पळा त्वरेंच ॥३८॥
कांहिं ना कमी पडेच
या बरे गडे ! खरेंच
स्वर्ग हा अहा ! तदाच-
स्वर्ग कीं गमेल साच ॥३९॥
येथिंचें प्रवासवर्म:—
धर्म, कर्म वा अधर्म
पाप, पुण्यही त्यजून
येति जीव कीं तिथून— ॥४०॥
ज्ञान बांधुनी उरास
कर्म दोन्हि कंधरास

क्षमातळींच न्यावयास—
लागलो जिवां त्रयास—॥४१॥
त्याग मार्ग लाक्षणीक
तोहि यंत्र वा प्रतीक
त्याग हाच दिव्यमंत्र
सर्वतंत्र ज्या स्वतंत्र ॥४२॥
ऐकिलें तुम्हांकडूनि
तेच शब्द कीं फिरूनि—
ऐकवी तुम्हांस ? काय—
चोडि सांगते उपाय ?'॥४३॥
स्रोततेज वाढवीत,
उच्चहास्य कीं करीत
जाऊं लागली नभांत
तो ध्वनीहि दूर जात ॥४४॥
"थांब थांब कीं क्षणैक"
ओरडोनि एक एक--
हालवीत पाउलांस--
लागलों पळावयास ॥४५॥
तोंच तो तिचाच दूत--
स्टेशना दणावीत
कीं मलाच न्यावयास--
येतसे गमे मनास ॥४६॥
कर्कशध्वनी पलैक
त्यास मी गणोनि हांक
दोन्हि नेत्र लाल गुंज
मध्यभागिं तेजपुंज ॥४७॥
तो गमे त्रितीयनेत्र
स्थाणुसाम्य उंच वेत्र--
घेउनी धडाधडाच
येउं लागला खराच ॥४८
उंच कीं करोनि मान
अग्नि, धूम काढून
रक्ततारकांसमान--
लोट सोडितो मधून ॥४९॥
येतसे जणू कृशान
गर्जना करी भयाण
आपटी पदां दणाण
वांट वाजवी दणाण ॥५०॥
कॅप फेकिलें अधींच
कोट, शर्ट लागलींच—
होजटॉय सोडवीत
धांवलागलों, तशांत ॥५१॥
रिस्टवॉच लागतांच
हात झाडुनी लगेच
जानवेंहि त्या सवेंच—
दे झुगारुनी त्वरेंच ॥५२॥
रिंग अंगुलीमधून--
काढिली त्वरेंकरून
फेंकुनी दिलेंच सर्व
साधिलेंच त्याग पर्व ॥५३॥
'ये गड्या ! गड्या ! असाच
तोच मी बरें खराच

हा उभा असे इथेंच
नेइ बा ! मला त्वरेंच ॥५४॥
घालवूं नकोच वेळ
जेथ मत्प्रिया असेल
ने असाच **एकटाच**
हा पहा तसाच साच' ॥५५॥
हांक देउनी तयास
तत्पदीं नमावयास
मार्ग लक्षुनी तिथेंच
टाकिली उडी लगेच ॥५६॥
धांवतां मिटोनि नेत्र
तोंच जाहलें विचित्र:--
दूत एक ध्यात चित्त
दोन कीं परंतु येत ॥५७॥
कृष्णकोट पटलून
बूट पायिं तेहि कृष्ण
दंड सारखेच दोन
धांवले मला बघून ॥५८॥
दों करेंच दंड दोन
ठेविले मला धरून
आत्मघातकी म्हणून
बांधिले तदा कसून ॥५९॥
आपुली बढाइ पूर्ण
गर्व, दंभ दाववून--
सांगती जनां हसून:--
राक्षिले अम्हींच प्राण ॥६०॥
हा स्वयें मरावयास
जातसे, अम्हीं तयास
तोंच रूळसन्निधांनि
थोपवीत दंडुकांनिं" ॥६१॥
कायद्यान्वयें श्रमून
घेतलेहि सोडवून
दोषमुक्तताहि पूर्ण
लाभली तरी अजून--॥६२॥
तेंच दृश्य आठवून
पाहतों उगा बसून
**आत्मबोधहीन** तेच--
**आत्मघातकी** खरेंच ॥६३॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार का. शु. ६ शके १८५१ ]

---

क. क्र. ३० "**खूणगांठ**"

२८ वें वृत्त—**समानिका** ( आठअक्षरी. र ज ग ल) ऽ।ऽ।ऽ।ऽ।

ईश देत ज्या वयास
काय घालवावयास ?
योग्य कीं जगावयास
ईशनाम गावयास !॥ १॥

ज्ञानयोग साधण्यास
कर्म सांग व्हावयास,
धर्म चालवावयास
लौकिकीं लवावयास ॥२॥
मृत्युशीहि झुंजण्यास
जन्म मृत्यु टाळण्यास
कीर्तिनें जगावयास
स्वर्ग भू करावयास ! ॥३॥
घालि दुःख-अंजनास—
सौख्य द्यावयां जनास
ज्यां अखंड ईशध्यास—
होइ मुक्त तोच दास ॥४॥
राम नाहिं ज्या सुखांत,
नाम नाहिं ज्या मुखांत
राम, लाभ नाहिं ज्यांत
काय कात त्या सुखांत ? ॥५॥
सत्य तेधवां जगाल
रामनाम नित्य गाल
काल धांवल्यां कराल
काय तेधवां कराल ! ॥६॥
कर्म सांडि जो सकाम
आवरे जयास काम—
आवडे तयास राम
तोच होय पूर्णकाम ॥७॥
**राम, कृष्ण वासुदेव**
शारदादि सर्वदेव
सार्वकाल येव मेव—
हांच टोवि देव घेव ॥८॥
ध्यान—ध्येय एकभाव
घालि जें दुजास घाव
ठेविल्या अशीच धांव
पूर्ण होइ सिद्धिहांव ॥९॥
चित्ति प्रेम, भक्ति, भाव
की मुखांत ईशनांव
काष्ठरूपदेहनाव
तारितेच वेत धांव ॥१०॥
रामनामिं लावि ध्यास
चित्त जाहल्यां उदास
तोच पावतो पदास
पावतोच शाश्वतास ॥११॥
**ब्रम्ह** एक तें अनाम
तेंच रूप **शंभु, राम**
नाममात्र कीं अनेक
हेच होति एकमेक ॥१२॥
**शंभु राम**नाम घेत
केविं तोच होय शाक्त ?
पूर्णशैव एक **राम**
पावतो तिथें विराम ॥१३॥
**शंकरास राम** ध्याते
तोच शिष्य आणि भक्त
ज्ञानरूपिं एकभाव
शिष्यदेशिकां अभाव ॥१४॥

दाखवी जगादिभास
वृत्ति एक त्या मुळास
लोपुनी स्वयें परास
हेम दावि खापरास ॥१५॥
सत्य एक जें अनाम
भास देख रूप, नाम
वृत्तिकार्य-दृश्य पाहि
जाणिवेंत दोन्हि नाहिं ॥१६॥
नित्य नूतनास्थितींत
वृत्ति दृश्य दाखवीत
नाहिं तें स्वयेंच वीत
भ्रांति पाडिते मतीत ॥१७॥
इंद्रियें थकोनि जेथ—
झोंपती मनासहीत
साक्षिरूप जी तुरीय
राहुंद्या तिथेंच ध्येय ॥१८॥
वृत्तिही न जेथ जागि
जें वसेल त्याच जागिं
त्याचि तीच खूणगांठ
बांधिल्या पडेल गांठ ॥१९॥
ध्याति योगि ही तुरीय
जी नव्हे कधींहि स्वीय
तर्क्य ती जरी खरीहि
गात जीस वैखरीहि ॥२०॥
साक्षिणी जरी खरीच
ओढिते तरीहि रीच
नाहिं जेथ कीं ध्वनीच
खूणगांठ तीच! तीच! ॥२१॥
ब्रम्ह मुख्य या जगास
तेंच होइ द्वैतभास
दावि रूप आपुलेंच
लोपवी तरीहि तेंच ॥२२॥
अद्वितीय तेंच खास—
एक तेंहि व्हावयास—
येत नाहिं कीं जयास
जें न ये वदावयास ॥२३॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार का. शु. ८ शके १८५०

---

## क. क्र. ३१ "चारुहासिनी"

२९ वें वृत्त—**चारुहासिनी** ( नउअक्षरी. ज त र ) ।ऽ।ऽऽ।ऽ।ऽ

कुणी नभीं **चारुहासिनी**[1]
वसे सुराची सुवासिनी
सुकन्यका पृथ्विची असे
म्हणोनि ज्योत्स्ना इथें हंसे ॥१॥

---

१ सुंदर.

सहर्षिता होय [1]भामिनी
तिथोनि माहेर पाहुनी
प्रमोद तो नावरे तिला
समुत्सुकें झुकि भूतला ॥२॥
जसें दिसे पाहतां मही
तसेंच उंचोनि शेषही
बघोनियां आठवे मनीं
जणूं गमे **नागपंचमी** ॥३॥
वरूनि नागास पूजिते
म्हणोनि कां दुग्ध ओतिते !
धरेवरी सांपडे, परी
तशाच लाह्या **नभांतरीं** ! ॥४॥
[2]सुधापगा वाहते तिथें
मृतास कीं जीववी इथें
कुणीं म्हणे दिव्यचांदणी
नभोदिता **चारुहासिनी** ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार चै.व. ५ शके १८५१ ]

---

## क. क्र. ३२ "वाणी"

३० वें वृत्त--बृहती—
३१ वें ,, भुजंग शिशुभृता (नऊअक्षरी) ७+२ = ९ न न म।।।।।।S–SS

मधुरतर अशी **वाणी**
[3]भुवन–नगरिची राणी
जरि आजि विचरे शोकीं
अमृत विसरवि लोकीं ॥१॥
त्यजुनि रणमदा [4]पूता
कवनिं वसलि ही आतां
नच रिपुवरती क्षोभे
आजि कविसदनीं **शोभे** ॥२॥
स्तुतिस करि तमोमग्ना
रणरव विसरे मग्ना
श्रवत अशि तशी वार्ता
अवनिवरि जगे आर्ता ॥३॥
प्रखरतरपणा लोपे
गमत हलविण्यां सोपें
मधु आजि म्हणवी **वीणा**
नच वदवत ती दैना ॥४॥
अहित निपटतां कालें
तंव विविधरसीं चाले
स्थिति बदलवुनी ऐशी
प्रभुवर! कधिं ती देशीं ? ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार चै. शु. ९ शके १८५१ ]

---

१ बायको. २ अमृताची नदी. ३ स्वर्ग, आकाश. ४ पवित्र.

## क. क्र ३३ "भुजंगसंगता"

३२ वें वृत्त—भुजंगसंगता(नऊअक्षरी.३+६=९,स ज र )॥S-ISISIS

बघतां **भुजंग संगता**[१]
पुरते भुई न धांवतां
स्थिरता पळैक भंगतां
घडते अशी विसंगता ॥१॥

न बघे तरी भितो न तो
अहि जो तिथेंच राहतो—
फिरतो तरी न भंगते
चुकुनी न वृत्ति शंकते ॥२॥

मग या दशेंत वाटतें
कळणें सदोष होय तें
परि हें न शास्त्रसंमतें
सुख तें खऱ्यांत राहतें ॥३॥

कधिं या अगा स्थितिमुळें
जरि कां असह्यही कळे
न डरे भयासवे अहि[२]
विसरे भयस्थलासही ॥४॥

न भितो कधीं कुणी कुणां
भिववी सदैव कल्पना
सुखतो तरी स्वतःच तो
इतरांमुळें न हर्षतो ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार चै. शु.१० शके १८५१ ]

---

## क. क्र. ३४ "रसिक"

३३ वें वृत्त—मणिबंध—
३४ वें „ मणिमध्य
(नऊअक्षरी. भ म स) S॥SSS॥S

जी मति काव्योच्छ्वासवती
चिज्जगतीं अव्याहत ती—
चालत आकाशीं वितरे
काव्यसमुद्रीं तेंविं तरे ॥१॥

पर्ण सुमाभावें नच ती—
कुंजलता रम्या दिसती
त्याविण तेजोहीन जशी
ही **रसिका**वांचोनि तशी ॥२॥

होइल काव्योद्भव कविनें
वर्धनहेण्यां ती सुमनें
जे खुडिती प्रेमें कलिका
तद्यश पूर्णत्वें **रसिका** ॥३॥

---

१ समोर आलेला. २ सर्प.

सौरभशाली तीं सुमनें
सार्थकि लाभायां सुमनें--
अर्पण ईशातें करिती
सद्रसिकांची ती महती ॥४॥

कीं कवितेच्या सिंधुजलीं
राहति होउनि मीन तळीं
नाचति तेथें ज्या लहरी
ते जल प्यायां येति वरी ॥६॥

वाचक-नक्षत्रें वसतीं
सार्थक चंद्राचें करिती
तो रसिकांच्या रूपिं वसे
ना तरि व्योमीं काय असे? ॥५॥

सप्रभ नक्षत्रें प्रमुदा,
अर्णवसीमांतावसुधा--
साधुबलें शोभे ऊशि ती
सद्रसिकांची ही महती ! ॥७॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार मार्ग. शु. १० शके. १८५० ]

---

## क. क्र. ३९ "प्रबोधन"

३३ वें वृत्त—मणिबंध
३४ वें ,, मणिमध्य (नऊअक्षरी. भ म स) SIISSSIIS

ऊठ ! अतां नाहींच निशी
लोळशिं कां दुर्दैवकुशीं !
भास्करशोभा घालविशी !
झोंप तरी येतेच कशी ? ॥१॥

अद्भुयशोभा व्योमिं खुले
ती उगि कां आलस्यबलें--
झोंप नसोनी घालविशीं?
ऊठ ! अतां नाहींच निशी ॥२॥

भाग्य न नक्षत्रांहि मिळे
तें तवभालीं जें लिहिलें--
लोळुनियां कां घालविशीं?

ऊठ ! अतां नाहींच निशी ॥३॥

भास्कर भाग्याचा स्वाशिरीं--
हा तळपे-नाहींच दुरी
स्वर्णसुसंधी घालविशीं !
ऊठ ! अतां नाहींच निशी ॥४॥

कर्तबगारी कांहितरी
या समयीं ती खर्च करीं
प्राप्त असोनी घालविशीं !
ऊठ अतां नाहींच निशी ॥५॥

न्याय न कीं नीतीहि मळे
"शक्त तयां सारेंच मिळे--"

हीं म्हण सुद्रां घालविशीं !
ऊठ ! अतां नाहींच निशी ॥८॥
ऊठ ! अतां नाहींच निशी ॥६॥
गेलि जशी संपत्ति, तशी
संपलि सारी सुप्तिनिशी
शांति सुखाचें स्वप्न सरें
दावि अतां कर्तव्य खरें ॥७॥
शौर्यबलाचा दिव्य मणी
तो मिळवी तैसा फिरुनी—
ज्या निजहस्तें घालविशी !
गेलिच दारें आणि घरें
अल्पहि कीं संपत्ति नुरे
एक उरे छातीच बरें !
मोज अतां त्यांतील घरे ! ॥९॥
नाहिं बरें ! ही झोंप बरी
प्राप्त करी तें—त्याच करीं—
जें कार्धिकाळीं घालविशीं !
ऊठ अतां नाहींच निशी ॥१०॥

शालबिंडा हैद्राबाद द.
शनिवार मार्ग. शु.१० शके १३५० ]

---

## क. क्र. ३६ "वृत्ति"

३३ वें वृत्त—मणिबंध
३४ वें ,, मणिमध्य ( नऊअक्षरी भ म स ) SIIS–SSIIS

या असत्या संसारिं जिणें ?
काळिज फाटे काळजिनें !
कालवशें झालेंहि जुनें
व्यर्थ जिणें केलेंच जिनें ॥१॥
छिद्र शताधिक्यें गळलें
एक तरी तें हें असलें:—
सौख्यकणें अंशींहि नुरें
तेंच पुन्हां तैसेंच उरें ॥२॥
यत्नबलें जें काय मिळे
साठविता सारेंच गळे
शाश्वत आनंदास कधीं
पावुं शके वृत्ती नच धी ॥३॥
दुर्बल वृत्याधिक्य दुरी—
एक घडीही होय जरी
क्षुद्र सुखाची हौस खरी,
पूर्ण फिटे होतां न पुरी ॥४॥
साध्य न होतां त्याच सुखां—
कष्टत साधायास फुका
वृत्ति सदा ती कामरता—
ठेउनि यत्नीं कां मरतां ? ॥५॥

कलबुर्गी ते माणीकनगर ( मोटारींत )
मंगळवार मार्ग. शु. १३ शके. १८५० ]

---

## क. क्र. ३७ "स्वार्थाचा तवा"

३५ वें वृत्त—विश्लोक ( नऊअक्षरी. त र म ) SSISISSSS

हें पारतंत्र्य गाठीं ज्याला
कीं तात लावितें कंठाला
घालीत शृंखला पायाला
बांधीत काढणी दंडाला ॥१॥
कोणींहि कां न येवो, येथें
येतांच आधिं थोडीं होतें—
जी झाडलोट कोठें कोठें
वाटेच काळजीचे मोठे ॥२॥
आले न तोंच धोंडे तीन—
मांडोनि जाळही लावून
तावोनि आमुच्या नांवानें
पाणींहि जाळिती हर्षानें ॥३॥
अंगारधानिकाही[1] कोणीं
कीं पेटवूनि ठेवी दोन्हीं
त्याच्यावरी **तवा स्वार्थाचा**
ठेवोनि सांगती न्यायाचा ॥४॥

साधू परी हळूं न्याह्याळी
भाजोनि घेत राही पोळी
या पारतंत्र्यजाळेखालीं
निःसत्व तप्तभूमी झाली ॥५॥
ऐश्वर्य काय-येतें, जातें !
जें आज वाटतें उद्यां तें—
स्वप्नांत पाहिल्याचें होतें
जेते[2], जितादिकाचें[3] नातें ॥६॥
सौख्यांत साधण्यां नाविन्यां
त्यागावयां मनोमालिन्या
अन्याय, दोष, वा पापातें
अश्रूंच शक्त कीं धूण्यातें ! ॥७॥
ते वाहतीच अस्मन्नेत्रीं
नाहींच खंड घस्रीं[4], रात्रीं
अंगांतही तसें खेळोनी
देईल श्री प्रभू सावोनी ॥८॥

घालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार चैत्र व. १४ शके १८५१ ]

---

## क. क्र. ३८ "हलमुखी"[5]

३६ वें वृत्त हलमुखी (नऊअक्षरी. र न स ) SIS॥॥S

जो विचारि नर असतो
सद्गुणांस आधिं बघतो

लाभली जरि हलमुखी
राहि त्या वधुसह सुखी ॥१॥

---

१ शेगडी. २ जिंकणारे. ३ जिंकलेले. ४ दिवसां. ५ नांगराप्रमाणें जिचें मुख.

रूप सुंदर चिर नसे
सद्गुणींच अमृत वसें
बाह्य दृश्य मधु दिसतें
तें क्वचित्स्थळीं फसवितें ॥२॥
रूपहीन सहज सती
लज्जिताच विनयवती
सद्गुणें पति सुखवितें
वक्र इक्षु मधुतर तें ॥३॥

सत्य तें सतत टिकतें
प्राक्दशेंत कटु गमतें–
अल्पमात्र जरि पटतें
वाढतें वटसदृश तें ॥४॥
रूप काय नयनिं दिसे
त्या अभाविं वहत असे–
प्रेम-निर्झर सुरभिसे
सर्व कांहिं पुरवितसे ॥५॥

मु. फायनान्स, हैद्राबाद द.
रविवार का. शु. ८ शके १८५१ ]

---

## क. क्र. ३९ "आनंद"

३७ वें वृत्त—**उपस्थिता** ( दहाअक्षरी. त ज ज ग ) SSIISIISIS

सौख्यीं उपजे नव आपदा
दुःखांतुनि सौख्य मिळें सदा
चित्तीं पटतें अनुभाविता
द्वंद्वस्थिति कीं **तदुपस्थिता** ॥१॥
सौख्यांतिल भोग सरे सदा
लाभे दुसरी स्थिति दुःखदा
जी कां निज शांति ढळूं न दे
राहे उभयांतहि तो मुदें ॥२॥
ज्ञानीहि फलोन्मुख भोगिती
देहास तरूसम जाणती

छायेसम दुःख सुखादिकें–
स्थैर्यांतुनि पाहति कौतुकें ॥३॥
कोठेंहि शमे न कधीं दमे
लाभे पहिली दुसरी निमे
मध्यास्थिति त्यांतिल जाणतो
तो दिव्यसुखांतचि राहतो ॥४॥
जो अल्प न दुःखपथीं दमे
सौख्यस्थितिमाजिहि ना रमे
**आनंद** तदाच लभे तया
तो शाश्वत–नाश नसे जया ॥५॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार का. शु. १२ शके १८५१ ]

---

१ त्याच्याबरोबर प्राप्त झालेली.

## क. क्र ४० "धावना"

३८ वें वृत्त—कामदा ( ५+५=१०, र य ज ग ) SISIS–SISIS

हृत्स्मशानिं ही पेटली चिता
प्रीतिप्रेत हें ठेविलें अतां
लोभ, मोहही जाळिला इथें
ये अतांतरी बा! जगत्पते ! ॥ १ ॥
जाळिले शिवें मीनकेतना
तेथ स्थापिलें मी निकेतना
जी अहा ! इथें शांति लाभली
आलि वाटतें संधि ही भली॥ २ ॥
आर्द्रचित्त हें टाळि आसवें
हुंदका करी साथ त्यासवें
रुद्ध कंठ हा वाव देईना
कातरस्वरें होइ **धावना** ॥ ३ ॥
शांतिवास जो स्पष्ट त्यामुळें—
शुष्कपर्णही वाजतां कळे
संथ सारखा वायु वाहतो
कां न ऐकशी-कोण वाहतो !॥ ४ ॥
जाळिल्या पहा सर्व वासना
कां तिथें तुझा होइ वास ना
ऐकशीं उगा आर्त **धावना**
केंवि बैसवे? धांव! धांव ना! ॥ ५ ॥
तूं न इच्छिशीं धांवण्यां जरी
अश्रुपूर हा आटवीं तरी
होइ—नातरी—दग्धभूमिका—
अंकुरांकितापुष्पवाटिका ॥ ६ ॥
नाचतीं भुतें आज जीं इथें
अल्पकालही लोटल्यां तिथें—
रम्य निष्कुटें फुल्ल होतिल
त्वन्निसर्गही धर्म सोडिल ॥ ७ ॥
ऐकतां झणीं दीन **धावना**
धावलासही बा ! दयाघना !
विश्व साक्षही देतसे मनां
कां न धांवशी ?धांव!धांवना!॥ ८ ॥
हृच्चितेंतली किंचितप्रभा
दाखवीतसे वृक्ष जो उभा
धूम्र लागतां अर्ध दग्धते
पार्श्वि कीं फुले पुष्प एक तें ॥ ९ ॥
तेवि आस जी राहिली तुझी
सांगते जणूं—"तीहि कीं त्यजी
सर्व जाळिले सत्य ना मुळीं
वृक्ष पेटले राहिली मुळीं ॥ १० ॥
लीन जाहल्यां-पूर्ण तत्पदीं
वासनांशही राहिना कधीं,
होतसे स्वयें तोच भावना
तन्मुखीं कशी येइ **धावना** ? ११

[ शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार मार्ग. व. १० शके १८५० ]

## क. क्र. ४१ "मी नसतांना"

३९ वें वृत्त—चंपकमालः—
४७ वें „ रुक्मवती (दहा अक्षरी. भ म स ग ५+५=१०) S||SS-S||SS

**मी नसतांना** एक तरीही
नाच दुजें तें राहिल काहीं
मीच तरीही हें जग पाहे
राहिन, होतो, नित्यचि आहे ॥१॥

विश्व बघायां मी यदि देहीं—
राहिन तेव्हां सर्व दिसेही
तो तसला मी नाहिंच देही
एकचि जो मी तोच कुठेंही ॥२॥

**मी नसतानां** विश्वहि नाहीं
एक असोनी अनेक पाही
कां विसरावें व्यापकभावां
क्षुद्रपणा कां ओढुनि घ्यावा ? ॥३॥

मी जगबंधू नित्य असोनी
येइल कैसें दैन्य कुठोनी
**मी नसतानां** शक्ति मदीया—
राहिल कोठ केंवि जगीं या ? ॥४॥

सौख्य मिळायां कष्ट करावें
ज्ञान असोनी कर्म घडावें
खेळ जगाचा—आपपरावा
मौज म्हणोनी मानुनि घ्यावा ॥५॥

मु. मुंबई
गुरुवार ज्ये. व. ४ शके १८५३ ]

---

## क. क्र. ४२ "त्वरितगति"

४० वें वृत्त—त्वरितगति ५+५=१० (न ज न ग) ||||S—||||S

कितितरि ही त्वरितगति[1]
चटचट कीं दिन पळती
करिति कुणी नच गणती
भ्रमत कशी मनुजमति ॥१॥

मरुनि न कीं कुणि उरती
कृति तसली नच करिती
करुं म्हणती परि मरती
वय झरते **त्वरितगति** ॥२॥

किति असले नित बघती
कृतिहि नसो धरुनि नति[2]—
डगिहि जगीं न विचरती
धरिति सदा **त्वरित गति** ॥३॥

क्षणि सतरा मति वरिती
सरळपथा नच धरिती

---

१ शीघ्रगति. २ नम्रता.

सुमतिस कीं न चिकटती
त्यजिति न ती त्वरितगति[1] ॥४॥
असुख सदा अनुभविती
तरि विषयीं धडपडती
रडताचि कीं नित रमती
हृदिं धरिती त्वरितगति ॥५॥
कधिं अपुली असाकि कृति
विरमतिही बघुनि अती
हळु हळु ती त्यजुं म्हणती
विसरति ते त्वरित गति ॥६॥
फिरुनि पुढें झणिं सरती
क्षणहि न ती अचलधृती[2]—
मनिं वसते, नच कशि ती
नवल गमे त्वरितगति ॥७॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार चै.शु. ४ शके १८५१ ]

---

क. क्र. ४३ "नामपणव[3]"

४१ वें वृत्त—पणव ( दहाअक्षरी. म न य ल) SSSIIIISSI

वाजे नामपणव तूझेंच
कानीं तो स्वर पडतो उच्च
तीन्हीं लोकिं विदित ते सत्य
घेती, ऐकोनि जनता नित्य ॥१॥
जाणे कोणिहि तव नांवास
त्वत्स्थानास बघति ना वास
नाहीं काहिं जगिं तुझ्यावीण
होतो'पाहिन'म्हणतां शीण ॥२॥
ज्या न्यायें जगाविशीं रावास
रंकाते चढविशीं नांवास
वाढावा निजपदिं विश्वास
प्रेमें राखिशि नित विश्वास ॥३॥
ध्यातो जो तुज निज चित्तांत
साधे त्यास सतत एकांत
तो अत्यंतिक सुख भोगीत—
राही गातचि तव सद्गीत ॥४॥
ध्याता, ध्यान विसरुनी ध्येय
होतो तत्क्षणिं मग तो ज्ञेय
त्वद्रूपीं विचरत विश्रांत
देहीं राहुनि नच लोकांत ॥५॥

---

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार चै.व. ५ शके १८५१ ]

---

१ शीघ्रगति. २ न ढळणारें धैर्य. ३ ढोल पडघम.

## क. क्र. ४४ "आकाशाची भरारी"

**४२ वें वृत्त—मत्ता ( ४+६ = १० म भ स ग )SSSS–IIIISS**

संसाराच्या विकलित जीवां—
संपूर्णांशें मिळत विसावा—
नी कां आहे जगिं लव जागा
ती शोधायां अविरत जागा! ॥१॥
न्यायान्यायां विसरुनि सारे
कीं युद्धाशीं नवदलभारें,
गंधाभावीं जणुं नच वारे
दुःखें येतीं सहपरिवारें ॥२॥
पाठोंपाठीं जळजळणारे
चित्तक्षेत्रांवरति निखारे-
ठेवोनीयां शमति मनीं ती
ही त्यांची कीं सरळचि रीती
वक्तृत्वाचें अभिनव वारें—
जेव्हां येतें-आम्हिं तुम्हिं सारे--
चित्तक्षोभें म्हणतहि भावें:--
'शोकज्वाला विझवित जावे' ॥४॥
'सत्कार्याला सतत झटावें
तें साधायां कलह मिटावे'
गर्जे जें कां पडत न कांहीं
ऐशी आहे जगिं नवलाई ॥५॥
**नीलाकाशीं चकचकणारे--**
**रात्रीं नेत्रां किततरि तारे**
**आम्हां तुम्हां दिसतिं,परां ती--**
**विश्वीं आहे विपरित रीती!॥६॥**
**तत्तेजानें अम्हिंच रमावे ?**
**त्यानांही कां नच रमवावे ?**
**विश्वोद्यानीं अम्हिंहि फुलावे**
**सौगंधानें नभिं विचरावे ! ॥७॥**
आम्हांसाठीं लकलकणारे—
व्योमप्रांतीं अगणित तारे
तैसे विश्वीं आम्हिं तुम्हिं सारे
सौख्याभावीं तळमळणारे ! ॥८॥
जे दीनांचे वच हृदिं नाचे
त्या योगानें द्रवुनि जनाचे—
झालें नाहीं—मन दगडाचें
तें मेणाचें कधिंहि कुणांचें ॥९॥
ना ये चित्तीं कृति करण्याचें
तत्कष्टातें लव हरण्याचें
कांहीं केल्यां कधिं तरि—वाचें—
होते तेही हळहळण्याचें ॥१०॥
धर्मासाठीं तरि मरण्याचें
कोण्याभालीं विधि लिहिल्याचें—
यावें ऐसे दिसुनिच थोडें
झालें आहे म्हणुनिच कोडें ॥११॥
देशासाठीं जगिं जगण्याचें
कारुण्यानें थबथबण्याचें,

इच्छा झाली तरिहि क्षणाची
आहे ऐशी स्थिति सुजनांची॥ १२॥
द्रव्यासाठीं धडपडणारे,
लोभाविष्टें चडफडणारे,
थोड्यानेंही सुख गणणारे
त्याच्याभावीं झणिं मरणारे ॥ १३॥
त्या उंचीची तमलि **भरारी**
अल्पांशानें-जरि, नच सारी
या असल्यांना शुंक[1] शिकवीती
घेतां यात्री तरिहि कशी ती? ॥ १४॥
ही कीर्तीची अनुपम जादू
शाश्वत्सौख्यां मिळवति साधू
**आकाशाची असलि भरारी**
सोसे त्यांना म्हणुं 'अवतारी'! ॥ १५॥

श्री माणीकनगर कलबुर्गा ते शहाबाद (मोटारींत व रेल्वेंत) मार्ग. कृ. ६ शके. १८५० मंगळवार ]

---

## क. क्र. ४९ "मनोरमा"

४३ वें वृत्त—**मनोरमा** ( दहाअक्षरी. न र ज ग ) IIISISISIS

मिळवि मानवा! **मनोरमा**
अशि मतीच उत्तमोत्तमा
भजन, पूजनें प्रभुपदीं—
बर्पवि-जीस मृत्यु ना कधीं॥ १॥
त्यजुनि दृश्य या जडा, तमा
वधाशिं त्याच उत्तमोत्तमा
द्युतिमय स्थितींत राहशी
प्रभुच नित्य एक पाहशीं ॥२॥
रमाशिं काय पाहुनी जगीं
श्रमाशिं येथ तेथ कीं उगी
कधिं दिसे न वस्तु उत्तमा
चिर अशी जशी **मनोरमा** ॥ ३ ॥
गणशि काय जी **मनोरमा**[2]
तिजाशिं **उर्वशी, तिलोत्तमा**
असुख आदि अंतिं पाहतां
लभत नाहिं कांहिंही हतां ॥४॥
अतिव चंचला पटेल मा
तशिच सुंदरा **मनोरमा**
मनुज सौख्य जाणुनी रमे
न विरमे[3], शमे, जरी दमे ॥५॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द. सोमवार का. व. २ शके १८५१ ]

---

१ पोपट. २ मोहक. ३ लाजतो.

## क. क्र. ४६ "मयूरसारिणी"

४४ वें वृत्त—मयूरसारिणी ( दहाअक्षरी. र ज र ग ) SISISISI S

वार्णतीच हंसगामिनींते
चालतां अतीव हर्पती ते
होइ जी मयूरसारिणी ती
जाणते तरी नयादि रीती ॥१॥

हंसचालि चालतां पदाते
जाणि चित्ति धन्य आपणाते
जे दिसे स्वदोप कीं स्वतःला
भाग्य तें मयूरसारिणीला ॥२॥

इंद्रियांत यत्न काय व्हावे
ईश्वरें दिले तसें असावें
हें जयां कळेल, उत्तम नें—
गर्व ठेवणें कधींच नेणें ॥३॥

गर्विता दिसेच रूपयुक्ता
खिन्नताहि येत नाश होतां
श्रेष्ठ तीच जी जडूं न देई
जाणल्याक्षणीं लयास नेई ॥४॥

त्याज्य जाणतांच यत्न होई
स्वीय दोप वाल्वू शकेही
न्याय, दोप, पुण्य, पाप, नीती
जाणते मयूरसारिणी ती ॥५॥

व्याल दुष्ट वैपयीक जो तो—
सावलीसही जिच्या न येतो
पाप दूर पाहतांच पळे, तें
भाग्य कीं मयूरसारिणीते ॥६॥

मु. फायनान्स, हैद्राबाद द.
बुधवार का. शु. ११ शके १८५१

---

## क. क्र. ४७ "ठेवा"

४५ वें वृत्त—मात्रासमकं (५+५ = १० त ज य ग ) SSIIS-IISSS

ब्रह्मांडपते ! जगदाधारा !
अव्याकृत तूं अपरंपारा
मायावरका विविधाकारा !
आसेचनका प्रभु माहेरा ! ॥१॥

व्यापोनि उरे जरि आकाशा
ती त्वच्चरणीं जगते आशा
आणीं न मनीं अमराधीशा
केव्हांहि नव्या धरिते वेशा ॥२॥

---

१ मयूर गामिनी. २ सर्प. ३ अतिसुंदर.

ना तृप्ति शिवे चुकुनी तीतें
न्यायास बघे नच नीतीते
इच्छी जरि ती जगतीं सारे
ते दावीशिं त्वच्चरणीं सारें ॥३॥
कामादिक ते रिपु, माराया-
रात्रंदिन ते टपती वाया
तूं सिद्ध असा मज ताराया
स्वर्ग कां न म्हणूं तनुकारा या ४
पाहों न कधीं तवनादें हा
दूजें स्थलही, तंव ना देहा-
नांवाविण या जगिं जें कांहीं
त्वव्यापृत तें नच कांहींही ॥५॥
कां बा ! बघशीं जगदाद्या ! या-
दीनास तुझ्या मग ते द्याया
मागें व पुढें बघशीं, देवा !
कैवल्याचि कां? मम तो ठेवा ॥६॥

तें सुंदर कां इतुकें आहे ?
तल्लोभ तुझ्या हृदयीं राहे
द्यावे म्हणुनी नच कीं वाटे
ना ढुंकिनही मग त्या वाटें ॥७॥
तें त्वद्रहितें नलगे देवा !
देई अथवा नच ते दे वा-
लाभो न मुळीं मज तद्वार्ता
बा ! निववी या तुझिया आर्ता ८
इच्छा न कधीं मज अन्याची
माझी मजला मम हक्काची
लाभी प्रभु गा ! नित त्वत्सेवा
वाटोहि जरी जगतीं हेवा ॥९॥
प्राणांहुनि जें प्रिय मच्चित्तां
ना घेउंशके कुणि या वित्ता
होवोनि बसे जंव त्वद्याजी
नाहीं कमि त्या यशसाम्राज्यीं १०

शालिबंडा हैद्राबाद द.
वै. शु. ८ शके १८५१ गुरुवार ]

---

४६ वें वृत्त — रुक्मवती
३९ वें ,, चंपकमाला ] क. क्र. ४१ "**मी नसतांना**" पहा !

---

## क. क्र. ४८ "बुध्द"

४७ वें वृत्त —**वानवासिका** ( १० भ त र ग) SIISSISISS

खिन्न फिरे **वानवासिका** ही
विश्ववनीं पाहिनाच कांहीं
रम्य असें स्थान पाहुनियां
नाच रमे बुद्धि कां मदीया ॥१॥
ही कुणि शोकान्विता म्हणावी
केविं जगे नित्य त्याच विश्वीं
शोक न इच्छीं कुणीं कधींही
कां न दिसे हार्षताहि धी[1] ही ॥२॥
त्याज्य गणे जी प्रियाप्रियाला
मोद न होई उपेक्षकाला

नाश घडे कीं सुखां म्हणोनी
ना गणिं सादी[2] न सांत[3] दोन्हीं ३
एकचि विश्वीं अनादि ऐसा
जो जगदात्मा अनंत तैसा—
व्यापुनि विश्वां अखंड राहे
शोध कराया तयास पाहे ॥४॥
बौद्धिकयत्नें हताश होई
शक्य नसे ब्रह्म शोधणेंही
नित्य उदासीनतेंत राही
त्याचमुळें **वानवासिका**ही ॥५॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
शुक्रवार आश्वि. व.३० शके. १८५१]

---

## क. क्र. ४९ "शुद्धविराट"

४८ वें वृत्त—**शुद्धविराट** ( दहाअक्षरी. म स ज ग ) SSSIISISIS

डोळे जे जगतांत पाहती
वैचित्र्यांत भुलोनि हर्षती
हें सारे हरिरूप जाणलें
त्यानीं **शुद्ध विराट** पाहिलें ॥१॥
जोकां सुंदर सुंदरांतला
विश्वाच्या हृदयींच राहिला

सारे बाह्यचि व्यर्थ मानिलें
त्यानीं **शुद्धविराट** पाहिलें ॥२॥
डोळेही मिटतांच कीं जयां
दिव्यशीं दिसते प्रभा तयां
जगच्चाक्षुहि तेच जाहले
त्यानीं **शुद्धविराट** पाहिलें ॥३॥

---

१ बुद्धि. २ ज्याला आरंभ आहे. ३ ज्याला अंत आहे.

विश्वाच्या जनिताच जाणतो
सद्भक्तांसाचि रूप दाविता
ईशें प्रेमभरांत दाविलें
भक्तें शुद्ध **विराट** पाहिलें ॥४॥
महद्दिव्य जरी स्वरूप तें
भासत्वें ठरतें बुधांमतें
नेत्राचें बघणेंच लोपलें
तेव्हां **शुद्धविराट** जाणिलें ॥५॥
नाहीं सत्याचि नाम, रूप जें
अज्ञानी उभयांतही रिझे
सच्चित्सौख्यपदांत रंगले
त्यानीं शुद्धविराट जाणिले ॥६॥
गेले जे बघण्यास त्यापथें
तेथोनी फिरलेच नाहिं ते
सांगे जो "मज दिव्य लाभलें"
त्यानें काय **विराट** पाहिलें ॥७॥
स्वप्ननाश घडे तदाच ती
सांगे स्वानुभवात्मक स्मृती
सांगा ? तें कधिं कोंवि ? नासलें
ज्यानीं **शुद्धविराट** पाहिलें? ॥८॥
जेव्हां दर्शनभाव लोपला
ज्ञानाच्या मग दिव्यचक्षुला
भक्तांतें प्रभुनें यदा दिलें
**शुद्धींशुद्धविराट** वर्तलें ॥९॥
सर्वस्वीं वदणेंच लोपलें
स्वात्मानंदनिमग्न राहिले
ज्यानीं ज्याक्षणिं त्यास जाणलें
तेव्हां तेच **विराट** जाहले ॥१०॥

प्रभुदरबार शालिबंडा हैद्राबाद द.
सोमवार का. शु.९ शके १८५१ ]

---

**क. क्र. ५० "विश्वाधारा ! दिसशिं नच कां?"**

४९ वें* वृत्त—हंसी (१) ४+६ = १० म भ न ग SSSS-IIIIIS

सौगंधानें दरवळुनि हा—
गेला सारा परिसर अहा !
पुष्पवृक्षा बघत परि तें
दिङ्मूढत्वें तरि न दिसतें ॥१॥
तारा सान्या नभिं पसरल्या
तेजोधारा उधळुनि दिल्या
या कुंदाच्या किति तरि कळ्या
कोणासाठीं झणिं उमलल्या ? ॥२॥

---

*'हंसी' हें वृत्त दोन प्रकारचें आहे. 'हंसी १' हें दहाअक्षरी आणि 'हंसी २' हें बावीस अक्षरी आहे.

ज्या ईशाची अतुल महती
ज्याच्यासाठीं सकल झटती
जो सर्वांना सुखवित असे
कोणांलाही परि नच दिसे ॥३॥

बा ! विश्वात्मा ! तुज वदत मी
बोलूं कैसें-न दिससि तमीं
त्वत्तेजें हा रवि, शशि फिरे
विश्वाद्यंतीं द्युतिच विचरे ॥४॥

त्वद्रूपाचें अविरत पिसें
लागे चित्ता म्हणुनिच असें—
जन्मोजन्मीं हुडकित असे
तें नेत्रांतें अजुनि न दिसें ॥५॥

येथें तेथें सकल जगतीं
आहे तूझी सतत वसती—
योगी, ज्ञानी वदति तुजसीं
कां विश्वात्मा मज न दिसशीं?॥६॥

जें जें नेत्रां जगतिं दिसतें
नाहीं कांहीं त्वदितर तिथें
कांहीं मागे नच तरि फुका—
विश्वाधारा! दिससि नच कां? ७

ही जी ऊर्मी मथुनि उसळे
ती त्वच्छक्ती-सहजचि कळे
कां आद्यंतीं दडुनच वसशीं
या नेत्रांनां तरि न दिसशीं ? ८

संत्रस्तांनां हृदयिं धरिशीं
कारुण्यें कीं क्षणिं निववीशीं
विश्वव्यापी जनिं म्हणविशीं
कां नेत्रांनां तरि न दिसशीं ? ९

नेत्राश्रूंना पुसुनि सदया !
देशीं धैर्या विकलहृदया
शोकावेगीं मज सुखविशीं
कां नेत्रानां तरि न दिसशीं? १०

माझ्या चित्तीं सतत वसशीं ॥
गीतें गाशीं, कवन रचिशीं ॥
॥ ऐकावें त्वां वदुनि पुढती ॥
॥ सर्वाधीशा ! सहज तुज ती ॥११॥

कलबुर्गी ते माणिकनगर (मोटारींत) ]
मंगळवार मार्ग. शु. १३ शके १८५०

## क. क्र. ९१ "मौक्तिकमाला"

५० वें वृत्त-अनुकूला
५५ वें ,, कुड्मलदंती
६३ वें ,, मौक्तिकमाला ] अक्षराअक्षरी ५+६ = ११ SIISS-IIIISS
भ त न ग ग

मौक्तिकमाला जरि निज तेजें-
नेत्र जनांचे दिपवितसे-जें
लाजविनें तें निज विनयानें,
प्रेम-जलानें डबडबल्यानें ॥१॥

पाहिलिं रत्नें जरि कितिकांनीं
मोल तयांचें ठरवि न कोणी
रत्नचि नेत्रां परि दिपवोनी
ओळख देते पटवुनि पाणी ॥२॥

देउनि **पाणी** बनविति शस्त्रें
तीं रुधिरानें भिजविति वस्त्रें
पाजुनि **पाणी** पळविति लोकां
एकाचि **पाणी** पटवि अनेकां ॥३॥

**मौक्तिकमाले !** महति तुझी ती
नाहिंच कांहीं लव तव हातीं
दाउनि **पाणी** म्हणविशि मोती
तत्क्षणिं होशीं नच तरि माती ॥४॥

क्षुल्लक दोरी निज विनयानें-
आश्रय देई-तरिच तयानें-
किंमत तूझी ठरवित लोकीं
उत्सुकतेनें जनहि विलोकी ॥५॥

मंदसमीरें डुलत असा तो-
बिंदु दवाचा तुजसम होतो
पंकजअंकीं सहासित नाचे
चित्तहि जो कां हरित जनांचें ॥६॥

भाग्य असे हें जरिहि पळाचें
होतचि सोनें त्वरित तयाचें
मृत्यु जरी तो झडकरि नेतो
'मुक्तहि' तेव्हां सहजचि होतो! ॥७॥

जाउनि **पाणी** पतन तुझें तें-
'मुक्त' खरी तूं-असुनिहि होतें
बिंदु जलाचा तुज खिजवावा !
**मुक्त** म्हणोनी जगिं मिरवावा! ! ॥८॥

मुक्तपणाच्या त्यजुनि हटाला
होउनि **पाणी**, तरवि जगला !
**मुक्त** कराया मग जनतेला-
पावाशीं तेव्हां विपुलदशेला ॥९॥

कार्य नव्हें तें हळहळण्यांचें
दुःख कधींही हरत न वाचें
नाहिं कृती ती डळमळण्याची
कृत्रिमता कीं सदयपणाची ॥१०॥

**मुक्त** जरी तूं म्हणविशि लोकीं
लौकिक तैसा जरिहि असो कीं

अश्रुजलाची सर नच येते पाहुनि पाणी वसत तिथें तें
कां न म्हणावें? उघड दिसें तें! ११ चित्त कशाचें? द्रवत न ज्याचें!
दुःख न होतें काधिं भलत्यातें जें न हलें-तें हृदय कशाचें? १२

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार पौ.शु. ११ शके १८५० ]

---

## क. क्र. ५२ "अपरांतिका"

५१ वें वृत्त—अपरांतिका (अकराअक्षरी.र न र ल ग) SIS III SI SIS

बुद्धि काय अपरांतिका म्हणूं? जी दिसे विषमता तयांतली
कल्पनाच अति सुंदरा गणूं पोंचवील गमते रसातली ॥३॥
तोंच बंधु मन होउनी बसे एक खोल दुसरें उतावळ
चित्तविप्लवदशेंत ये हंसें ॥१॥ एक तापट दुजें अजागळ
ही अहंकृति सदा रुसे, फुगे कूर्मपृष्ठ हृदयां म्हणूं भली
ना पलेंक मनहीं वसें उगे काय पंचकाडि दिव्य लाभली! ॥४॥
भाउबंदकि अशीच गाजते ओंजळींतिल जलांत वादळ?
एक थोर म्हणताच माजते ॥२॥ माजवी त्रिभुवनीं धुमाकुळ
मौज कीं जन बघे जगांतली पाहुनी लव न हो निराकुळ
वाटते मजशीं ही घरांतली हेच मी परि असे हृदाकुल ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार फा.व. १४ शके १८५० ]

---

१ अधिक जवळची, दुसरी बहिण, २ भ्रम. ३ पाताळीं. ४ शांत.
५ आल्हादक प्रिय. ६ क्षुब्धांत:करणाचा.

### क. क्र. ९३ "गुर्जरप्रांत प्रवास"

५२ वें वृत्त—इंद्रवज्रा ( अकराअक्षरी त त ज ग ग ) SSI SSI ISI SS

चित्तीं वसे सुंदर कल्पना-ती
जेव्हां मनीं उत्सुकताहि होती
ऐकोनि जें वर्णन चित्त हर्षे
प्रत्यक्ष लाभें न परंतु तैसें ॥१॥
मोदें करी जें मन नर्तनाला
तैसें कधीं येइ न प्रत्ययाला
हर्षे अर्धी नंतर तें उदासी
सांगेल हें स्वानुभवी प्रवासी ॥२॥
जे जे बघावे म्हणुं जाय तों तों
पैसेंच सांडील जिथें तिथें तो
जे पावलों पावलीं कष्ट नाना
त्या एक जीवाविण सांगवेना ॥३॥
पाणी म्हणावे नयनांत राहे
नाडींत जे काय सदैव वाहे
बाहेरुनी संतत अग्नि वृष्टी
पाहूं न देई जलपूर्ण दृष्टी ॥४॥
जे रोमरोमांतुनि नीर वाहे
वाटे स्थिती ही नळराज पाहे
लाजोनि झाला जणुं कोरडा तो
तेव्हां कवी कोठुनि काव्य गातो! ५

मु. बडोदा
ज्ये. व. ५ शके १८५३ शुक्रवार

---

### क. क्र. ९४ "मध्यमंगल दर्शक"

५३ वें वृत्त—इंद्रवज्रा ( अकराअक्षरी. र य ज ग ) SISIS—SISIS

बा! स्फोरका! त्वत्पदिं भक्तिभावें
या **पाकळ्या** अर्पितसे स्वभावें
माझें मला तेंच कसें मिळावें—
जेव्हां तुझें पूर्ण तुला न पावें ॥१॥

मु. मैलारदेवपल्ली, हैद्राबाद द.
सोमवार मा. व.९ शके १८५०

## क. क्र. ५५ "उपेंद्रवज्रा"

५३ वें वृत्त—उपेंद्रवज्रा (अकरा अक्षरी. ज त ज ग ग) ।S।SS।।S।SS

जया करीं शक्ति अमोघ दाटे
'करीन तीं पूर्ण !' तयास वाटे
महत्त्व येथें नच इंद्रवज्रा[1]
भयें दडे या उपेंद्रवज्रा[2] ॥१॥

टिकेल केव्हांहि तरी खरी ती
खरी न तेथें विपरीतरीती ! ॥२॥
न सोडते सत्य कधींहि त्याला
तरी झटे तोच जगद्धिताला

घडे असाधारण कार्य जेव्हां
पटेल शक्तीहि जनांस तेव्हां
तयांत सामर्थ्य तसेंच येई
स्वशक्तिनें तो जगमान्य होई ॥३॥

प्रभुदरबार
अ. आ. व.९ गुरुवार १८५३ ]

---

## क. क्र. ५६ "एकरूप"

५४ वें वृत्त—एकरूप ( अकराअक्षरी.स स ज ग ग ) ।।S।।S।S।SS

जगतीं किति माजली अशांति !
किति मानिशि दैन्य, खेद, खांति !
मुळिं ना गणिं नाम, रूप सत्य !
वसतो प्रभु एकरूप नित्य ॥१॥

मधु दिव्यहि दर्शनीय तेंच
नच वृद्धि जया न नासतेच
म्हणवे न कधींहि उच्च, नीच
चिर सुंदर एकरूप तेच ॥२॥

नदि, निर्झर[3], पल्वलादि[4] नांव
सरिता[5], उदधि[6], तरंग भाव
जरि भिन्नरूप मूळ तोय
वरि खालति एकरूप होय ॥३॥

जग हें दिसतें विचित्र चित्र
गणिं फोलचि दृश्य तेंवि नेत्र

---

१ इंद्राच्या वज्रास २ प्रति इंद्राच्या वज्रभयें ३ पर्वतावरून वाहणारा ओढा. ४ डबकें. ५ नदी. ६ समुद्र.

मग तोच म्हणा निसर्गभूप
अनुभूति पटेल **एकरूप** ॥४॥
त्यजुनी फलभोग, मोह शोक
परमार्थ तदाच होइ चोख
फल नेणत घडल्यासहिं कर्म
कळते मग **एकरूप** मर्म ॥५॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द. ]
वैकुंठ १४ गुरुवार शके १८५१ ]

---

५५ वें वृत्त--कुड्मलदंती ] अकरा अक्षरी ५+६ = ११
५०वें,,अनुकूला ६३वें,, मौक्तिकमाला ] **मौक्तिकमाला** क.क्र.९२पहा।

## क. क्र. ९७ "कीर्ति"

५६ वें वृत्त—रथपक्ष ( अकरा अक्षरी. र ज न ग ग ) SISISIIISS

**कीर्ति**हाच आधिच मनुजाला
गुंतवावयां पसरित जाला
आंगठा जरी अडकत तींत
अंगुलासही मग अति भीत ॥१॥
कार्यशौर्य सत्वर हरवें तें
प्राप्त तेहि कीं विसरति वेत्ते
**कीर्ति**रोग लागत जंव पाठीं
लावि सद्गुणांवरि मग काठी ॥२॥
धैर्य दे अकार्यहि करण्याला
त्यामदें मुके मनुजपणाला
प्रस्तरास फोडुनि करि मूर्ती
त्याच त्या करीं करवित माती॥३॥
**कीर्ति** माळ घालित भलत्याला
नित्य जो मरे कृति करण्याला—
पाहिनाच ढुंकुनि असल्याला
जन्मलाच तो जणुं मरण्याला ॥४॥
ठेविते कुचंबुनि निज भक्तां
नेहमीं तमी अधिकृतसक्ता—
वाढवी तया कितितरि रीती
लागते जधीं लहर तिची ती ॥५॥
केधवां मृतासहि वरिते ती
जो मरेच भोगित अपकीर्ती
दुर्गुणांस झाकित मग त्याच्या
गातसे सवा करुनि अवाच्या ॥६॥
ज्यावरीं बसें मन मग काहीं—
योग्य वा अयोग्यहि नच पाही

---

१ पाषाणास.

पाहते कधीं नच वय तेही
जन्मपत्रिकेंतहि शिरते ही ॥७॥
गे बये ! अतांच पडत पाया
ढुंकुही नको कधिं गरिबा या
राहुं दे कृपा दुरुनि तुझी ती
गातसे तुझी म्हणुनिच कीर्ती ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार फा. व. ३० शके १८५० ]

---

क. क्र. ५८ "चित्रा"

५७ वें वृत्त—चित्रा ( अकराअक्षरी. त न स ग ग ) SS||||||SSS

चित्रा[1] नव मधु[2] मधुरा[2] रम्या
अव्याकृत[3] चिररु चिरा सौम्या[4]
उद्यानक[5] वसुमति मांगल्या
अव्याहत सहभव[6] साकल्या[7] ॥१॥
आमोद[8]चटक अधिं लावोनी
तेथोनि मग पुरवि शब्दांनीं
वाटेल नवल-रमतो केवीं-
वस्तूविण नर कधिं कां कोणीं?॥२॥
आहे जगिं अशि कवितादेवी
शब्दांतुनि अमृत सदा देई
नेत्रांत उदधि[9]सम संरक्षे
होई कधि झरताचि प्रत्यक्षे ॥३॥
शोकामधुनिहि रमवी केव्हां
ऐशी अभिनव[10] कविता दिव्या
दुःखांत हसवि कविच्या चित्तां
कोलाहलें करवित एकांतां ॥४॥
मातेसम सुखवित जी माते
बालांसम रिझवित चित्ताते
अत्यांतिक सुभंग[11] दिसे नेत्रां
मद्धृदयीं मधु[2] कविता चित्रा[1] ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
चैत्र व. ९ शके १८५१ शुक्रवार ]

---

१ विविधा. २ गोड. ३ अतर्क्य. ४ मोहक. ५ क्रिडावन. ६ स्वाभाविक. ७ समग्रता. ८ आनंद सुगंध. ९ समुद्र. १० अगदीं नवीन. ११ दैववान्, सुंदर.

## क. क्र. ५९ "मनाचे मांडे"

५८ वें वृत्त— दोधक( अकराअक्षरी. भ भ म ग ग ) SIISIISIISS

ज्या मनुजां नित नाद जियेचा
छिताति मनाचि तन्मन, वाचा
पाहत तो युवतीमय सृष्टी
स्वप्नहि त्यास पडे नच दृष्टीं ॥१॥

न्याहाळि जो नयनीं नित नारी
प्रेम नसे, विष तें व्यभिचारी
एकचि वेड वसे विषयाचें
वाहवतें मग ज्ञानहि त्याचें ॥२॥

होत जसा ललनाच स्वयें तो
भांग म्हणोनिच काढुनि घेतो
मान्यचि कीं कामिनिवरचष्मा
तो बघण्यासचि लावितचष्मा ॥३॥

दीनमुखें कधिं याचुनि प्रेमा
कीं न मिळे तरि दाउनि हेमां
तोहि न यत्न फुकाचचि झाल्या
येति अनेक विचार तयाला- ॥४॥

लाज पुरोनि वदे नर कामी
" स्वर्ग करीन क्षणीं नरका मी
होउनि कांहिं तरी जरि धामीं
राहिन सुंदर कामिनिकामी ॥५॥

सुंदरि चालत जी गजचाली
कीं चपलेसमही कधिं काळीं
चालत येइल ज्यावरुनी ही
होइन तेथ बिछाइत मीही ॥६॥

जाहलियां यदि दर्पण पाही
रूप करील मदर्पण तीही
भाग्य न तें वदवेल कुणाला
मी मग तुच्छ गणीन जगाला ॥७॥

होइन हातरुमाल अहा ! मी
भृंग जणूं नवपंकजधामीं
तेंवि वसेन तिच्या करिं नेमें
चंद्रमुखा कुरवाळिन प्रेमें ॥८॥

टेबल, खुर्चि, कपाट, बिछाना
पाहुनि घेइन रूपहि नाना
हा मज मार्ग गमे अति सोपा-
होइन कीं जरि मी मृदु सोफा ॥९॥

तप्प मुळीं स्वरुपीं नच नामी
येइल सांधि कितीतरि नामी !
येइन सुंदरिच्या शत कामी
राहिन आप तिच्या जरि धामीं १०

काष्ठहि शुष्क तरी न अभागी
कीं म्हणवेन सुरेंद्रविभागी
कामिजनांविण भाग्य न कोणां—
लभ्य न जाणिव ही इतरांना ॥११॥

त्यावरि कीं यदि ती बसण्यांते
ओढिल खुर्चि हळूं निज हातें
जें सुख त्या क्षणिं होइल मातें
काय वदेन अवर्ण्य अहा ! ते १२

की उघडील कपाट जरी ती
पाहुनि चाल तिची नय, रीती
स्पर्श सुधामय, कोमल होतो
स्वर्ललनांहुनि दिव्य गमे तो ॥१३॥

सुंदरि कीं पहुडेल बिछानीं
धांउनि येतिल देव विमानीं
भाग्य मदीय बघोनि मनानें
जातिल घेउनि यान, विमानें १४

वॉटरप्रूफमिषें सखिगेहां—
जाइन, झांकिन त्या मृदु देहा
वा विधि! धन्य करी मम देहा
योग मला पळही तरि दे हा १५

पुस्तक होउनियां दिनरातीं
राहिन धन्य अहा! तिजहातीं
कीं सदनांत सदा सखिपाशीं
खांति नसे जरि नित्य उपाशी १६

लोकरिची सुयि होउनिया मी
नाचत राहिन कीं दिन—यामीं
कोमल—अंगुलिपंकजदेशीं
संधि अशी कधिं गा-विधि देशी! १७

नेत्रिं स्खळेन कधीं इतरांच्या
तेंवि खुपेनहि कीं सुजनांच्या
तीनहि लोक करीलाच हेवा
धन्य असेल असा कुणि? देवा १८

होइन बॅट अहा! जरि केव्हां
राहिल थाट कसा मम तेव्हां!
पृष्ठ, कपोल, भुजांभंवतालीं
नाचत राहिन कीं कधिं भालीं १९

स्ट्रोक अचूक घडे यदि बॉला
देत पिटाळुनि त्या गरिबाला
सुंदरिच्या खुलवीन मनाला
हर्षुनि ठेविल त्यावरि गाला ॥२०॥

प्राणाचे पंचसुमात्मक माळा-
अर्पिन मोदभरेंच पदाला
इंद्रहि तुच्छ गणोनि, मनाला
रंजवितां तुडवीन जगाला" ॥२१॥

चंचल कीं चपलासम चालीं
चालत त्या चरणाश्रित खालीं
चप्पलधूलि तिची जरि झल्यां-
'स्वर्ग' म्हणें चवचाल तयाला २२

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार आश्वि. कृ.१४ शके १८५१]

## क. क्र. ६० "भद्रिका"

५९ वें वृत्त—**प्रसंग**
६० वें ,, **भद्रिका** ] (अकराअक्षरी न न र ल ग) ।।।।।।ऽ।ऽ।ऽ

मम यशकर मेरि **भद्रिका**-
द्युति-मणिमय-दिव्य मालिका
मजशिं सुखद काव्यकल्पना
अवनि दिसत रम्य कीं कुणां ॥१॥

किति्क भजति मातृमूर्तिला
मिळविति कुणि पितृभक्तिला
सुखवित नित शालिनी कुणां
रमवित मज काव्यकल्पना ॥२॥

कितिक करिति पुत्रकौतुका
किति मुलिं सजवोनि भातुका-
रमति, सुखविति न त्यां कुणां
रमविति अपुल्याच कीं मनां ॥३॥

रसिकहृदयसौख्यदा अशी
चिररुचिर अवर्ण्य दिव्यशी
विरचित असतांहि कल्पका
सुखवित असतेच **भद्रिका** ॥४॥

मति विकसवितो असा प्रभू
वसत हृदिं जयां, कुठोनि भू-
भुलविल असल्यां ? अशक्य तें !
लव न मन तदीय लुब्धते ॥५॥

सुखहि जरि जगांतुनी मिळे
पदरिं पडत तोंच तें मळे
कवन रचवितो अहा ! सदा
जगत विसरवी कितीकदां ! ॥६॥

"मज न कुणिंहि-अभागि मी-"
म्हणवित भवदृष्टिच्या तमीं
करुणरसपरिप्लुतामही
स सकलरस**भद्रिकाच** ही ॥७॥

सदय, सुहृद, मातृ, पितृ जो
अजर, मन प्रभुपदीं रिझो !
हृदयसुमन अर्पिलें जिथें
जळत तरि जळो सुखें तिथें ! ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार पौ. व. ६ शके १८५० ]

---

## क. क्र. ६१ "आयुष्य"

६१ वें वृत्त—**भ्रमरविलसित**(अकराअक्षरी.४+७ = ११)ऽऽऽऽ-।।।।।।ऽ
म भ न ल ग

**आयुष्या**चा कधिंहि भरवंसा-
अल्पांशेंही नच धरुनि बसा
केंव्हांही तें पळताचि असतें
विद्युद्वेगें झरझर सरतें ॥१॥

**ब्रह्मांडाचे** महदणुहि तसे-
**आयुश्चक्रीं** सतत फिरतसे
श्वासोच्छ्वासी त्रिभुवन सगळें
होतें, जातें नव-परि न कळे ॥२॥
विश्वाला जो घडवित असतो
आरंभाची महति मिळवितो
राही तोही-**विधि** जरि म्हणवी
**आयुष्याच्या** नियमित वलयीं ३
विश्वाचें कीं हृदय चिरुनियां-
पाहे तेव्हां दिसतिलहि तयां-
सत्ध्येयांची अमित शवतती
रक्ताश्रूनीं भिजविल मग ती ॥४॥
सौख्येच्छूचीं अगणित थडगीं
—दाटादाटी करिति जणुं उगीं—
तेशीं भूतें दिसतिल अमितें
छाती ज्याला तरिच बघवते ॥५॥
सत्कार्याचे मधुतर मथळे
अर्धे मुर्धे त्यजुनिच, सगळे
गेले जाती कविहि कितिक ते
**आयुष्याची** गति नच कळते ६
कित्येकांनीं नगर वसविलें
तत्पूर्ती ते नच करुं शकले
संवर्धाया कुणि अति झटले
जीवित्वाला परि झणिं मुकलें ॥७॥
सत्कार्याचें सदन सुरुं करी-
कोणीं, कामें त्यजुनिच अपुरीं,

कोणीं त्याचें कळस चढविलें
**आयुष्यानें** परि न चढूं दिलें ८
मोठ्या यत्नें जमिन मिळविली
कष्टानें ती अनुकुल बनली
रोपेंही कीं जरि झणिं रुजलीं
**आयुष्यानें** उभवु न दिधली ॥९॥
जें यत्नानें सुलभहि गमलें
तें साधायां मनहि विनटलें
**आयुष्याचें** परि दिन सरले
कार्यारंभा त्या न करूं दिलें ॥१०॥
दुःखोद्वेगें मन कळवतें
शाश्वतसौख्यां परि नच वळतें
जेव्हां तेव्हां विषयींच पळतें
**आयुष्याच्या** द्विगुण चपळ तें ११
ओठीं नेलें मुखिं न पडुं दिलें
पोटीं गेलें परि न पचुं दिलें
राहूनें कीं अमृतहि गिळिलें
**आयुष्यानें** परि न गिळुं दिलें १२
**आयुष्याची** चमकुनि विजली-
आशादेवी क्षणभरि भ्रमली
कालाची कीं झडप पडुनियां
जाई तेव्हां पुनरपि विलया १३
लाभावीं जों हळुं हळुं किरणें
दुर्दैवानें खडतर मरणें-
आल्या माळीं-तरि निमुटपणें—
लागे त्यातें मग अनुसरणें ॥१४॥

कोणाला कीं हुडकित असतों
जेंव्हां तेव्हां वणवण फिरतों
त्याच्यापायीं वरिवरि मरतों
येतों, जातों तरि धडपडतों॥१५॥
सातत्यानें आठवित असतों
ध्येयस्थानां तरिहि विसरतों
तेंही होतें पुनरपि दुसरें
मागें मागें मनहि मग फिरें ॥१६॥
वाटे आलों अति निकटिं मी
केंव्हां जातों भुलुनि घनतमीं

होतें केव्हां उलट सुलटही
अंधःकारीं बुडत मग मही ॥१७॥
आयुश्चक्रीं सतत फिरतसे
घेरीं येतां पडुनि उठतसे
मद्दुःखातें म्हणाति कुणि 'पिसें'
वेशीला तें लटकवुनि वसें ॥१८॥
मेलें नाहीं तरि अजुनि पिसें
पाहूं होतें पुढति कसकसें
आयुष्याचें वलय फिरतसें
मीही आहे पुरवित वळसे ॥१९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार पौ.शु. १३ शके १८५० ]

---

क. क्र. ६२ "क्षण न भरवंसा"

६१ वें वृत्त—भ्रमरविलसित(अकराअक्षरी.४+७ = ११) SSSS।।।।।।S
म भ न ल ग

आतां आहे-परि नच कळतें
केव्हां कैसें त्वरित उलटतें
तद्विश्वासें कधिंहि नच बसां !
**आयुष्याचा क्षण न भरवंसा** १
केंव्हां चौर्यें, लपत, धडधडा,
केंव्हां केंव्हां उघड दरवडा
छापा घाली कधिं भरदिवसां
**आयुष्याचा क्षण न भरवंसा** २
कोणाचें हें वच जधिं स्मरतें

आश्चर्याची महति न उरते—
कीं "जातो हा आजि दिन जडसा"
**आयुष्याचा क्षण न भरवंसा** ३
"हें कोणाचें शिरत शर उरीं
ते डोळे या नयनिं बघुं तरी"
या शृंगारा विसरुनिच असां !
**आयुष्याचा क्षण न भरवंसा** ४
या वाक्याला धरिल जरि पुढें
सर्वार्थांच्या विभवि झणिं चढें

वाटें सर्वां मधुरतर रसा.–
**आयुष्याचा क्षण न भरवंसा५**
हा ऐसा तो खडतर तसला–
लज्जेलाही गिळुनिच बसला
कोणीं कोणां जरि कितिहि हंसा
**आयुष्याचा क्षण न भरवंसा६**
ब्रह्मांडाला सर्षिप समजे
त्या योग्याला परि नच उमजे–
घेई चात्रा उलटुनि अहिंसा
**आयुष्याचा क्षण न भरवंसा ७**
ज्या योद्धयानां बघत शिर पडें
कालाचेंही हृदय धडधडें
गेले तेही ! उरलि अवदसा !
**आयुष्याचा क्षण न भरवंसा८**
शौर्याचे जे गिरि परि खचले
मोठे मोठे रखडत बसले
हें ध्यानीं घ्या ! मग कुणिहिं असां
**आयुष्याचा क्षण न भरवंसा ९**
जें जें झालें दिसत आजि असें
कोणां ठावें पुढती दिन कसें
सत्कार्याला झणिं करित असां
**आयुष्याचा क्षण न भरवंसा १०**
थोडें थोडें सतत करित जा
सातत्याच्या सदनिं नित रिझा
कार्याभावीं पल न ढगिं बसां
**आयुष्याचा क्षण न भरवंसा ११**
वैराग्याला हळु हळु मिळवां
सत्ज्ञानाची समइ न विझवा–
दुर्लोभाचा बघुनि कवडसा
**आयुष्याचा क्षण न भरवसा १२**
कोणाचेंही भय लवहि त्यजा
ब्रह्मांडाला पुरुनि उरत जा
वाजूं लागे घरघरहि घसा
**आयुष्याचा क्षण न भरवंसा १३**

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार पौ. शु. १४ शके १८५०
*प्रकाशनस्थल व काल–
त. ज्ञा. मं. अं. ४ ए. १९३१

---

### क. क्र. ६३ "विश्वाद्यंता !"

६२ वें वृत्त—मालती(१)*अकरा अ.य.पा.म म म ग ग SSSSSSSSSS

**विश्वाद्यंता** ! ब्रम्हांडाधारा देवा ! साम्यत्वानें संरक्षी रंकां, रावां
तूझी कारुण्याची मूर्ती जी दिव्या- थोड्याहातें काव्याची घेते सेवा ! १

---

मालती वृत्त २ प्रकारचें आहे मालती१ हें दहा अक्षरी, तर मालती२ हें बारा अक्षरी आहे ज्याला "वरतनू" "यमुना" ही म्हणतात.

अज्ञांच्या तोंडीं कां ज्ञानाच्या गोष्टी? काला झाला कालाकालाचा जो
पंगू शैलें उल्लवीं मोठीं मोठीं ? त्वन्न्यायाचा डंकाही कां ना वाजो ५
सत्यत्वें नात्राजावीं कामें खोटीं— प्रीतीचा गाजावाजा ऐसा गाजे—
सारल्याची होते ना येथें खोटी! २ त्वत्सत्याच्या साम्राज्यामाजीं माजे
देवा ! झाली सीमा त्या कारुण्याची सूज्ञत्वाच्या वाताघातें वाजावी—
नाहीं शोभाही आतां वर्णायाची ती वीणा येथें कैशीं ऐकूं यावी ! ६
वाटें जें जें जेव्हां येतें त्वच्चित्तीं त्वद्वात्सल्यें साऱ्या वृत्तांची पूर्ती
सौकर्यें, साकल्यें होई तत्पूर्ती ३ बव्हंशीं झाली या दीनाहातीं
झालें ऐसें देवा ! त्वद्वात्सल्यानें हे पाहोनी विश्वाच्या तोंडीं जाती—
येथें न्यायान्यायां ज्याचा तो जाणे बोटें त्यांचीं आश्चर्यें ओष्ठप्रांतीं ७
लोकां हें वाटें:—वाटूंलागे आज— दूर्वांचीं टोकेंहीं कां उंचावोनी—
वात्सल्याच्या अंधत्वालाही लाज ४ आकाशाशीं गोष्टी सांगाव्या त्यांनीं?
ना पाहे जेव्हां योग्यायोग्यालाही विश्वाधंता ! ही त्वल्लीला तूं जाणें
हें पाहोनी कां ना व्हावी लाही!— आम्हां ठावें-नांवाचें गावें गाणें ८

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार चै. व. २ शके १८५१ ]

---

६३ वें वृत्त--मौक्तिकमाला ] अकरा अक्षरी ५+६ = ११
५५वें,,अनुकूला ५०वें ,, कुड्मलदंती ] **मौक्तिकमाला** क.क्र.९२पहा !

---

क. क्र. ६४ "**प्रेम**"

६४ वें वृत्त—**रथोद्धता** ( अकरा अक्षरी. र न र ल ग ) SISIII-SISIS

**प्रेम** ईश, परमेश होतसे कल्पनामय नसेच जल्पना
**प्रेम** कां समजतां असें तसें— **प्रेम** ना करित अल्पहि वल्गना
**स्वर्ग**, कल्पतरु कीं सुधेसम ! चिंतनाविण मिळें सदा मनां
हर्म्य वा उपवनादि दृग्भ्रम ! ॥१॥ भावना पटवि निश्चितें जनां ॥२॥

प्रेमहीन नच एकही जगीं
वृक्ष डोलति सदैव कां उगी?
प्रेमसार असतो तदंगत
तोच डोलवि तयां अखंडित ॥३॥
धेनु सर्व निजवत्स चाटिती
पांखरें भरविती पिलांस तीं
प्रेमभाव पशुमाजिंही दिसे
प्रेमहीन कधिं जीव कां वसे?॥४॥
प्रेमगान भरलें चराचरीं
ओढिते मग निसर्ग तीच री
सप्तलोक भरुनी उरे किती—
अंशचित्रहि न कोणि रेखिती ॥५॥
प्रेम काय न जगांतरीं कां ?
जन्म, तत्स्थितिहि मृत्यु त्यांकरीं
कार्य कारण—असो, नसो—तिथें
आदि अंति वसतें सदैव तें ॥६॥
जेविं सूर्यकिरणें विभागल्यां—
वाटतीं अवनिं येत भागल्या
तीच एकवटल्यास दग्धती
प्रेमही पटविते प्रतीति ती ॥७॥
विश्व, ईश, शशि, सूर्यसें गणूं
प्रेम हें नभ, असें जरी म्हणूं—
दृष्टिकोन झुकवोनि पाहतां—
ठेंगणें किति तरी दिसें अतां !॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार पौ शु. ४ शके १८५० ]

---

## क. क्र. ६५ "ललित"

### ६५ वें वृत्त—ललित ( अकराअक्षरी.५+६=११ ) SISIS–IIISIS
र ज स ल ग

लोल लक्ष्मिही चरणिं लोळते
लाजतें जिथें ललितलास्य तें—
स्थान न लभ्यसें लव न वाटतें
वृत्ति होतसे झणिं लुली तिथें॥१॥
शोधितां तयां थकुनि बैसतां
शांति भासते क्षणिक तत्वतः
स्फूर्तिचंद्रमा सुपथ दावितो
शोधण्यास तो फिरुनि लावितो २
चित्त रंगतां ललित-वाङ्मयीं
जाहलीच कीं ललित ही मही
तृप्तचित्त हें तरि न जाहलें
हांव राहिली, स्फुरण दाटलें ॥३॥
पाहतां त्वरें नभ मनीं भरें
कल्पना तिथें भिरिभिरी फिरे

सूर्य पाहतां चित्त रंगलें
फूल गोजिरें झुलत वाटलें ॥४॥
रक्त, दिव्य हें तमत्रिदारक
तेज फांकवी अतुळ माणिक
शब्दचित्र हें सरस जाहलें
दृश्यचित्रही त्वरित काढिलें ॥५॥
रश्मि दाविल्या रविस रेखिले
सावलीसवें द्युतिहि चित्रिले
'रम्यचित्र ! त्या जनहि बोलिला
सत्यही म्हणे **ललितसत्कला**॥६॥
तारका नभीं उगवुं लागल्या
बाग व्योमिचा सकल कोंदला
चंद्रदर्शनें मनसमुद्र हा
फुल्ल जाहला, खळबळे अहा! ॥७॥
व्योमभागिचें सुमन रंगलें
हृत्प्रदेशिंचें मन न रंगलें
दिव्य जी प्रभा हृदय जाणतें
दाखवूं शके **ललित** काय तें?॥८॥
विश्वचित्रही **ललित** काढवी
वृक्ष, पुष्प, वा फळहि दाखवी
दृश्यपूर्णता जरिहि भासवी
गंध ना तसें रसहि चाखवी ॥९॥
सर्व हें खरें तरिहि जादु ही
द्वैत घालवी मिटवितें दुही
रंगतो कवी **ललित**रंगिणीं
भव्य विश्वही विसरतो झणीं ॥१०
चित्त रंगतां **ललित**गायनीं
ध्यास तोच तो सतत लागुनी—
ओष्ठ सारखे पुटपुटे तदा
गात कार्यही करितसें सदा ॥११
प्राणतार कीं पिळित ज्या क्षणीं
एकतानता अनुभवी झणीं
जीव गुंगतो सूर लावितां
कीं कुरंग तो दूर धांवतां ॥१२॥
उदित जाहल्यां **ललित**भावना
चित्त इच्छितें चित्र साधण्या
कार्यिं लागतां चिकटतें पिसें
त्यांत वृत्तिही रुतुनियां बसे ॥१३॥
सौख्य लाभतें अवचनीयसें
चित्रकार तो कविच होतसे
गायनासही विसरतो झणीं
ध्येयरूप कीं सहज होउनी ॥१४॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार मार्ग. व. ३० शके १८५० ]

## क. क्र. ६६ "वातोर्मी"

६६ वें वृत्त—वातोर्मी (अकरा अक्षरी. ४+७ = ११) SSSS–IISSISS
म भ त ग ग

वातोर्मी[1] ही जधिं सौगंध आणी
वाटे घाली नवजीवनास कोणीं
संपूर्णाशें नच कोणींच हुंगे
अर्धे मुर्धे, तरिही त्यांत गुंगे ॥१॥
त्या योगानें गमतें वैद्यमार्गा
त्यागोनीयां जणुं आणी परागा[2]
आधीं अर्धे सुमजागींच ठेवी
बाकीची ती रसिकांचीच ठेवी॥२॥
गाणें आहे—इतुक्या जाणिवेला—
देई, आला ध्वनि किंवा न आला ३
मोठ्यानें कीं जंव गायील कोणीं
ऐकूं येई मधु कानीं दुरूनी
तेव्हां यातें गमतें आवडेना
देई आम्हां म्हणुनी पूर्ण गाना॥४॥
जेव्हां कोणीं निज चित्तांत गातो
केव्हां गीतां रचितां गुंग होतो
आनंदाची मधु ऐकोनि गाणीं
केव्हां केव्हां नच अर्धेंहि आणी
येथें वाटे जणुं ऐकोनि गुंगे
चित्त भ्रांतें विसरे, घे न संगें॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार चै. शु.१३ शके १८५१ ]

---

## क. क्र. ६७ "देवाचे"

६७ वें वृत्त—वृत्ता ( ११ न न स ग ग ) IIIIIIIISSS

मनुज सुखवि निज देहाला
जरि बघत इतर दे हाला
अविरत निज सुख वर्धाया
नच मनिं धरित दया, माया ॥१॥
जपुनि जरि न सदनीं ठेवी
लभत कुठुनि सुख ही ठेवी ॥२॥
परि धडपडत असे नित्य
उलट करित त्यजुनी सत्य
कुठुनि फुरसतही ऐशातें—
बघवत पळं तरि देशातें
अविरत मनुज दमे यत्नीं
विसरुनि पंथ[3] पळतो रानीं ॥३॥

---

१ वायुलहरी. २ पुष्पांतले रजःकरण. ३ मार्ग.

झटुनिहि करित सदा कृत्य
तरिहि फसत असती नित्य
अपथ धरित नर तृप्त्यर्थ
मार्गिच म्हणुनि मरे मर्त्य ! ॥४॥

समजाति—सुख निजदेहाचें
परि नकळत वपु[1] देशाचें
असुहि[2] कुठुनि निज ? काळाचें !
सकल मिळुनि जग **देवाचें** ॥५॥

फायनान्स हैद्राबाद द.
शनिवार का. शु. १५ शके १८५१ ]

---

## क. क्र ६८ “शालिनी”

६८ वें वृत्त—शालिनी (४+७ = ११ म त त ग ग) SSSS–SISSISS

होई माता भोजनीं अन्नपूर्णा
शय्यागारीं सर्वभोगादि नाना
कार्यीं मंत्री तेंवि दासीहि दारीं
आर्याभार्या एक जी तीच चारी १

भाग्याचा जो, त्यास हा लाभ सारा
वर्षे तेथें नित्य पीयूषधारा
त्याच्या गेहीं सर्वदा कामधेनू
तम्दाग्याचा अंशही केंवि वर्णू !॥२॥

संसारीं जी दक्षता पूर्ण ठेवी
ऐशी भार्या **शारदा-लक्ष्मि-देवी**
औत्सुक्यानें कष्टते सर्वदा ही—
जेथें राही केंवि दारिद्र्य दाही ! ३

विद्येनें जी संस्कृता होय भार्या
बुद्ध्याधिक्यें सारिते श्रेष्ठ कार्या
केव्हां केंव्हां भूमिका देशिकाची
बुद्ध्याभावीं व्यस्तजोडी जयाची ४

सन्मार्गाला लावि कैफीपतीला
दुर्दैवानें लाभल्या **शालिनीला**
तेव्हां होते ढाल ही संकटाची ५

सोसे सारीं वाग्शतेंही शठाचीं ॥
जी धैर्यानें सोसुनी सर्व दैन्या ॥
आप्तेष्टानां भासवी पूर्ण धन्या
वाङ्माधुर्यें तोषवी स्वाश्रितानां
शंका सुद्धां येउंदेई न कोणा ॥६॥

शोकी जो कां लोटि पत्नीस शोकीं
डोकीं फोडी काहिं थोडें अडो कीं
लोकीं सांगे-तीस जो जो विलोकी
“डोकें भारी आज माझें दुखे कीं” ७

लाभाला या मारि जो मूर्ख भाळा
हाळाहाला सेवुनी भोगि हाळा

---

१ शरीर. २ प्राण.

घालायाला भाग्यमालींच घाला—
आला, घाला काल, वाटे बुधाला ८
ज्याला त्याला तोंड टाकून बोले
आलागेला भांग प्याल्यास डोले
हें साधाया दागिना कां न मागे
त्यावेळींही **शालिनी** शांत वागे ९
चंगी मंगी मद्यप्याचेंहि व्यंग—
धैर्यें बांधी—सोडवायास चंग
भंगिष्टाचें ना दिसूं देच व्यंग
ठेवी लोकां लौकिकामाजिं दंग १०
दैवीं आल्या संकटें नित्य ताजीं
सोडीना कीं अल्प **शालीनता** जी
नैराश्येचा लागुं ना देच वारा
पायीं तीच्या लोळतो स्वर्ग सारा ११

हैद्राबाद ते मालकाजगिरि(रेल्वेंत)
शनिवार पौ. शु. २ शके १८५०

---

## क. क्र. ६९ "ईण"

६८ वें वृत्त—शालिनी (अकराअक्षरी ४+७ = ११) SIIS–SISSISS
भ त त ग ग

माता, रंभा, मंत्रि, दासीच चारी—
पूर्वी होतीं माणसें जीं विचारी
त्यानीं केला नेम हा कार्यभेदें
नानारूपें पत्नि घे आज मोदें॥१॥
सौंदर्यानें पद्मिनी, चित्रिणीची—
रूपें घेई दुर्गुणें डाकिणीची
रूपाभावीं हीच होई जखीण
सर्वाभावें कोणीं ना कोणीं 'ईण' २
शाळेमाजीं होतसे मास्तरीण
कोठें होते हास्पिटल्-डाक्टरीण
केंव्हा गातें, दिल्रुबा वाजवीते
टाळ्या साऱ्या एकटी हीच घेते ३
व्याख्यानेंही मोठ मोठालें देते
पत्रीं देण्या लेखिका हीच होते
अध्यक्षाचें स्थानही शोभवीते
जेथें तेथें भूषवीते पतीतें ॥४॥
अर्धी मुर्धी साक्षरा ऐशि भार्या
जेव्हां तेव्हां हीच घेई सपर्या
पत्नीभावा सांडुनी बुद्धि सांगे
नाकानेंही सोलुं लागेच वांगे ५
ज्या त्या कार्या हातीं घे हीच भार्या
अंतालाही लाविते सर्व कार्यां
गाडी हांके, शोफरी जाणते ही
कांहीं सांगा कीं म्हणे 'येत तेंही' ६

कर्तव्याची अल्पही चाड नाहीं
पत्नित्वानें सर्वदा "ऋण" राही
कांहीं क्षुद्रा कांहि नेणें जरी ती
ऐसेंठायीं प्रत्ययाला वरी ती ॥७॥
राजाची कीं ही स्वयंसिद्ध राणी
छोटे मोठे जोडिती सर्व पाणी
खेडेगांवीं होतसे पाटलीण
पायीं तीच्या गांवठी होति लीन ८
रूपाभावीं भूमिका शालिनीची
घेण्या जाई—ती बठे डाकिणीची
बोले जेव्हां लाडकी—मार्दवानें
ओष्ठप्रांतीं थाटवीत स्मशानें ९
आणायाला हास्य अर्धेच गालीं
यत्नानें तें साधितां त्याचकालीं—
एकाएकीं फाळके नांगराचे—
येती कैसें कोण सांगेल वाचें-? १०
जाते खालीं मान त्याची भयानें
वाटे तीतें मानहानी अशानें
तो पाहे कीं—शांत होई कशानें—
त्यातें देई उत्तरें ही कशानें॥११॥
क्षोभोर्मीयां जाइ कीं तीव्रतेनें
भूमी तेव्हां पादपद्में दणाणे
संतापानें सारितां सर्व कृत्यां
पाही त्याला, वांटते हीच कृत्या १२
गर्जोर्मीयां ज्यावरीं तोंड टाकी
जिव्हा किंवा कृष्णपाषाण टांकी
वाटे—वाजे दुंदुभी कीं नगारा
भूमातेला ठाव मागे बिचारा ! १३
अर्धांगी जी सद्गुणी रूपयुक्ता
लाभे त्याच्या स्वर्ग येईल हातां
तीन्हीं लोकीं एक तो दैवशाली
दैवाभावीं त्याजला? देव वाली! १४

मलकाजगिरी हैद्राबाद द.
रविवार पौ. शु. ३ शके १८५० ]

---

## क. क्र. ७० "हृत्प्रसून"

६९ वें वृत्त—शुद्धकामदा (६+५ = ११ न र र ल ग) ।।।SIS–SISIS

मजशिं लाभलें हृत्प्रसून हें
इतर पुष्प कीं पाहुंही नये
बकुल, शेवती, उग्रचंपक
मधु गुलाबही पारिजातक ॥१॥
कमल, केतकी जाइ वा जुई
मधुलतान्वितावृक्ष गुच्छही
मजशिं काय हो ! कुंद, मोगरा
सतत प्राप्त जो तो खरा, बरा २
सकल काय तें एक हें असें
मधु, मदीयही सर्वदां वसें

त्रिभुवनांतली रम्यता अहा !
सहज सांठली यांत कीं पहा ॥३॥
सुमन पाहिलें आणि हुंगिलें
सकलसार तें यांत संचलें
मधुर, उग्र वा सौम्यही किती
वदुं किती? कसें?नाहिं त्यां मिती ४
सकल सौरभां पूर्ण जाणतें
अनुभवें स्वयें विश्वसार तें
पटवि पृच्छकां सर्वतोपरी
जगतवेगळें राहुनी दुरी ॥५॥
भ्रमत कल्पना कीं न हें कळे—
जगत यांत—कीं हें जगांतळें ?
वसत विश्व जें यांत कीं गणूं
सकल काय जें हेंच तें म्हणूं॥६॥
मधुर, रम्य ज्या वस्तु भूतलीं—
दिसाति, भासती सर्व यांतली
नसुनि कांहिंही सर्व कीं असें
अभिनवांतलें, एक दिव्यसें! ॥७॥
अखिल विश्व ज्या, श्रेष्ठ कीं वदे
चरणिं त्याचिया वाहण्यां मुदें
त्रिभुवनांतही साम्य ज्यां नसें
सुमन एक हें ठेविलें असें ॥८॥
करित ध्यानही हें मुक्यावचें
तुजशिं घालितें स्नान अश्रुचें
मृदुलपाकळी वस्त्र कीं नवें
सकल होतसें हृत्प्रसून हें ९
मधुर चंदनें तुज विलेपितां
झणिं हरिद्र वा कुंकुमाक्षता
तुळसि, बिल्वही मंजरिस्वयें
विविधरूप घे हृत्प्रसून हें ॥१०॥
पाझरें तधीं वाहतें दिसें
असुनि आर्द्रही शुष्क होतसें
बनुनि धूप हें मंद कीं जळें
धरुनि तीव्रता दीप पाजळे ॥११॥
करि निवेदना, मंत्रपुष्पही
सकल पूजनां साधि प्रत्यही
परि प्रदक्षिणा घालितां दमें
तरिच कीं मुदें विश्विं ना रमें १२
अमित रूप जें घेउनी रिझें
परि न पाहिलें रूप तें तुझें
नमवितें जिथें मस्तकास तें
चरण कीं तुझें हेंच जाणतें॥१३॥
उपवनीं, वनीं, देउळीं, घरीं—
अजुनि ईश्वरा ! शोधितें तरी—
क्षणहि कां बरें तूं दिसूं नये !
गरिब कष्टतें हृत्प्रसून हें ! ॥१४॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार मार्ग. व.१२ शके १८५० ]

## क. क्र. ७१ "श्येन"

७० वें वृत्त—श्येनी ( अकराअक्षरी. र ज र ल ग ) SISISISISIS

कालरूप जो दुरूनि लक्षितो
श्येन[1] दीन जीव—पक्षि भक्षितो
शक्त, दीन काल पाहिना कधीं
नाशि मृत्युभीति सांडि तीव्र धी ॥१॥
मेघ पाहुनी मयूर नाचतो
व्याल ढुंकुनीहि पाहिनाच तो
वीज नृत्य अंबरीं करीतसे
हर्ष, दुःख होय अंतरीं तसे ॥२॥
श्येनभीति क्षुद्र पक्षिच्या मनीं
निर्भयास्थिती तयास कोठुनी
धैर्य राखिल्यां न भीति अल्प त्या
भीतिभूत नित्य भाववी मित्या॥३॥
ध्येयरूप राहिल्यां, कृतीविना—
तो उगी कधीं क्षणैक राहिना
ध्येय होय साध्यही त्वरें तसें
कार्यमग्नताच शौर्य देतसे ॥४॥
अन्यभान त्या शिवेच ना कदां
कार्यि जी वसे दिसे न आपदा
ध्येय तें दिसे कुठेंहि पाहतां
तेंच दे यशास निश्चितें हतां ॥५॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार का. शु.१५ शके १८५१ ]

---

## क. क्र. ७२ "स्वागतां"

७१ वें वृत्त—स्वागता अकरा अक्षरी. र न भ ग ग SISIIISIISS

स्वागतां नच उभा जरि कोणीं
बा पिका ! परि न जा परतोनी
आम्रमंजिरि खरी रसवंती
दाविते मृदुल हास्य सुदंती ॥१॥
हा कसा फुलत आम्र पहाना !
डाहळ्या डुलविती निज मानां
कां उगी हुडकिशीं रसिकाला
कोणिही भुलत गोड स्वाला ॥२॥
गात जा ! कुणिहि ऐकत राही
त्वद्रवावरुनि धांवत येई
पाहण्यास तुज उत्सुक जो तो
धन्यवाद कुणिहीं तुज देतो ॥३॥

---

१ बहिरीससाणा.

पाहुनी तुज कुणीं नच हर्षें — त्या मुळेंच जगिं तूं प्रिय होशीं
त्वद्रवान्वितसुधा यदि वर्षे— **स्वागतास्तव** वृथा हट घेशीं ॥४॥

मु. डाकुर (डंकापूर)
ज्ये. व. ६ शनिवार शके १८५३ ]

---

क. क्र. ७३ "**तीं—हीं**"

७२ वें वृत्त—**इंद्रवंशा** ( बाराअक्षरी त त ज र ) SSI SSI ISI SIS*

**तीं** गेलियानें मन जें तदा उलें
**हीं** कन्यका कष्टत—काय तें मिळें
**तीं** जाय काळीज विदारुनी तिथें
**हीं** त्यांत दोरा भरण्यांत कष्टते ॥१॥
**तीं** आलि मातापितयास सोडुनी
**हीं** जातसे तेंवि दिल्याघरीं झणीं
**तीं** त्यागुनी गेलि मलाहि ज्या दिनीं
**हीं** आणि मी आठवितों सदा मनीं ॥२॥
**तीं** चंद्रिका लोपलि त्याच यामिनीं
**हीं** राहिली ह्न्नभिं शुक्रचांदणी
**तीं** गेलियां शेवटचाच कीं तिचा—
**हीं** दे पहारा अजुनी पहांटचा ॥३॥
**तीं** कोकिला जाय उडोने गाउनी
**हीं** साद दे तत्स्मृतिते क्षणोक्षणीं

---

*ही वृत्तदर्पणकारानीं दिलेली लक्षणा आहे.गीर्वाण लघुकोशांत (त त ज ग ग अशी लक्षणा आहे तर छंदोमंजरी पृ० ७२ वर त य य य अशी लक्षणा लिहिली आहे. पण पृ० ३४ वरील श्लोक वृत्तदर्पणांतील लक्षणेनुरुप आहेत; शिवाय "समग्रपंत" ग्रंथातही उपरिनिर्दिष्ट लक्षणेची एकवाक्यता असल्यामुळें याचाच अनुवाद केला आहे.

ती लोटिते आंतुनि अश्रु—निर्झर
ही प्रेमआंचेंच पुसे भराभर ॥४॥
ती गेलियां हें सदन स्मशानसें
ही घालि पाणी, उगिं काष्ठ मी वसे
ती जाळि पाणी, उकळोनि ओतिते
ही व्यर्थ उद्यान मनांत योजिते ॥५॥
ती दिव्य रश्मींच तिथोनि फांकवी
ही सौख्य देण्यास—तयांस सांठवी
ती जाणते—पर्णचि शुष्क पेटते—
ही वेडि जाते शमवावयास ते ॥६॥
ती लावुनी तार पिळोनि प्राण कीं
ही भैरवी शेवटचीच गायकी
ती स्वर्गि—चाटे जगतास—क्रंदन
ही आणि मी गात तिचेंच गायन॥७॥
ती ध्येय चिन्मूर्तिच होय मन्मनीं
ही पाहतों की स्मृतिमूर्ति, लोचनीं
ती ध्यान—ध्यात्यासह—ध्येय होतसे
ही साधण्याते तप साह्य देतसे ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शुक्रवार पौ. शु. ८ शके १८५० ]

---

क. क्र. ७४ "नामछंद"

७३ वें वृत्त—चंद्रवर्त्म (४+८=१२ र न भ स) ऽ।ऽ।—।।ऽ।।।।ऽ

चंद्रमार्ग[१] मजला मधु गमला
ईशनाम असला मनिं भरला

---

१ अल्हादकारक रस्ता.

निश्चितेंच ठरला हृदिं ठसला
विश्विं एक वसलाच पसरला ॥१॥
सर्वसार असला नच दिसला
कर्ममार्ग अति दुर्गम गमला
ज्ञानयोग जरि थोरहि ठरला
हाच एक सुलभाधिक पटला ॥२॥
विश्वजीव प्रभुनामिं विनटला
राजमार्ग जगतांतिल असला—
ऐकुनीहि कुणिं एक न वदला
सप्तलोक फिरुनी जरि थकला ॥३॥
पाठलाग करुनी कलि दमला
दुष्ट, खाष्ट कसला तरि फसला
कल्पवृक्ष जगतीं जणु वसला
दावि हाच प्रभुच्या पदकमलां ॥४॥
ज्ञानयोग हरतो तमपटलां
भक्तिमार्ग सुखमूलक पटला
सत्यपूर्ण जरि संमत सकलां
ध्येयवाद अजुनी नच मिटला ॥५॥
धन्यभाग ! वदती प्रभु दिसला
सुंदरांत अति सुंदर असला—
सांगवे न जरि नेत्रिं वाचितला
अश्रु येति नयनांत ढळाढळां ॥६॥
हा अभागि असला जरि वदला—
'तोच लोभ मम मानसिं सुटला'
काय यास म्हणतील कलिमला !
कोणि दोषि गणतील जरि मला— ॥७॥

मूर्ति कीर्ति प्रभुची जगिं सकला–
वेड लावि, म्हणुनी नर रमला
कोण हेतु पुरवी मग तसला
दाखवील प्रभुनामचि प्रभुला ॥८॥
**नाम**मोड जंव मानसिं रुजला
छंदरूप मग वृक्ष उभवला
वाढ घेत किति दूर पसरला
**चंद्रवर्त्म**[1] अवगुंठुनि उरला ॥९॥
**नामछंद** मधु सौरभ सुटला
ज्ञान, भक्ति मग भेदचि नुरला
धांवलाच सुमनावरि बसला
हेतुभृंग नुरला सुम बनला ॥१०॥
**नामछंदिं** निजभाव विसरला
ध्येयहेतु सगळाच बदलला
देव, भक्त तरि कोठिल ? कसला?
चित्तशांति अनुभूतिंत मुरला ॥११॥
त्याच **नाम**फळिं जो रस भरला
याचनाच नुरवी लव मजला
चाखितांच भवबंधहि नुरला
**नामछंद** हृदयीं परि उरला ॥१२॥

शालीबंडा हैद्राबाद द.
फा. व. ११ शके १८५० शुक्रवार ]

---

१ आल्हादकारक रस्ता.

क. क्र. ७५ "जलधरमाला"

७४ वें वृत्त—जलधरमाला (४+८ = १२ म भ स म) SSSS-IIIISSSS

वाटे नेत्रां जलधरमाला[1] व्योमीं
तत्प्रीतीचें स्थल म्हणजे ही भूमी
कोण्यां पापें कळत न ते या कालीं
गेले जे ते परत न आले खालीं ॥१॥
आकाशाचें सदन गमे लोकानां
तज्जन्माचें बघति परी हो! कां ना?
या भूमीनें जनन दिले, तद्भू[2]–माला[3]
जन्माचा कीं विरह त्यांना[4] झाला॥२॥
केव्हांही त्या धडपडती येण्याला
फेरे घेती अविरत या भूमीला
केव्हां मान्या जमति कराया यत्नां
एकीलांही अजुनितरी साधेना ॥३॥
केव्हां केव्हां सजति उड्या घेण्याला
ऐकूं येई गडबड ती कानाला
माजे ऐसे रणहि कधीं त्यांच्यांत
जो तो घाई करिताचि सही सर्वांत ॥४॥
रेटारेटी अविरत चाले त्याकालीं
तत्पूर्तीतें लिहि न विधाता भालीं
लागेना कीं लवहि यशाचा वारा
नेत्राश्रूंच्या वहति म्हणोनी धारा ॥५॥
त्या योगानें अम्हि जगतों जे येथें
अल्पांशेंही बघत न तच्छोकातें

१ मेघमाला. २ तिच्यापासून-जन्मणाऱ्या. ३ मेघमाला. ४ मेघमालांना.

त्याच्यासाठीं लवहि न अश्रू येती
जाणों सारी जरि अनुभूतीरीती ॥६॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार चै. शु. ४ शके १८५१ ]

---

क. क्र. ७६ "कार्याकार्य"

७५ वें वृत्त—जलोद्धतगति (६+६ = १२ ज स ज स) ।ऽ।।।ऽ-।ऽ।।।ऽ

निशीथ समयीं नभांत शशिनें—
रुपें उधळिले प्रमोदितमनें
सुरत्न तुकडे किती चमकले !
हिरे उधळिले कुणीं ? न कळले ! ॥१॥
तिथेंच नुकती उषा खिदळली
गुलाल भरुनी लगेंच लपली
सहस्रकर हा अतां नभिं दिसे
सुवर्ण उधळी अहा ! किति? कसे ! ॥२॥
प्रशांत हृदयें-विकल्प—त्यजुनी—
बसे निशिदिनीं उगा जरि कुणी
रुपें, कनकही पडेल पदरीं
परी मनुज कीं न धीरचि धरी ॥३॥
सुधेसम इथें झरे कितितरी !
—नको श्रमहि ते भगीरथपरी
—बसे उगि जरी कुणी सगरसा
विमुक्त करिते पवित्रचि रसा ॥४॥
सुशांत मन तें कधींहि न बसें

---

१ अनुभव.

स्वयें करवितें जनीं निज हंसें
जगीं धडपडें, उगीं लुडबुडें
सदा, तरिच कीं अकार्यचि घडें ॥५॥

विकल्प असतां विचार न घडे
विचार करितां क्षणोंक्षणीं अडे
तरीच पद कीं पुढें नच पडें
विमूढ बनुनी बघे चहुंकडें ॥६॥

निकुंजभ्रमनें बघे घनवनीं
तयां मिळविण्या पळे मग झणीं
सकंटकपथीं दमे झडकरी
मधेंच त्यजुनी फिरे निजघरीं ॥७॥

घरीं न रमतें लवैकहि मन
फिरें फिरुनि तें उगीं वणवण
वनीं, उपवनीं, जनीं, विजनिं तें
गमें नव जिथें—तिथें थबकतें ॥८॥

सुतत्वचच जो सदा परिसतो
सुशांति मिळवी जरी—परिस तो
महत्व मिळतां उगीं न बसवें
प्रसिद्धिकारितां जगांत मिरवे ॥९॥

मुकेलहि तयां मुखें गरजल्या
मिळे नच पुन्हां तया विसरल्या
अकार्य करणें—शताधिकगुणें—
तयाहुनि बरें—उगींच बसणें ॥१०॥

उदारचरितें जगां सुखविण्या
महत्व प्रभुचें जनां पटविण्या

जगा विचरती सुसंतहि किती
नमीं रवि, शशी सुसंथ फिरती ॥११॥

घालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार पौ. कृ. १० शके १८५० ]

---

क. क्र. ७७ "चित्तोच्छितदाता"

७६ वें वृत्त—तनुमध्याद्विरावृत्तावृत्त (६+६ = १२) ऽऽ।।ऽऽ–ऽऽ।।ऽऽ
त य त य

दुःखा शमवाया सौख्या मिळवाया
सांगोनि उपाया—ते साध्य कराया—
लावोनिहि देती मार्गास अनेक
चित्तेच्छितदाता ऐसा प्रभु एक ॥१॥
यत्नांतुनि जेव्हां काहीं नच साधे
कोणा उलटें ते अभ्याहत बाधे
ते शांतविती त्यां सांगोनि विवेक
चित्तेच्छितदाता ऐसा प्रभु एक ॥२॥
त्याची कुणि हानी काढीहि भरोनी
चेष्टेच्छित कोणीं हासे हंसवोनी
कोणीं म्हणती-या हास्या-'अविवेक'[1]
चित्तोच्छितदाता ऐसा प्रभु एक ॥३॥
दुःखस्थित जेव्हां होती हतबुद्ध
ढाळी कुणि अश्रू ज्याचें मन शुद्ध
दुःखां बघुनीयां कोणी करि शोक
चित्तोच्छितदाता ऐसा प्रभु एक ॥४॥

---

१ दोषयुक्त.

साधे लव जेव्हां प्रेमी करि घोष
तेव्हां कुणि हेवा, द्वेषी करि द्वेष
आधीं यश पाही योजी मग लेख
चित्तेच्छितदाता ऐसा प्रभु एक ॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार चै. व. ३ शके १८५१ ]

---

क. क्र. ७८ "तामरस"[१]

७७ वें वृत्त—तामरस (५+७ = १२) ।।।S-।।S।।SS न ज ज य

सरसिं[२] बघे जंव तामरसाला
गमत म्हणूं अति धन्य रसाला[३]
मन हरिते बघतांच जनाचें
हृदय तदा किति हर्षुनि नाचें ! ॥१॥
सहासित[४] हीं वेलयें[५] जलपृष्ठीं
अतुल असे दिसते हंसु ओष्ठीं
वरिवरि ती पळती किति हर्षें
जणुं घडलीं किति भेटिस वर्षें ॥२॥
मिति जगतीं उपमेस नसे ती
जुनिहि जरी अजुनी न निघे ती
कुणिंहि बघा कमलासचि घेती
मधु दिसतां मधुवर्णानि देती ॥३॥
किंतितरि हो ! प्रभु सुंदर माझा !
अतुल असा भुवनत्रयराजा
कर, चरणां, नयनास तयाच्या—

---

१ कमल. २ तळ्यांत. ३ पृथ्वीला. ४ सुहास्य. ५ वर्तुळ.

कमळचि ये उपमेंत जनाच्या ॥४॥
म्हणुनि म्हणूं जरि तामरसातें
गणतिलही अति सुंदर त्यातें
अभिमत जें मनिं तें वदण्याला
कमल असें म्हणतील तयाला ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार चै. शु. ४ शके १८५१ ]

---

क. क्र. ७९ "गिरिराज"

७८ वें वृत्त—तोटक ( बाराअक्षरी स स स स ) ||S||S||S||S

बघुनी वनिं साउलि आणि गिरी
गमते जणुं झोंपुनि रात्रभरीं-
पडल्या पडल्याच हळूं बघतो
करि प्राचि दिशा शिर उन्नत तों ॥१॥
बघतांच उषा नवरक्तछटा
दिसलें उघडी तमलोहपटा
बघुनी गगनीं रवि रक्त असा
म्हणतो जणुं-'कां उगिं कोपतसां? ॥२॥
रवि कोमलशीं पसरीं किरणें
तरि विव्हल होउनि दीनपणें-
गिरि कीं पसरी अपुल्या पदरां
प्रथमक्षाणिं दुःख न सोशि जरा ॥३॥
म्हणुनी रवि कोपुनि काय मनीं—
शर तापवुनी जणुं सोडि झणीं

---

१ पसत केलेलें.

मग आळस सोडुनियां हळुं तो
निज पायहि आखडुनी बसतो ॥४॥
तरणी जरि संतत तापतसे
तरि सिद्धहि हा सहण्यास तसें
जंव तापहि वर्धत तीव्रपणें
तरि हाहि न कांहिं तयास गणे ॥५॥
किति शांत अहा! गिरिराज खरा
कार्वि संकटिं हा चळतो न जरा
नच तापद होइ परास तसा
लव देइ न दुःख कधीं सहसा ॥६॥
रवि तापचि देत पहा थकतो
क्षरतां बळ, तोहि तदा ढळतो
किति थोर अहा! गिरिची पदवी
इतरां निज साउलिनें सुखवी ॥७॥
नच सोडि कधीं लव धैर्य, बळा
जळतो तरि आंत जळे अपुला
जणुं स्वांतरिं दुःख सदा दडवी
हिरव्या गवतीं शर ते लपवी ॥८॥
भडका जरि होय तदीय उरीं
धरि शांतचि साउलि पांथ–शिरीं
किति मूक जिवांसहि आश्रय दे
तृण, कोमलपर्णहि चारि मुदें ॥९॥
थकुनी निज आश्रयिं जे वसती
करि पाहुणचार तदीय किती
किति शांतवि पांथ–प्रशांतपणें
गिरिराजगृहीं लवही न उणें ॥१०॥

करि स्वागत—लागत पायधुळी
बसतांच फुलें वरुनी उधळी
मग विंझण शीतल मंद करी
झुळुकांकरवीं पदही चुरवी ॥११॥

तरुदास मिषें मधु कंद, मुळें
अशनास्तव पाठवितोहि फळें
निज निर्झरनीरहि पाजुनियां
थकल्या शिणल्यांवरि ठेवि दया ॥१२॥

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार पौ. कृ. ९ शके १८५० ]

---

क. क्र. ८० "निजदुःख"

७९ वें वृत्त—द्रुतविलंबित ( बाराअक्षरी. न भ भ र ) ।।।ऽ।।ऽ।।ऽ।ऽ

रज समान जरी निज दुःख-तें-
गिरिहुनी अधिकाधिक वाटतें
कुणिहि दुःख कसें तरि सोशितो
परि कुणी परदुःख न मोजितो ॥१॥

मनुजजन्म यदा प्रभुनें दिला
अधिक त्यास विचारहि योजिला !
जरि न जाणतसे परवेदना
'पशुहुनी नर उच्च' कसें म्हणा? ॥२॥

लवहि ओल जरी हृदयीं वसे
तरि तयां परदुःख झणीं दिसे

बल असें-परि-दीन न रक्षिले
किति तसे जगि जन्मुनि नासले ! ॥३॥

मु. अहमदाबाद
ज्ये. व. १ मंगळवार शके १८५३ ]

---

क. क्र. ८१ "नवमालिका"

८० वें वृत्त—नवमालिका ] (बाराअक्षरी न ज भ य) ।।।।ऽ।ऽ।ऽ।।।ऽऽ
८१ वें ,, नवमालिका

सुमनवमालिका कुणिहि पाहे
प्रभुपदिं कोणि मुक्तसुम वाहें
युवतिहि अर्पिण्या प्रियकराला
शिणवित-गुंफिती-निज कराला ॥१॥
प्रियकरकंठिं पत्नि जधिं घाली
निज नवमालिका तंव कपोलीं
सहसित गालिं जी खुलत लाली
विधि लिहितो असें क्वचित भालीं ॥२॥
कधिं पति घालि मुक्तनवमाला
प्रियतरपत्निकंठिं तंव त्याला-
अनुपम सौख्य होय मग त्यातें-
सुरसुखधाम तुच्छहि गमे तें ! ॥३॥
क्षणभरि सर्व सत्य गणलेंही
नच दुसऱ्यादिनीं दिसत गेहीं[1]
"सुकविति मालिका तरणिरश्मि[2]
अतिचपला प्रसिद्ध जगिं लक्ष्मि ॥४॥

---

१ घरीं. २ किरण.

पति जगतो स्वपत्नि हरवोनी
विगतधवाहि वांचति जळोनी
अनुभव घेतसे जगातिं सर्वा
मनुज न बाळगे तरिहि पर्वा ॥५॥
मम **नवमालिका** नयनिं आहे
नच सुकते कधींहि, नित्तं राहे
नवसुमनें अधींच निवडोनी
उगवत तों न गुंफित करांनीं ॥६॥
प्रभु न मिळे समर्पण घडेना
नच कोणि पाहिनाच मम दैना
प्रभुपद पाहण्यास करि घाई
तव **नवमालिकाच** दिसत नाहीं ॥७॥

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार चै. शु. ५ शके १८५१ ]

---

क. क्र ८२ "**पुट**"

८२ वें वृत्त—**पुट** ( बाराअक्षरी. न न म य ) ॥।॥।SSSISS

**प्रभु** ! तव **पुट** ब्रह्मांडास आहे
तरिहि तुजशिं कोणी नाच पाहे
करविशिं तशिं मोठीं, क्षुद्र कार्यें
मनुज जगत त्या योगेंच धैर्यें ॥१॥
पट**पुट** मनुजा दावी तमाला
द्युतिमय तव कीं चंद्रार्कमाला
म्हणुनि हृदयिं पाडी त्या प्रकाशा
पटवितहि जगज्जडादि नाशा ॥२॥

---

१ नेहमीं. २ आच्छादन.

करि विनति करद्वौ संपुटानें
प्रभुवरचरणीं—हा दीन दैन्यें
तवचरणिं सदाची ओढ लागो!
मम मन जगसौख्यां नाच मागो! ॥३॥
सदय स्फुट तुझें तें जीववर्ती
अदय जड असे हें भ्रामवर्ती
प्रभुवर! कधिं तें, हें मान नेशी!
असिमय चिरपीयूषास देशी ॥४॥
अचिर—शबल शुद्ध द्वय जातां
असिपदीहि तसें तें लीन होतां
भ्रम सकल निमे, तेव्हां जनांचें
अविरत मन त्वद्रूपांत नाचें ॥५॥

फायनान्स हैद्राबाद द.
रविवार का. व. १शके १८५१ ]

---

क. क्र. ८३ "मंदाकिनी"

८३ वें वृत्त—प्रभा ] बाराअक्षरी. ७ = ५+१२ न न र र ||||||S-|SS|S
८६ वें ,, मंदाकिनी ]

अमरनगरिं ती स्वं मंदाकिनी
निशिदिनि वहते-म्हणावे कुणीं!
निज अवनिवरी न अस्मज्जनीं
स्वनयनिं बघतों अहर्यामिनीं ॥१॥
बदरिवनिं बघे जगत्पाविनी
स्वनयनिं अलका व मंदाकिनी

---

१ स्वर्ग.

मन अनुभविलें-जिला पाहुनी
निरातिशय सुखां-अघध्वंसुनी ॥२॥
उर्गि न बघितलें तिथें मज्जुनी
वसुनि विचरुनी जलप्राशनीं
किति दिनरजनी अहा ! काढुनी
अमरपदच कीं बसे भोगुनी ॥३॥
म्हणुनि म्हणत मी निरालंबनी
लव न कचरुनी विना शंकुनी
उघड सकलिकां असें निक्षुनीः—
[२]त्रिदिविं नच वसे स्वैं मंदाकिनी ॥४॥
परि कलुष पहा पुन्हां ओढुनी
फिरुनि बसविलें इथें आणुनी
तरि स्मृति अजुनी सदा मन्मनीं
सुखवित असते अहा ! आतुनी ॥५॥
हरपादिं वहतेच केदारिणी
आम्हिं तुम्हिं बघतोंच रात्रंदिनीं
तशिच अवनिं या वसे स्वर्धुनी
[७]त्रिदिव मग गणी कां कुणीं ! ॥६॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
सोमवार मा. व. ३० शके १८५०

---

१ निश्चयाच्या आधाराघर. २ स्वर्गी. ३ आपुली. ४ पाप. ५ बद्री केदारांत वाहणारी मंदाकिनी. ६ गंगा. ७ स्वर्ग.

## क. क्र. ८४ "चुकल्यापथीं गवसतें भलतें"

८४ वें वृत्त—प्रमिताक्षरा (बाराअक्षरी स ज स स) ।।ऽ।ऽ।।।ऽ।।ऽ

हित इच्छितो परि न यत्न करी
अमुनी सदा स्वहित तें स्वकरीं
कृति झालियां उलट कीं करतो
नच साधतां धडपडे मग तो ।।१।।
सुख इच्छुनी मिळविण्यां श्रमत
परि दु:ख तें मिळतसें सतत
भ्रमतो उगीं—नच तया कळतें—
**चुकल्यापथीं गवसतें भलतें** ।।२।।
विधुदर्शनार्थ भटके दिनीं तो
रवि शोधण्यास रजनीं श्रमतो
वन पालथें, नगरही उलथें-
करितो तरी विफल होयचि तें ।।३।।
परि तारका चमकती नयनीं
अमु कंठिं येत पडतां दमुनी
नर शोधि एक, दिसतें नव तें
**चुकल्यापथीं गवसतें भलतें** ।।४।।
प्रभु शोधिते जणुं धरा प्रमुदा
परि तो वसे दशदिशांत सदा
उदरीं—तसें फिरतसे वरती!
पदरीं असे परिस—जाणि न ती ! ।।५।।
रवि तापवी मुळिं न ठेवि दया
फिरते जणूं चुकविण्यास तया
उघड्यांत व्यर्थ लपण्यां श्रमते
**चुकल्यापथीं गवसतें भलतें** ।।६।।

रवि तापवी, शमवि चंद्र, जसें
मनुजास दुःख सुख होय तसें
सुख-साधितां श्रम वृथा, घडतें—
मिळतेंच दुःख सरतां मग तें ॥७॥
करि चावुनी चिकट, आणि तसें—
उगिं ओढितां बळकटी गवसे
कधिं ताणतां तुटतसे मग तें
**चुकल्यापथीं गवसतें भलतें** ॥८॥
तृषितार्त कीं मृगजलास भुले
सिकताकणांविण न कांहिं मिळे
कुणिं रज्जु जाणुनिच सर्प धरी
डसतां मरे करि **अकार्य** जरी ॥९॥
कुणि मौक्तिकें गणुनि धांवतसे
परि शुक्ति पाहुनि हताश बसे
करि यत्नही तरि **अकार्य**चि तें
**चुकल्यापथीं गवसतें भलतें** ॥१०॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार (रात्रौ) पौ. व.१० शके १८५० ]

---

क. क्र. ८९ "मन"

८५ वें वृत्त—**प्रियंवदा** ( बाराअक्षरी. ४+४+४=१२) ।।।ऽ-।।।ऽ।ऽ।ऽ
न भ ज र

सुख असे नित्त शरीरनिष्ठ तें
मन वृथा जगिं परंतु कष्टतें
विकलियां मनुज—देहही जरी
न जबरी घडुं शके मनाबरी ! ॥१॥

मन यदा न अपुलेंहि राहिलें
नच तया कुणिहि शक्त पाहिले
मन जया करिं असें-अजिंक्य तो
सुरतरू जणुं घरींच वाढतो! ॥२॥
मन फिरे चहुंकडे स्वतंत्र तें
कुणि म्हणा कितितरी न तें मितें
पवनही नच जया-पुढें टिके
त्रिभुवनीं नच कुणीं मनाधिकें! ॥३॥

मु. सिद्धपूर (अहमदाबाद)
ज्ये. व. ७ शके १८५३ रविवार ]

---

क. क्र. ८६ "भुकेला"

८६ वें वृत्त—भुजंगप्रयात (बाराअक्षरी.य.पा. य य य य) ।SS।SS।SS।SS

रुची तीच जाणे—असे जो भुकेला
गणे कीं सुधारूप कोंडा भुकेला
खरा तोच कीं लागलेला भिकेला
अती द्वेष वा लोभ लक्ष्मीशि केला ॥१॥
गमेही जरी—दीन दैन्यास भोगी
क्षुधाक्रांत आहे सदाचा निरोगी
हतप्राक्तनें वाटला सौख्यभिन्न
न तच्चित्तवृत्ती दिसे अल्प खिन्न ॥२॥
रसास्वाद—लौल्यामुळें भक्षितांही
जरी ना क्षुधा—नाहिं स्वास्थ्य कांहीं
प्रभूते जसा सन्मुखें मूढ बाही
नसे ओढ चित्तीं वृथा गर्जना ही ॥३॥

स्वयें जें जळें काष्ठ जाळी दुजाला,
असे ना—तरी बद्ध तें क्षुद्र जालां
जिव्हाळा नसे भक्तिमार्गीय ज्याला
कशी हांक पोंचेल त्याची अजाला ! ॥४॥
करा काय हो ! घेउनी त्या कराला
न पूजी विधी, विष्णु वा शंकराला
कळेना प्रभू संसृतींकिंकराला
न जाणेंच जन्मांध काका, मराला ॥५॥
गणे देहधारीच देवादिकाला
प्रभू नाकळे मग्न संसारिकाला
अनेकान्नही वाढतां अर्भकाला
स्वपात्रीं जसा तो करी सर्व काला ॥६॥
गणे ब्रम्ह जायेस वा लेकराला
तया भ्रामवी नित्य माया कराला
असें ब्रम्ह सोपें न ब्रम्हादिकांला
कळे शर्करास्वाद कां वाहकाला? ॥७॥
न जाणेंच जो आपुल्याही हिताला
असा, जन्मतः लागतो मृत्पथाला
घडे स्वार्थ ज्या मूल तो स्वाहिताला
कसा योग्य होईल अन्याद्धिताला ॥८॥
असे क्षुत्पिपासा तरी तृप्तिवांछा
वसे संगती साधुच्या, सज्जनांच्या
असे तृप्तचित्तापुढें नित्य ऋद्धि
परी सिद्ध लाथाडितो अष्टसिद्धि ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार आश्वि. व. १० शके १८५१ ]

क. क्र. ८७ "माझी मणिमाला*"

८७ वें वृत्त—मणिमाला* ६+६ = १२ त य त य SSI।SS-SSIISS

माझी माणिमाला ठावे न जगाला
ज्ञानी न तपीला, कोणाहि मुनीला,
जोशी कुणि आला योगी जरि झाला,
पापी-पुनिताला, कोणाहि नराला ॥१॥
जो उत्सुकतेनें मागे तरि देतो
कोणी जरि झाला यत्नें न शके तो
पाहे जरि स्थाना घेण्या झणिं जातो
साधे नच तेव्हां कष्टी उगि होतो ॥२॥
माझी मजला ती झाकी दिनरातीं
कद्रू धन नेत्रीं ठेवी नच हातीं
हेमावरि माती लोटी, तंव शांति—
तैशी मम भ्रांती नाहीं जरि चित्तीं ॥३॥
मागे तरि देई, ठावे जरि हेंही—
देतांहि न होई, घेत्या सुखदायी
त्यातें बघतां कीं वाटेल असेंही—
होतें मनिं कांहीं तैसें मुळिं नाहीं ॥४॥
ती सन्निध आहे माझी मजमाजीं
केव्हांहि पडेना राहोनिहि काजीं
इच्छी मन तेव्हां ना ये, सुलभें जी
यावी, मग कोठें तीतें जंव याजी ॥५॥
येते लव, तीही हातीं नच राही
ज्या पाहति डोळे, डोळ्यांतुनि येई

*प्रकाशनस्थल व काल-तत्वज्ञानमंमिर अं.४६स.१९३०.*'मणिमाला' वृत्त२प्रकारचें आहे"मणिमाला(१)"अक्षरवृत्त व मणिमाला(२) अर्धसमवृत्त

जेव्हां नच कोणी तीन्ही जागीं पाही
वाहे कितिवेळां ज्याची मिति नाहीं ॥६॥
येते निजइच्छें, जाते जरि बाही
आल्यावरि आहा! शांती किति देई!
ती काय वदावी ठावे मज नाहीं
ज्याचा क्रम नाहीं, सांगूं तरि केंवि! ॥७॥
वृत्ती चिकटावी त्याच्यापदिं आधीं
जेव्हां विसरावी देहीं, मन बुद्धि
गुंगी जंव यावी, जाते मग शुद्धि
ऐशा स्थितिमाजीं लागेच समाधि ॥८॥
मार्गाविण गेल्यां तत्संकट बाधी
शास्त्राविण केल्यां होतो अपराधी
जाती निपटोनी व्याधीसह आधी
कोठें मग कैंची ब्रह्मांड-उपाधी ॥९॥
ठावे नच ज्याला त्याला भलत्याला-
प्राणांतिक ऐसा येतो जंव घाला
यावी अनुभूती तेव्हां, लव त्याला
ऐशी मधु, दिव्या! **माझी मणिमाला** ॥१०॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार चै. शु. ७ शके १८५१ ]

---

८८ वें वृत्त-मंदाकिनी ] बारा अक्षरी ७+५ = १२
-८३ वें „ प्रभा ] "**मंदाकिनी**" क. क्र. ८३ पहा!

---

## क. क्र. ८८ "कुणीतरी"

८९ वें वृत्त–मालती (२) (बारा अक्षरी न ज ज र) ।।।ऽ।।ऽ।ऽ।ऽ
–९१ वें „ यमुना ]
–९३ वें „ वरतनु ]

नयन कधीं मज धाडिती वनीं
मृग बघतां शमवीति ते क्षणीं
श्रवणिं घुमे यदि मंजुळ ध्वनी
**फिरवि मला** विजनीं, जनीं, वनीं ।।१।।
गळ गिळिती न कळोनि मासळ्या
निज असुही त्यजिती जशा खुळ्या
कधिं रसना फसवी रसांतरीं
**फिरवितसे मजला कुणीतरी** ।।२।।
नयनिं दिसे जरि रम्य पाहतो
मनहि तिथें रमतांच वाहतों
नच बसुं दे क्षणही बसे जरी
**फिरवितसे मजला कुणीतरी** ।।३।।
वणवण कीं फिरणें त्यजे मग
नयनजलीं प्रतिबिंबवी जग !
बघत बसे जरि तें वरी वरी
**फिरवितसे मजला कुणीतरी** ।।४।।
नयनपथें हृदिं मूर्ति कीं नवी
कधिं उतरे, पदही न वाजवी
सदन करी अपुलें तिथें जरी–
**फिरवितसे मग कां कुणीतरी?** ।।५।।
पडुं न दे मन मूर्ख, मर्कट
तळमळतां अरवेच कुक्कट

सतत वृथा बल सर्वेही हरी
**फिरवि सदा कुठुनी कुठेंतरी** ॥६॥

शवचि जसें अनिलांत कीं वसें
धगधगतों अपुल्यांत नी तसें
उरि सलतें मम काय हें तरी!
**फिरवितसे मजला कुणीतरी** ॥७॥

सरत, जवें झरतें वरी वरी
पुरत कसें मग आयुही तरी?
अवसर दे न विचार जों करी
**फिरवितसे मजला कुणीतरी** ॥८॥

गणति कुणा नच होउंही शके
कुणि झटल्या निज जीवना मुके
परत पुन्हा फिरणें पडे घरीं—
**फिरवितसे** तरि कां **कुणीतरी?** ॥९॥

न बघितलें कधिं रूपही तुझें
तरिहि प्रभो! मन हें कुठें रिझें?
लुलिहि पडे स्तविता न वैखरी
**फिरवितसे** म्हणुनी **कुणीतरी** ॥१०॥

हुडकितसे कधिं कीं दऱ्यांत मी
म्हणुनिच कां भ्रमतों असा तमीं?
तरिहि पिसें बिलगे नच अंतरीं
**फिरवितसे म्हणुनी कुणीतरी** ॥११॥

निरस गमे तुजवांचुनी जग
तगमगतें मन हें सदा मग

अजुनि खरें न कळे मुळीं जरी
**फिरवितसे मजला कुणीतरी** ॥१२॥
अजुनि बरें-इतुकें जरी कळे
कधिं न कधींतरि सत्य तें मिळें
लव न दमे फिरतां मरे जरी
**फिरवितसे मजला कुणीतरी** ॥१३॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार (सकाळीं) पौ. व. १२ शके १८५० ]

---

क. क्र. ८९ **"मौक्तिकदाम"**

९० वें वृत्त—**मौक्तिकदाम** (बारा अक्षरी.) य.पा. ।S।।S।।S।।S। ज ज ज ज

प्रभो ! तव संतत मंगलनाम—
मदीय मुखांत असेल अकाम
तदा मम भाग्यउषा उजळेल
न हें भुवनत्रयिं चित्त रमेल ॥१॥
त्वदीय यशस्कर घेतांचि नाम
सर्वे नयनांतिल **मौक्तिकदाम**[1]
सहर्षित गुंफित राहिन नित्य
न होइल बाधक अल्प अनित्य ॥२॥
कुणी म्हणती-'प्रभु दृष्टिं पडेल—
यदा तसलें तप घोर घडेल'
प्रभुद्युति जी भुवनत्रयिं पूर्ण
असे, परि नेत्रिं दिसे नच तूर्ण ॥३॥
प्रमोदाचि रूप तदीय जगांत

---

१ मोत्याची माळ.

असें अति हर्षुनि ऋग्यजु गात
श्रुती वदती—'हृदयीं प्रसरेल
दिसेलहि तो परि दृष्टि सरेल' ॥४॥
सुधा, सुरभीहि रुचे न मनास
अधीर सदैव तुझ्या नमनास
उभा बघण्यांस तुझ्याच पदास
मदेकपदावरि पादप दास ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार चै. व. ४ शके १८५१ ]

---

९१ वें वृत्त—यमुना
—८९वें ,, मालिनी(२).९३ वें वरतनू ] बारा अक्षरी ५+७ = १२ क.क्र. ८८"कुणीतरी"पहा !

---

क. क्र. ९० "अवधूत"

९२ वें वृत्त—यूथिका(बारा अक्षरी३+९ = १२ र न भ र)SIS IIISIISIS

सर्वतः विचरतो अवधूत जो
चित्त हें मम तयास सदा भजो !
तत्वतः त्रिभुवनामधिं संप्रती
सर्वशः नित जयास असे गती ॥१॥
देइ बा ! प्रभु ! विशाल मती अशी
तूं जसा फिरत संतत राहशी
स्थान ना लवभरी त्यजिशी कधीं
वागशी तरि अलिप्त जगामधीं ॥२॥
रूप तें तव कसें ? मज पाहुं दे.
तूं कसा ? समजुनी मग गाबुं दे.

मन्मनीं-शिकवि बा ! तुज ठेवणें
ठेवुनी प्रमुदितें जगिं वागणें ॥३॥

मु. गिरिनार (जुनागड)
अ. आषा. शु. २ शके १८५३ गुरुवार

---

९३ वें वृत्त वरतनू
-८९ वें ,, मालती(२)९१ यमुना ] बाराअक्षरी ५+७ = १२ क.क्र. ८८ "कुणीतरी" पहा !

---

क. क्र ९१ "वारा"

९४ वें वृत्त—वैश्वदेवी ( ५+७ = १२ म म य य ) SSSSS-SISSISS

ओढयाच्या काठीं वृक्ष जे डोलतात
त्यांची ना आई ना दिसे कोणि तात
कोणीं गे ! त्यांना येवढें उंच केलें ?
न्हाऊं माखूंही घालुनी वाढवीलें? ॥१॥
आनंदाने या डाहळ्या डोलतात
पानें त्यांचीं हीं सारखीं हालतात
पुष्पें उंचोनी कोण एकेक तोडी?
राशी या येथें-ना शिडी नाच घोडी ॥२॥
कां गे ! पानें हीं कोवळीं कांहिं मोठीं-
तोडोनी खालीं मृत्युदाढेंत लोटी?
झाडांच्या शेंड्या खालिं येती क्षणांत
जाती तैसे ते त्याच वेगें नभांत ॥३॥
कां गे ! ऐसें हा कोण जो त्रास देतो?—
केव्हांही त्यांना सारखें हालवीतो
पाहोनी त्यांचे हाल कांटाच येतो
आत्ता कीं तेव्हां वाटते आपटे तो ॥४॥

हा ! हा ! गे आई ! काय आवाज झाला ?
झाकी मी डोळे भीति वाटे मनाला
हा ! हा ! गे ! येथें केवढ्यानें धडाडे !
कीं भूमी फाटे, वजि कीं ही कडाडे ! ॥५॥
आतां कीं होता उंच सर्वांत एक !
आकाशाशीं गे ! गोष्टि सांगे कितीक !
त्यालाही पाडी ? कोण ऐसा प्रतापी?
मूळापासोनी बूड कीं कोणि कापी! ॥६॥

* * * *

"बाळा ! हा वारा, नेम याचा न कांहीं
वाहे जेव्हां तो भाग्यकालांत दैवी
माझ्या सोनूल्या ! आज तो"-त्यापुढें कीं—
ऐकूं आले ना शब्द, भूमी भिजे ती ॥७॥
गाभा केळीचा आडवा कोसळोनी—
खालीं जों आला, तो ध्वनी आयकोनी
गेला हाही कीं आंत वाऱ्या समान
मागें ती गेली—कोकिलाही उडून ॥८॥

* * * *

कानीं गुंगे तो साद, तो देश सारा
वाजे मोठ्यानें आज ऐसा नगारा:—
**जीवित्वाचें हें सारचांचल्य—वारा**
**वारा ! वाराहो ! लोभ, मोहास वारा !** ॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार(सकाळीं) पौ. व. ११ शके १८५०

## क. क्र. ९२ "वावटळ"

१४ वें वृत्त—वैश्वदेवी ( बारा अक्षरी.५+७ = १२ )·SSSSS-SISSISS
म म य य

आजी ! कां माते चालवीशी धरोनी?
वारा जोराचा वाहताहे म्हणोनी ?
चालूं ना देशी, वाळल्या अंगुलांनीं—
माझीं कां बोटें आवळीशी पिळोनी ? ॥१॥

मी तो इल्लुसा-कुक्कुला-बाळ नाहीं
आत्ताशां कैसा छान मी धांवतोही !
आधीं चालोनी दाखवूं कां तुला हे
—आजी ! गे आजी ! तो पहा ! कोण आहे? ॥२॥

माळ्याच्या माथीं दूर जो धांवताहे—
खालींही केव्हां वाकुनी काय पाहे?
हाले ऐसा कीं देत धक्काच कोणीं
आहे त्या जागीं एकटा तोच प्राणी ! ॥३॥

धांवे—वस्त्रें कां सारखीं सांवरोनी?
पंचा खांद्याचा ठेविला कां धरोनी?
एका हातानें सांवरीतो रुमाला
कोणीं कां घाली त्यावरी काय घाला? ॥४॥

केव्हां केव्हां कां थांबतो तो मधूनी ?
चालू लागे जों—चालतो कां जपोनी?
होतो ऐसा तो कावरा बावरा कां ?
मोठ्या मोठ्यानें मारुं कां त्यास हांका ? ॥५॥

हा ! हा ! हा ! आजी तो पहा! तो फिरोनी
धांवूं जों लागे सारखा घाबरोनी !

पंचाही त्याचा हाय ! गेला उडोनी–
आला माघारीं तो बिचारा पळोनी ॥६॥
ज्याच्यासाठीं गे ! तो पुन्हां येथ आला
घेतानां हाही घालि लोटांगणाला
जातां जातांनां जो पडे कां उदास–
गेलाही त्याचा फाटुनी पायपोस ! ॥७॥
पाजी जो ऐसा–कोण? ? कां ? गे ! दिसेना ?
मंडावोनी कां सोडितो व्यर्थ दीनां ?
नाहीं कोणींही दूसरा त्याठिकाणीं
झोंबाझोंबी कीं चालवीली बघोनी ॥८॥
आजी सोनेरी व.ळली कांहिं पानें
कां गे ! चौ. रा नाचती ही कशानें?
कोठें ? त्यासंगें धूळही उंच जाई?
कोणीं नेले? हां ! ( तोहि नाहीं–न हीही ! ) ॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार(माध्यान्ह)पौ. कृ. ११ शके १८५० ]

---

क. क्र. ९३ "प्रतिबिंब"

९४ वें वृत्त— वैश्वदेवी( ५+७ = २१ म म य य) SSSSS-S SS SS

बाबा ! कांहो ! हें झाड मोठें असोनी
ज्याच्या पासोनी दूर नाहींच पाणी–
पुष्पांच्या वेली क इथें लोंबतात ?
त्याला सोडोनी नाचती कां जलांत ? ॥१॥
आहे ना? बाबा ! साउली बायको ती ?
रामाची सीता होति कीं जी खरी-ती-

अग्नीमध्येंना? ठेविली नाशिकांत
छायासीता ती रावणाच्या घरांत? ॥२॥

वृक्षांच्या साऱ्या साउल्या या मदींत—
कांहो! त्या आल्या धांउनी दूर येथ?
त्या योगानें कां कांपती भीतभीत
त्यानांही वाटे वाकडी काय रीत? ॥३॥

नाहीं ना? बाबा! जीव या साउल्यानां?
कैशा या होती ज्या तऱ्हा काय नाना
आनंदाची ही! कीं म्हणू नाचण्याची—
त्या मेलेल्यानां काय भीती कुणाची? ॥४॥

कोणींही राही जो उभा या तटाकीं
तो तो कां सारी साउली यात टाकी?
हें पाणी तीतें आदळी, तेंहि पाही
याची कां त्याला अल्पही खंति नाहीं? ॥५॥

जो कां चांदोबा उंच आभाळिं आहे—
या पाण्यामध्यें थर कां कांपताहे?
कोणी दुष्टानें लोटिले त्यास रागें!
तेथोनी येथें कोसळे, हात मागे ॥६॥

वाहे हें पाणी—वाहुनी जाइना कीं!
वाटे आला तो जीव याचाहि नाकीं
साराना धोंडा! बाजुला तेवढा तो
केव्हांपासोनी आदळे त्यावरी तो ॥७॥

*     *     *     *

बाळा! छे! छे! तो नाहिं आलाच येथें
होता तो जेथें राहि जाताहि तेथें

झाडें, नक्षत्रें, चंद्र हा सूर्यही तो
**देवाजी सारा खेळ हा खेळवीतो** ॥८॥
त्यांचीं जीं रूपें तेंपि नाहींत तेही
वाटे जे कांहीं राहते काहिं बाहीं
देखावा ऐसा सर्व आहे भ्रमाचा
**देवाजीचा खेळ सारा मजेचा !** ॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार(निशीथ) पौ. कृ. ११ शके १८५० ]

---

क. क्र. ९४ "तो–हा"

९५ वें वृत्त—**वंशस्थ** (बारा अक्षरी. य. पा. ज त ज र) ।S।SS।।S।S।S

जरीहि **वंशस्थ** कृशान होय **तो**
स्ववंशही तेंवि वनास जाळितो
बघोनि ज्वाला विझवावयां पहा
परस्थ धाराधर धांवलाच **हा** ॥१॥
फुलोनि एकाच तरूवरी मंहें
वसें प्रभूच्या शिरिं-धन्य एक हें !
दुजेंच कीं प्रेतशिरीं विराजतें
जळे चितेमाजि तयासवेंच तें ॥२॥
दिसे जनाला व्यवहारमग्न **हा**
करीत आमुष्मिक कार्यही महा
तदीय बंधू मंदिरेंत मग्न **तो**
असोनि **वंशस्थ** कुलास जाळतो ॥३॥
विशाल विद्या तरि ठेवितो स्पृहा
**अनेक कार्यीत दिसे निमग्न हा**

---

१ उत्सुकतेनें

विलास एकास सदैव साधतो
सहोदरातेहि न तच्छतांश तो ॥४॥
सदा कदा संकटिं धांवतोच हा
सुपूज्य होतो, जगिं वाढते चहा
विचार, विद्येंत खराच पूज्य तो
कुणावरी तोंड खुशाल टाकतो ॥५॥
उदात्त, गंभीर सुभाषणें अहा!
पळाप्रमाणें पटवीत वर्ष हा
पळांत पंध्रा जणु भाव दावितो
पळास वर्षेच करीत खाष्ट तो ॥६॥
उदारधी साधि जगत्प्रपंच हा
यदीय व्यापारहि, कार्यही महा
प्रपांचिं तो दक्ष सदैव राहतो
स्त्रियांमुलांमाजिच धन्य होय तो
वडील बंधू करि नोकरीच तो
न कोणिं ढुंकोनिहि त्यास पाहतो
दुजा स्वदेशास्तव कष्टतो अहा!
चढे त्वरें लौकिक मान्यतेस हा ॥८॥
असोनिही रौरव साधनींच तो
जगे तरी तो निरयींच नीच तो
मुनिश्चयें स्वर्गनिवास ह्या घडे
जगीं सदा वाजति कीर्तिचौघडे ॥९॥

शालबिंडा हैद्राबाद द.
शुक्रवार पौ. व. ७ शके १८५० ]

क. क्र. ९९ "सारंग"

१६ वें वृत्त—**सारंग** (बारा अक्षरी.य.पा. त त त त) SSISSISSISSI

**सारंग** शिंगें उभारोनि जो येत
जाणे खरें तोच त्याचें अभिप्रेत
धैर्यास त्याच्या बघोनी परी चित्ति
आश्चर्य वाटे तदाधिक्यही भीति ॥१॥
ऐशा प्रसंगीं कुणीही पळावेंच
झाला जरी व्याघ्र तोही करी तेंच
या वैपरित्यातुनी लाभ घेण्यास
साधेलही सिद्ध जो चित्त देण्यास ॥२॥
प्राणाकडें पाहिना जो तयापाठिं
सिद्धी सदा लाळ घोटति त्यासाठिं
त्याच्यापदीं राहती हर्षनिर्भ्रांत
आनंदती तत्पदाघात घेण्यांत ॥३॥
जे कां ठरें तें विचाराति आधींच
कार्यी न मागें पुढें अल्प पाहीच
ऐसा असे जो न तो शक्ति पाहील
साधील सारेच जें चित्तिं आणील ॥४॥
त्याच्यापुढे घाबरे मत्तमातंग
शार्दूल कोठें ! कुठें दीन **सारंग** !
थट्टाच ही साम्यतेची गमे ज्यास
देईलही साक्ष वस्तुस्थिती त्यास ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार चै. व. ६ शके १८५१

---

१ काळवीट. २ योजिलेलें. ३ असंबद्धता, उलटपणा.

क. क्र. ९६ "सागरा"

९७ वें वृत्त—स्रग्विणी (बारा अ.य.पा. र र र र) SISSISSISSIS

नाच रे! नाच ऐसाच बा **सागरा!**
आवरोनी धरी स्वीय नीलांबरा
ठेवि ओच्यांत मोती सदा राखुनी
पावलो पावलीं देत जा फेंकुनी ॥१॥

नाम लक्ष्मीपिता साजतेंही जरी
दिव्य रत्नें तशीं फेंकिशी अंबरीं
कां उगी कल्पना—तारका या किती
फेंकलेलीच रत्नें पहा उंच तीं! ॥२॥

दिव्य रत्नें नभीं फेंकिशी, तत्प्रभा—
मानही लोपवी, न्याहळी जो नभा,
राहतो लुब्धुनी पाहणारा उभा
कोणि बोलों तया "तारकांची सभा" ॥३॥

मुक्त प्रत्यक्ष जे प्रत्यहीं फेंकिशी
भाग्यहीनास तत्प्राप्ति व्हावी कशी?
फक्त नेत्रीं तया पाहणें लाभतें
घेउं जातां करीं क्षारबिंदूच ते ॥४॥

मुक्त भूमीवरी फेंकिशीं सारखे
सर्व आम्हांस होती परी पारखे!
घेतल्यानें बुडी खात्रिनें लाभते,
वाटते,सांगशी "यत्न दे भाग्य तें!" ॥५॥

मु. बेट द्वारका
ज्ये. व. ११ गुरुवार शके १८५३ ]

## क. क्र. ९७ "चंद्रिका"

९८ वें वृत्त–उत्पलिनी
–१०३ वें ,, क्षमा
–१०५ वें ,, चंद्रिका
](तेरा अक्षरी.६+७ = १३) ।।।।।।-SSISSIS
न न त त ग

रजनिसमय येतांच ही चंद्रिका–
गमत, हंसत आहे रसा मंद्रिका[1]
बघुनि चलित या मेघमालादिका[2]
वसुमति जणु झेलतिसे कंदुका ! ॥१॥

गगनकमल कीं हें खुले दिव्यसें
विखुरति जणु या तारका तंब्दिसें[3]
तरिच हंसवि कासारिं नीलोत्पलां
नित खुलवि ते लीलया कुड्मला[4] ॥२॥

जरि नभिं विधु तच्चित्त सारे इथें
चुकुनिहि नच तेथें क्षमा[5] धांवते
सतत रमवि मोदें सजातीय जे
म्हणुनि रिझवि त्यानां स्वयेंही रिझे ॥३॥

कुवलयचि न, विश्वाचिया औषधां–
जगवि सकल तो सिंचुनीया सुधा
नियतिहतचि कमल[6], राजीव[7] अंबोरुह[8]–
नलिन[9]सहित जे खिन्न होते कुंह[10] ॥४॥

वसुमतिविण त्यातें न कांहीं सुचे
गगन सदन नाहींच शुभ्रांशुचें[11]

---

१ शुभ. २ अभ्रपंक्ति. ३ कमलतंतु. ४ उमळणारी कळी. ५ पृथ्वी. ६ ते १० हीं नांवें सूर्यविकासिनी कमलांची. ११ चंद्राचें.

जरि म्हणुं पारि लागे इथें तांद्रि कां !
सतत वसत भूमीवरी **चंद्रिका** ॥९॥

मैलारदेवपल्ली, हैद्राबाद द.
शुक्रवार (रात्रौ) मा. व.१२ शके१८५०]

---

क. क्र. ९८‘ ‘**मंजुभाषिणी**”

९९ वें वृत्त—**कनकप्रभा**
—१०७ वें „ **प्रबोधिता**
—११० वें „ **मंजुभाषिणी**
—११५ वें „ **सुनंदिनी**

} तेरा अक्षरी.५+८ = १३ ॥SIS-IIISISIS
स ज स ज ग

मधुरागिरा श्रवुनि **मंजुभाषिणी**
तनु झालि जी पुलकिता अहा ! कुणी—
कधिं स्वर्गिंही अमृत काय आणिल?
तव ऐकतां सुमधुरस्वनानिल ॥१॥
गमलीं धरा - सनभ आणि सागर
अति हर्षुनी जणु थरारिलें घर
क्षणिं जीवन—स्मृति मदीय घालवी
मम हृन्नभीं उजळवी उषा छवी ॥२॥
पळतां नदीं थबकलीहि वीचिका—
स्रवता, अतां परि ममाश्रुमालिका—
नच थांबते पलहि, बोलशी न कां ?
वद एकदां, फिरुनि लाजवीं पिका ॥३॥
जपमालिका जणु बसेच होउनी—
करि सार्थ गे ! सरस नांव तें झणीं
नुकतेच जें मम निघें मुखांतुनी
वद एक कीं वचन ! ऐक मागणी ! ॥४॥

जरि ऐकशी वच मदीय या क्षणीं
मज ऐकूं दे वचन गोड तें झणीं
जरि स्वर्गिं तूं जगत मीहि ना गणीं
झणि बोलगे! तिथुनि मंजुभाषिणी! ॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार पौ. कृ. १२ शके १८५०]

---

क. क्र. ९९ 'कविरोदन"*

१०० वें वृत्त—कलहंस
१०१ वें ,, कुटजा
—१०६ वें ,, नवनंदिनी
—१०८ वें ,, प्रभावती
—११४ वें ,, सिंहनाद

} (तेरा अ. यति पादांतीं) ॥ऽ।ऽ॥।ऽ॥ऽऽ
स ज स स ग

मन का न लुब्धत विहंगमगानां?
मम कान ऐकति न सुंदर तानां?
नच वृत्तिही हलविण्यां आजि मानां?
कशि जागिं होय, न तऱ्हा करि नाना? ॥१॥

बसली अधोमुख अशी नच पाही
चुकुनी कुठेंहि, लव शुद्धिहि नाहीं
थिजली, खिळोनि बसली कुठलीशी—
उकरोनि आठवण काढि अपेशी ॥२॥

रमते न बागडत आज कुठेंही
विरहाश्रु वाहवित मुग्ध बसे ही

---

*प्रकाशनस्थल व काळ—"कविसंमेलन" भाग २ रा. श. १८५३ (पृ. १२१)

खग अंतराळिं उडती—फिरुनीया
कितिदां तरी तरुवरीं बसती या ॥३॥
किति रम्यता उपवनीं रमवाया—
वसली, तरी सतत घालवि वाया
नच हालवी चुकुनि अल्पहि पायां
मग यास योजुतरि काय उपाया ! ॥४॥
गमलें नको मुळिंच यत्नहि कांहीं
असतां सदा सुरलता कविता ही
मग काळजी कसलि काय कुणाला
रमवूं इथेंच तसल्याहि मनाला ॥५॥
रुदनांत सौख्य जरि दाटत आहे
रमवूंच त्या रडुनि हा ! कळतां हें—
किति विस्मयें वदति कीं मुख माझें !
रडुनीच आज हलकें करुं ओझें ॥६॥
नच ओरडा लवहि हे विहगानों !
न मुहूर्त अल्पहि बरा मयुरानों !
अजि गायनासमचि नर्तन याला
नच योगही शुभद, दुर्दिन आला ॥७॥
मज आज पोटभर कीं रडुं द्याना !
जरि आवडेल डुलवा हलुं माना
मग गा उद्यांच मनसोक्त खगानों !
जरि ना रुचेल तरि जा शकुनानों ! ॥८॥
चिमणी, चकोर, टिटवी भगिनीनों !
नच राग मानुनि रुसा, नच जाणों—
धरि कोप कां मजवरी शुकबंधू—
नमितों तुम्हां नित नका मज निंदूं ॥९॥

नच अल्पही आजि बसां तरुमार्गी
रडुं द्या खुशाल, जगिं एक अभागी
जवळीं बसां न मुळि पोपट, मैना!
किति सांगु मीतरि तुम्हां मम दैना ॥१०॥
वच काढिल्या हृदय कीं उलतें, हें,
नच ओळखूहि मग येइल तें हें,
मग कोठुनी नवसुमें कवितेला
कवि वाहिल्या रसिक डोलति त्याला ॥११॥
**कवि कीं बसे रडतही-तरि गातो**
**कवनांतला पवन सौरभ नेतो**
**अणि देश तो दरवळोनिच सोडी**
**परि पाहिजे रसिक वाचक जोडी॥१२॥**

मैलारदेवपल्ली, हैद्राबाद द.
रविवार (माध्यान्हीं) मा. व. १४ शके १८५० ]

---

१०० वें वृत्त कलहंस
१०१ वें „ कुटजा
–१०६ वें „ नवनंदिनी } (तेरा अ.) ॥SISIIISIISS स ज स स ग
–१०८ वें „ प्रभावती
–११४ वें „ सिंहनाद

किति **सिंहनाद** भिववी हरिणांना!
लव ऐकतांच झणि टाकिति मानां
बघती जरी न करिती अनुमाना
मनुजा! पहा किति विचार तयानां! ॥१॥
म्हणवूनि घेशि जगिं खोल विचारी
परि सत्य काय? हृदयास विचारी!

तरि तें म्हणेल तुजला अविचारी
पटवीलही त्वरित बाजुस चारी ॥२॥
जरि कालमान बघशीं तरि मान—
नत होय अल्पहि तदा मग कां न?—
तव हें **घड्याळ** हरवीलचि भान
क्षण लाविशील तिकडें जरि कान ! ॥३॥
कळते न काळ कधिं देइल धोका
मग ईशनाम नित कां नच घोका !
त्यजुनी अहंकृति, अपव्यय, हेका
म्हणते **घड्याळ**हि, न मीच बरें कां! ॥४॥
किति वाजवी टकटका तव कानीं
जरि ऐकिले अजिवरी कितिकांनी
परि हें भयंकर कुणी गणले कां?
वद **सिंहनाद** मग हाच नव्हे कां? ॥५॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
शुक्रवार (प्रातौ) मा. व. १२ शके १८५० ]

---

### क. क्र. १०१ "कालकुटिलगति"

१०२ वें वृत्त—कुटिलगति ] (तेरा अ. य. पा.) ॥॥SISSISSIS
१०४ वें ,, गाथा ३ ] न ज त त ग

**कुटिलगती**[1] त्यजी **काल** ना अल्पही
नच कळतें कशी सोशिते ही मही !
त्रिभुवनपालका ! हें न कां पाहशीं?—
किति दुरवस्थिती[2] ही जगाची अशी ! ॥१॥

---

१ वांकडीचाल. २ वाईट स्थिति.

निझसुख एक हें, ध्येय जें काय तें
अविरत राहतें वाढतें हाय ! तें
सकलहि पाहती, जाणती, कोणि तीं–
मति न विनाशिनी हाणुनी पाडिती ॥२॥
अविकृत लब्ध[1] ऐसेच कोणासही
सहज करावया येत नाहीं सही !
तरि सहुतों सदा सर्व दैन्यादिकां
परि तुज हे प्रभो ! पाहवे पूर्ण कां ? ॥३॥
करिति न कोणि एखादिही सत्कृति
जरि कुणि केलियां ती न स्वीकारिती
करुंहि न देति कीं आदरें सत्कृती
कधिं तरि की खपे कां न कोणी किती ॥४॥
नच करितां स्वयें धर्मकृत्यादिकां
न करवितीहि कोणांकडोनी फुका
घडत जरी कधीं दोष खेदप्रसू
बघुनि अशी बुधा कां न येई हंसू ॥५॥
कुणिहि असो सदा स्वार्थ तो पाहती
नच निरपेक्षतेनें नया[2] वाहती
भय भरलेंच अस्मत्समाजीं अतां
नय नुरलाच काहीं कुठेंही मतां ॥६॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
रविवार(उत्तर रात्रौ)मा.व.१४शके१८५० ]

---

१ अधिकारारूढ. २ उपाय.

१०३ वें वृत्त—क्षमा. (९८ वें उत्पलिनी. १०५वें चंद्रिका.) ६+७=१३
"**चंद्रिका**" क. क्र. ९७ पहा !

---

१०४ वें वृत्त—गाथा. ३ (१०२ वें कुटिलगाते. ) तेरा अक्षरी
"**कालकुटिलगति**" क. क्र. १०१ पहा !

---

१०५वें वृत्त चंद्रिका. (९८ वें उत्पलिनी. १०३ वें क्षमा.) ६+७ = १३
"**चंद्रिका**" क. क्र. ९७ पहा !

---

१०६ वें वृत्त—नवनंदिनी. (१०२ वें कलहंस. १०१ वें कुटजा. १०८ वें प्रभावती. ११४ वें सिंहनाद. ) तेरा अक्षरी
"**सिंहनाद**" क. क्र. १०० पहा !

---

१०७ वें वृत्त—प्रबोधिता.(९९ वें कनकप्रभा. ११० वें मंजुभाषिणी. ११५ वें सुनंदिनी. ) तेरा अक्षरी ५+८ = १३
"**मंजुभाषिणी**" क. क्र. ९८ पहा !

---

१०८ वें वृत्त—प्रभावती.(१०० वें कलहंस. १०१ वें कुटजा. १०६ वें नवनंदिनी. ११४ वें सिंहनाद ) तेरा अक्षरी
"**सिंहनाद**" क. क्र. १०० पहा !

---

### क. क्र १०२ "**प्रहर्षिणी**"

१०९ वें वृत्त—**प्रहर्षिणी**(३+१० = १३ म न ज र ग) SSS।।।।S।S।SS

मञ्चिता नित कविता **प्रहर्षिणी** ही
जी वाटे मधुरतरा जगांत तीन्हीं
या लोकीं तरि विषयादिकांत कोठें
सौख्याचा कण तरि एकही न भेटे ॥१॥

---

१ आनंदिता.

जे कोणी जगिं रमती, रमोत मोदें
मी जो कां जगत तरी जगे विनोदें
तत्सौख्यीं अनुभव नित्य येत त्यातें
तोंडानें म्हणति सुधाच कारल्यातें ॥२॥
केव्हांही कटुतर मात्र जो जगाचा
सर्वांना पटत तरी खुले न वाचा
सौख्याचें जगत असें मुखें म्हणावें
भोगावा विषमपणा सदा स्वभावें ! ॥३॥
जाणोनी जरि मरुभूमि[1], तोयं[2] शोधी
कष्टोनी थकत जवेंच[3] तो यशोधी[4]
सौख्याचा निधि असतो स्वयेंच आधीं
जाणे जो जगिं सुखदायकें उपाधी ॥४॥
कोणीही सुख म्हणतां मुदें वदे तोः—
'भाग्याचे नर ! सुख ज्यास देव देतो'
ठावें हें मज कविताच काय जी ती
त्रैलोक्यीं विचरविते धरोनि हातीं ॥५॥
आहेकां प्रभुविण विश्वि काय कोणी ?
गातो मी अविरत तेच आयकोनी
जाणोनी शरण जगत्पतीस जावे
केव्हांही हृदयिं धरावया सजावे ॥६॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार फा. व. ९ शके १८५० ]

---

११० वें वृत्त—मंजुभाषिणी.(९१ वें कनकप्रभा. १०७ वें प्रबोधिता.११५ वें सुनंदिनी.)

"मंजभुाषिणी" क. क्र. ९८ पहा!

---

१ वालुकामैदान. २ पाणी. ३ वेगानें. ४ यशनिधि.

## क. क्र. १०३ " टाहो"

१११ वें वृत्त—मत्तमयूरी(४+९ = १३ म त य स ग) SSSS-S||SS||SS

द्वंद्वाच्या या काहिं जुमाने नच—पूरा
वाटे माझ्या हेंच मनोमोहमयूरा !
साधावें ते मत्वीरं सौख्यादिक सारे
साधे कां तें ? फोडित टाहोच विचारे ! ॥१॥
जेव्हां तेव्हां बांधि मनाचाच मनोरा
योजी त्याच्या स्थाइकतेला मग दोरा
थोडें चाले तोंच अडें की मम घोडे
मोडे, तेव्हां एकचि टाहो मग फोडे ॥२॥
वाटे-यावी अंबरसंपत्तिहि सारी-,
घेण्यांजाई उंच अशी तीव्र भरारी
जाऊं ना दे हा जड ऐसा तनुकारा
फोडी तेव्हां संतत टाहोच बिचारा॥३॥
वाटे जेव्हा याच अहंकारमयूरा
सर्वांमध्यें सुंदर माझाच पिसारा-,
टाहो फोडी पाहुन पायास बिचारा
वाहूं लागे संतत अश्रूंच्या धारा ॥४॥
व्योमीं जेव्हां पाहतसे हा घन अभ्रां
तेव्हां याचा काय बघावा मग तोरा !
नाचे नाचे काय उभारोनि पिसारा
खालीं पाहे गर्व गळे कीं मग सारा ॥५॥
हृद्व्योमीच्या ऐकुनि आशा-स्तनितातें
होतें ऐसें कीं, मग मोठें सुख त्यातें—
थै थै नाचे काय तऱ्हा ज्या मग होती
सांगाव्या त्या कोविं ! कवी लाभुनि जाती !॥६॥

फांतेला कीं बोलवि शोभा बघण्याला
डौलानें ती धांवत येतां सदरेला–
तो नेत्राश्रूं गाळि, मयूरी जवळी ती-
घाईनें कीं तोंच टिपूंलागत मोती ॥७॥
होते इच्छा-याविच विद्या मज सारी–
दारिद्र्याची कीं-असिपुत्रीच दुधारी–
मध्यें येतां आडचि–जाते जवं दूरीं
टाहो फोडी दीनपणें मत्तमयूरी ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार पौ. व. १३ शके १८५० ]

---

क. क्र. १०४ "चिररुचिरा"

११२ वें वृत्त—रुचिरा(२) ( तेरा अक्षरी. ४+९ = १३) ।ऽ।ऽ-॥॥ऽ।ऽ।ऽ
ज भ स ज ग

कधीं गमे चिररुचिरा स्वकल्पना
पुनः पुनः नच रुचतें परी मना
नवोनवा न अनुभवूं शके कुणी
सुवेश कीं नव धरि तीच ती जुनी॥१॥
सुकल्पना कुणि न करूंशके जरी
वरीवरी तरिहि तिथें रमे वरी
कधीं कधीं लवभरि वाटली जरी
सुशांति ती चिररुचिरा गमे खरी ॥२॥
जुनाच कीं अनुभव, तोच तो पुन्हा
तयांत जें सुख पटलें असें मना

---

१ मधुर २ दीर्घकालिकमधुर.

प्रभो ! अहा ! अविरत एक शांति ती
मिळेल कां चिररुचिरा तशी मति ! ॥३॥
बये ! तुला विनवित एक दीन हा
जळे सदा धगधगतों तरी पहा-
अजूनिही जगातें असे तुझ्यास्तव
तसें नव्हें-मज जगत्री तुझास्तव ॥४॥
अतांच दे सुख मजशीं कितीतरी
करीत जें स्तवन तुझें ममांतरीं
जगासही सरिषप वाटते गणूं
तुलाच कीं चिररुचिरा असें म्हणूं ॥५॥
लवैक हें पदनख पाहतां तुझें
अतां तिथें मधुतर कल्पना रिझे
सुधेसही कधिं कधिं लाजवी अशी
तुझ्यापुढें विरमलि आज दिव्यशी ॥६॥

शालीबंडा हैद्राबाद द.
फा. शु. ७ शके १८५० रविवार ]

---

क. क्र. १०५ **प्रभो ! अतां हुडकुं तुला कुठें तरी !**

११२ वें वृत्त—*रुचिरा(२) (तेरा अ. ४+९ = १३) ।S।S-।।।।S।S।S
जभसजग

धरेवरी, नभिं, विदिशीं, दिशांतरीं,
वनीं, जनीं, नगरिं, शिवालयीं, घरीं,
फुलांवरीं, गिरिशिखरीं, जलीं, तिरीं.
**प्रभो ! अतां हुडकुं तुला कुठें तरी ॥१॥**

---

१ मोहरी. *रुचिरा वृत्त दोन प्रकारचें आहे. "रुचिरा (१)" आठ अक्षरी तर "रुचिरा (२)" तेरा अक्षरी आहे.

जिथें तिथें मम मन तीव्र धांवतें
फिरूंहि दे, परि न रमूंच दे तिथें
पदोपदीं पुढति विकार ओढितो
क्षणोक्षणीं परत विचार खेंचतो ॥२॥
कुठें तरी हृदय न दे कुणा, कधीं
कुणी तरी घुसळुं बघे तिथें मधीं
सुऱ्या, शरे खुपशितसे तरीहि तें
अजूनिही न डगमगेच-सोशितें ॥३॥
दयानिधी, प्रभु जगतास पोषितो
कळे, पटे-जरि नयनें न पाहतों
स्तुती तुझी सतत जगांत ऐकतों
कसें बसें अविरत गात राहतों ॥४॥
जुनें, नवें—नमिं, जगतीं-दिसे जरी
उदात्त ते रस भरिती ममांतरीं
तुझींच कीं अतुल, अशी प्रभाच ती—
म्हणूं धरा जरि सुषमा प्रभावती ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार पौ. कृ. १२ शके १८५०

---

क. क्र. १०६ "मुलें"

११२ वें वृत्त—रुचिरा (२) (तेरा अ. ४+९ = १३) ।ऽ।ऽ·।।।।ऽ।ऽ।ऽ
ज भ स ज ग

कुठेंहि कीं तमाचि, नसे जरी प्रमा
सुशोभवी रवि, शशि, तारका, नभा

---

१ सुंदर, उत्तम शोभा.

जयाघरीं न छबुकलें खुलें तसें
प्रभा नसे कनक कितीजरी असें ॥१॥
जिथें तसें शिशुमुखपद्म कीं हंसें
प्रभा वसे, अविरत रत्नदीपसे—
सुरम्य तें सुम, फुलपाखरें जरी
तयावरी, झुलत तशीं मुलें घरीं ॥२॥
झरा जसा झुळुझुळु मंद वाहतो,
पळावयां दुडुदुडु बाळकास, तो
धरोनियां करिं, शिकवीत सांगतो
गमे जणूं जनक समान एक तो ॥३॥
तयास कीं विधुवदनाच आइ, ती
हंसावया शिकवितसे प्रभावती
तरी दिसे कधिं शशि, सारितां कचा
सुखास त्या नच तुलनाच कीं तिच्या ॥४॥
पिकाहुनी मधुतर ऐकतां वचा
सुधाच कीं श्रवणिं पडे अहा ! तिच्या
सुधाच कां ? सुरतरु बालकांमुळें—
सदा वसे सदनिं अहा ! फुले, फळें ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार पो. व. १२ शके १८५०

---

क. क्र. १०७ "विभावरी*"

११३ वें वृत्त—विभावरी (तेरा अ. य. पा. न भ ज ज ग) ।।।ऽ।।।ऽ।।ऽ।ऽ

करुन दे मजशि वृत्ति विचारही
कधिं कधीं पुरवि लाड-न चारही

करुंच लागलि अतां हट फार हीं
अधिक काय-करिते व्यभिचारही ॥१॥
मन वसें जवळिं चावट कारटें
शिकवि प्रेम तिजला हळुं चोरटें
चटकरोप लव लावुनि दे अधीं
न कळतांच मग खोल रुजे मधीं ॥२॥
उपवनीं फिरविते, नगरीं कधीं
खुलवुनी करित वर्णनही मधीं
बरळतेच भलतें भलतें असें—
भुरळ पाडिताचि मोळिस नेतसे ॥३
मग जधीं मिळत सांधि तिला भली
चुकवुनी मजशि-जाउंहि लागली
कधिंहि प्रेम करण्यां न शिके मुळीं
अधिंच प्रेमकलहीं रमुं लागली ॥४॥
जरि तिला वरिवरी अति आवरी
मम मुळींच नच कीं वच आदरी
कधिं कुठें कधिं कुठें नित डुंकिते
निसवलीच नच अल्पहि शंकते ॥५॥
नच उपाय लव काय हंसूं ? रडूं ?
विषयनाद सुटण्यां जरि हांसडूं !—
न उरलेंच करणें भलत्यापथें
भिवविती मज विकार-वृथा भुतें ॥६॥
वसाशें एक पति तूं जगदंतरीं
परि न ठेवि पतिभक्तिस अंतरीं
सदुपदेश कसचा मग आचरी
उघड ही म्हणवि आज **विभावरी** ॥७॥

तव अनंत असतीं स्वरुपेंहि तीं
म्हणविशीं तरिच योग्य-जगत्पती—
जगत कीं सहज होउं शके जरी
पति अनेक करुनींहि सती खरी* ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार(अपररात्रौ)पौ. व. १४ शके १८५० ]

---

११४ वें वृत्त—सिंहनाद. ( १०० वें कलहंस. १०१ वें कुटजा. १०६ वें नवनंदिनी. १०८ वें प्रभावती. ) तेरा अक्षरी.

"सिंहनाद" क. क्र. १०० पहा !

---

११५ वें वृत्त—सुनंदिनी. ( ९९ वें कनकप्रभा. १०७ वें प्रबोधिता. ११० वें मंजुभाषिणी. ) तेरा अक्षरी.

"मंजुभाषिणी" क. क्र. ९८ पहा !

---

क. क्र. १०८ "मागणी"

११६ वें वृत्त—अपराजिता (चौदा अ. ७+७ = १४) ||||||S|S||S|S
न न र स ल ग

स्मरहर-शिव बा ! भवा ! अपराजिता !
विधि हरि वरदा उमेश जगत्पिता !
गजमुखजनका ! वृषध्वज, धूर्जटे !
वद परवशता स्वपांग कधीं फिटे ? ॥१॥
त्रिभुवन वदतें-तुला विनवावया
जप, तपहि नको वृथा करणें वया

---

*प्रकाशनस्थल व काल—तत्वज्ञानमंदिर जाने० १९३० अं. ३ पौ. श. १८५१. १ शंकरा ! २ एकरुद्र ( अकरांपैकीं )

सहज विनवितां हेतां शमवावया
लगबग धरिशीं निवारिशिही तयां ॥२॥
खडतर दुरितें त्वरें हरवावया
ज्वलित हृदय जें तया निववावया
द्रवुनि करिशिं कीं दया सदया ! **शिवा !**
क्षणहि धरवते न धीर **उमाधवा !** ॥३॥
जगद्हितकरा ! न कां बघशीं जरा
त्यजिति शुकहि कीं स्वभारतपंजरा
गरुड न अजि घे भरारि लवैकही
करित नच दया तयावरि कोणिही ॥४॥
शुभद धवल हा यशध्वज जो नभीं
सतत फडकतो तुझा-विभ्रिते न भी
हरिशिं लव नुरे खरेंच-हृदापदा
म्हणुनि मन म्हणे तुला विनवूं सदा ! ॥५॥

मैलाग्देवपल्ली हैद्राबाद द.
शनिवार(प्रातौ) महाशिवरात्री शके१८५० ]

---

क. क्र. १०९ "दुःख"

११७ वें वृत्त--असंबाधा (चौदा अ. ५+९ = १४ ) SSSSS-IIIIIISSS
म त न स ग ग

मोठ्या कष्टानें मिळतहि असतें मोठें
थोड्याही कार्या नच करुं शकती थोटे
मोठे ते मोठे मिळविति यशही मोठें
थोटे ते थोटे, नसतिच मुळिं त्यां बोटें ॥१॥

---

१ भाग्यहीनां.

दुःखें कां येती—सहन करि न जो त्याला?
दोरीनें कां तो जखडत गज जोत्याला?
जातीचा जो कां तरिच नच हिरा भंगे
आघाता सोशी शिणत कर घणासंगें! ॥२॥
सौख्यांचीं स्वप्नें तरिच पडत-जो झोपे—
शांतीच्या झोपां? नच कधि मिळणें सोपें!
कष्टावें जेव्हां दिनभरि-लव लागे ती
भाग्याचे मोठे पडताचि झाणीं जे घेती ॥३॥
सोसावें थोडें कठिण, कठिण हें मोठें
जो बोले 'सोसूं कठिणतरहि'तें खोटें
यत्नानें येते भरुनि जखम ती कैची!
जी ह्रद्वेदी—ती नच वदवत केव्हांची! ॥४॥
राहोनी पोटीं घडत न ह्रदयां भेटी
दुःखीजीवाची असलिच असती रीती
**तोंडाच्या गोष्टीं** उपजत-मरती ओठीं!
चित्ताच्या गोष्टी शमति तरि चितेपोटीं! ॥५॥
दुःखाच्या गोष्टीं भिवविति अति त्या भीत्या
सौख्योन्मत्ताचें ह्रदय चिरित जाती त्या
प्रेमानें घ्यावें—पचत न, भलत्यां खाते!
भाग्यें भोगावें अविरत मग दुःखातें ॥६॥

शालबिंडा हैद्राबाद द.
शुक्रवार पौ.कृ. १४ शके १८५०]

## क. क्र. ११० "स्वातंत्र्य"

११८ वें वृत्त–उद्धर्षिणी
–१२५ वें ,, मधुमाधवी
–१२७ वें ,, वसंततिलका
–१२९ वें ,, सिंहोद्धता
–१३० वें ,, सिंहोन्नता

} चौदा अ. य. पा. SSISIIISIISISS
त भ ज ज ग ग

**स्वातंत्र्य** हें सकलसौख्यनिधान लोकीं
कैवल्यरूप बुध यास सदा विलोकी
श्रीमंत वा अति अकिंचन तो असो कीं
**स्वातंत्र्य** तें प्रिय असे सकलां स्वलोकीं ॥१॥
**स्वातंत्र्य** यास नगराजसमान मान
नाहीं स्वतंत्र मनुजा कसलींहि वाण
नाहींच कीं त्रिविधतापउपाय आन
**स्वातंत्र्य** हेंच जगिं औषध रामबाण ॥२॥
**स्वातंत्र्य देवि** मधुहास्यमुखें निघाली
जे कष्ट घेति, असल्यां सुमहार घाली
ग्रीवा सुशोभन करी मिळवोनि यत्नें
अम्लान अक्षर चतुर्दशपद्यरत्नें ॥३॥
गेले दुरी दुरित सर्व अम्हां जनांचे
हर्षातिरेकहृदयें **यश** आज नाचे
"**स्वातंत्र्य** हक्क मम" हें कळल्या न शोक
"स्वातंत्र्य" हाच मनुजा ! निज मंत्र घोक ॥४॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार आश्वि. ३० शके १८४९ ]

## क. क. १११ *"साहित्य सेवक"

११८ वें वृत्त–उद्धर्षिणी
–१२५ वें ,, मधुमाधवी
–१२७ वें ,, *वसंततिलका
–१२९ वें ,, सिंहोद्धता
–१३० वें ,, सिंहोन्नता

१४ अ. य. पा. SSISIIISIISISS
त भ ज ज ग ग

स्वर्गी न हांव मज लौकिक, थोरवींची
उच्चत्व आयु, बल-सांगतसेच-वींची
होतात उंच नच तोंच पुनश्च खालीं–
जातात, अस्यहि न भोग तदीय मालीं ॥ १ ॥
जी माय माउलि असे अतुला स्वभाषा
सेवा घडो लव तिची-इतकीच आशा
नाहीं कवित्वबल, संस्कृत येत नाहीं
विद्या न बुद्धि, तरि हांव असे सदा ही ॥२॥
पावित्र्य ? छे ! प्रखर रश्मिच त्या पहाना !
जें दिव्यतेज बघण्यांतहि होत दैना
प्रक्षाळितां चरण अश्रुजळें तिचे ते,
भाषाशिरीं सुमन वाहति धन्य हो ! ते ॥३॥
कांहीं नसोनि उगिही बसवें न अल्प
नाहींच कीं मति तरी करितो विकल्प
हा पांगळा उपजता जरि खास आहे–
डोळे करोनि तिरवे अरुणास पाहे ॥४॥

---

*वृत्तदर्पणकारानीं या वृत्ताच्या लक्षणेंत 'यति पादांतीं' असें लिहिलें आहे. गीर्वाण लघुकोशांत मात्र ८,६ अशी लक्षणा दिली आहे. पण छंदोमंजरी'आणि 'समग्रपंत ' या दोहोंत यति पाळला गेला नाहीं. तोच अनुवाद येथें केला आहे. १ लाट.

ज्याचा प्रवास अजुनी सुरुंही न झाला
एव्हांच कीं थकुनि हा किति लाल झाला !
ढाळोनि घर्म-द्रवबिंदु अतांच ऐसें—
भूमी भिजे, वरि निराळें उषाहि हांसे ॥५॥
आरण्य दूर, अजुनीं सरलीं न शेतें
धैर्ये जणूं गिरि परी खचलेच येथें
जे कां महत्व मिळण्यां श्रमले पथीं या
माना तदीय पडल्या मुरगाळुनीया ॥६॥
मारून वा मुटकुनी मलत्या शिरीं कां—
साहित्यसेवक असा उमटेल शिक्का !
हें सर्वही कळतसे-वळतें न तें कां
सांगाल कां-कधिं फुका सुटणार हेका ? ॥७॥
विद्याधनास हृदयीं नित आठवीतों
स्वप्नांत विभ्रमदशें लुटण्यास जातो
संपादनश्रम मुळीं नच शक्य वाटे
जेथें दिसे विपुल, तें आति लोभ दाटे ॥८॥
कित्येक भक्त नवशब्दसुमौक्तिकानीं—
भाषेस भूषविति आज विभूषणांनीं
हिंदी तशीच कधिं उर्दुहि फारशी ही
चित्तीं तयां गमत चोरि न फारशी ही ॥९॥
श्रीमंत, थोर(?) आति थोरहि भाग्य त्यांचें
कौतूक देश करितो नवधाडसाचें
आम्हींहि वंदित असों दुबळ्या करांचे
अत्युच्च त्या शिखरिं हें परि केंवि पोंचे ! ॥१०॥
मत्साम्य जे शतदरिद्रि कितीकपुत्र
नांवास अंचवुनियां—इह ना अमुत्र

काहीं न साधिति, वृथा-परि कष्टताती
पावित्र्यखूळ धरिती, महती न कीर्ती ॥११॥
कोठें भिकारि न असा दुसरा दिसेल—
जाळी भुकेसहि परी नच मागवेल
नाहीं कधींच दुसऱ्याघरिं चित्त जाते,
'झोळी कशीतरि भरावि' मनीं न येते ॥१२॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
गुरुवार मा. व.११शके १८५०

---

क. क्र ११२ "**सिंहावलोकन**"

११८ वें वृत्त उद्धार्षिणी
—१२५ वें ,, मधुमाधवी
—१२७ वें ,, वसंततिलका
—१२८ वें ,, सिंहोद्धता
—१२९ वें ,, सिंहोन्नता

चादा अ. य. पा. SSISIIISIISISS
त भ ज ज ग ग

पाही न अल्प परतोनि उदारचित्तें
जें कां अधीर मन, तीव्रचि धांव घेतें
ठेंचाळतें क्षण न थांबलियां त्वरें तें
**सिंहावलोकन** अशासचि सांवरातें ॥१॥
जेव्हां पुढेंच बघुनी रवि धांवताहे
पुष्पादि होरपळती परि त्यां न पाहे
तो जीवनास फिरुनी जणुं घालिताहे
**सिंहावलोकन** अहा ! मधु चांदणें हें ॥२॥
नीलांबरावरि अहा ! धवलप्रसून
कीं पाहती फिरुनियां जगता हसून

पाहे शिशूहि गगनास जसें इथून
**सिंहावलोकन** सदा घडतें म्हणून ॥३॥
ध्येयें निराशातिमिरीं दडलीं कितीं तीं,
श्रेयें तशींच तृषितस्थितिमाजि होतीं
प्रेयें–कितीं हरपलीं! दिसलींहि मातें
**सिंहावलोकन**चि घालित अंजनाते ॥४॥
सौवर्ण्य रौप्य असले किति मुद्रिकेते-
राजे गजावरुनि जे उधळीत होते
दृश्यस्मृती तशि जुन्याहृदयास होते
**सिंहावलोकन** असे कधिंकाळिं हो! तें ॥५॥
श्रीमंत तेच गज, वाजि गणोनि खूळ–
मोटारितून निघती उधळीत धूळ
जी हेमवृष्टि सकलांवरि होत होती
**सिंहावलोकन** अतां पडल्यास! माती! ॥६॥
प्रत्येक पाउलतलीं किति एक जीव–
जीवास व्यर्थ मुकले–परि ये न कींव
पाहे फिरोनि जव तें तंव चित्तिं आलें–
**सिंहावलोकन** मिषें मज सावरीले ॥७॥
मात्रा कितीक सुटल्या, किति एक शून्यें–
कोठें तशींच सुटलींत विरामचिन्हें–
तें योग्यलेखन तदा म्हणवी, मधून–
**सिंहावलोकन** घडें तरि होय पूर्ण ॥८॥
घाईमुळें घडलियां अपमान कांहीं
अल्पावकाश म्हणुनी जरि दोष नाहीं.-
तें सावचित्तहृदयें मनिं आठवावें
**सिंहावलोकन**मिषें चित सावरावें ॥९॥

कोणांस कीं दुखविलें ! कधिं ! काय झाले ?
आव्हेरिलें जरि असेल कुणास कालें
कोठें बरें ! कधि ? कसें ! चुकलें कशानें
**सिंहावलोकन** सुधारिल त्यास यत्नें ! ॥१०

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार आश्वि. शु.११ शके १८५० ]

---

क. क्र. ११३ **"मानव्य"**

११९ वें वृत्त—कुटिला
–१२६ वें „ मध्यक्षामा ] चौदा अ.४+१० = १४ SSSS-॥॥॥SSSS
–१३१ वें „ हंसश्येनी — म भ न य ग ग

**मानव्याला** उमजुनि जगतीं जो वागे
देणें, जाणें, कधिंहि नच कुणा तो मागे
ज्याला त्याला सतत सुखविणें हें ठावें
कैसें त्याने स्वहित निज दुजें मानावें ! ॥१॥
**मानव्याची** महति तरिच लोकीं आहे
जो प्रेमानें अविरत जनतेला पाहे
धन्यत्वानें कुणिहि मग तया वाखाणी
आतेष्टत्वें सकल बघति आनंदोनी ॥२॥
**मानव्यानें** सकल जगत होतां येते
एकोप्यानें विचरुनि सुख देती नेते
एकत्वाचें सहज उलगडे कोडेंही
मोक्षालाही मिळवि जरि वसे या देहीं ॥३॥
**मानव्याला** विसरुनि नर दैन्यां याची
जीं जीं कृत्यें करित, सकल तीं पापांचीं

ऐश्वर्यानें मिळवि उलट अंधत्वाला
ना स्वार्थाच्या पुढति दिसत कांहीं त्याला ॥४॥
मानव्याचें कळुनि सहज येतें वर्म
तच्चित्ताला चिकटुनि असतो सद्धर्म
उच्छेदाची चुकुनि मनिं न होई इच्छा
क्षुद्रत्वें तो नच करि परक्यांची पृच्छा ॥५॥

मु. प्रभासक्षेत्र ( सोमनाथ )
सोमवार ज्ये. व. १४ शके १८५३

---

क. क्र. ११४ "प्रमदा"

१२० वें वृत्त—कुररीरुता ] ६+८ = १४ ||||S|-S|||S||S
-१२२ वें „ प्रमदा ] न ज भ ज ल ग

निजजनकास तोषवितसे प्रमदा[1]
स्वपतिस देह हांच नवसौख्य सदा
नवशिशु आणि बालकहि खेळविते
विविधसुखास ती परि अधींच वितें ॥१॥
श्रितजनिं तेविं सेवकजनींहि यदा
विचरवितेच आदर तसेंच मुदा
म्हणुं जरि 'हीच योग्य जगिं, मातृपदा'
तरिच गमेल सार्थहि तदा प्रमदा ॥२॥
प्रमुदित होइ देउनि दुजास सुखा
पसरविण्यास शांति सुख ही प्रमुखा
अवतरतेंच देवि जणुं ही प्रमदा
उलट शशीस हर्षवित—कां न वदा ? ॥३॥

---

१ तरुण व सुंदर स्त्री. २ धनी.

रुचिर निसर्गमूर्ति जगतीं दिसते
मधुरतराहि दिव्य वसुधा वसते
जननि, अपत्य, सद्भागिनि ही **प्रमदा**
विविधपणांत भंगहि न येच कदा ॥४॥
कळत न होत काय म्हणतां '**प्रमदा**'!
फिरवित शब्दभाव मनिंचा कितिदां
समजत नाहिं ते बिघडतेंहि कुठें!
चुकवित तोच भाव असतोच हटें ॥५॥
जगिं वनिता नृ वाचक विशब्दकला
गणुं अम्हिं मातृ वा जनक त्यां सकलां
न चळत सर्व दिव्यसुखसार अहा!
वसत विशाल मातृपदिं विश्व पहा! ॥६॥

**मैलारदेवपल्ली, हैद्राबाद द.**
**मंगळवार(सकाळीं)फा.शु.१ शके १८५०]**

---

क. क्र. ११९ "**मंजरी**"

१२१ वें वृत्त—**पथ्या** ] चौदा अ.५+९ = १४||SIS-|||SISSIS
–१२४ वें „ **मंजरी** ] स ज स य ल ग

(या बागेंत येऊन एकुणवीस दिवस होताहेत तरी एकदांहो कोकिला-कूजन ऐकूं न आल्यावरून.)

**सहकार** हा बहरवीतसे **मंजरी**
विटपां तसें परिसरास **पथ्या** जरी
परि कोकिला करि न कूजना त्यावरी
मन दुर्मुखें म्हणुनि दुर्विपाका वरी ॥१॥

---

१ पृथ्वी.

नच चित्तही व्यथितसृष्टिमुद्रा सहे
मन आटवी उलट हृत्स्हुद्रास हें
आजि नाच दे विकसवूं यशोभाव धी
मुळिं नायकें उलट सर्व शोभा वधी ॥२॥
तुम्हि इच्छितां भरुनि काढण्यां न्यून कां ?
श्रमतां वृथा तरिच बा ! खगानों ! नका—
बसुं, या शिखीं, करुनि यत्न आणा पिका
तरि या इथें, मग खुशाल भोगा सुखां ! ॥३॥
समजावुनी करुनि कायवाटेल तें
पिक दाखवा मजशिं एकदां या इथें
नच कीं घडे, उडुनि जा च, येथें नका
निकषा कधीं पितळ होंन लागेल कां ? ॥४॥
नच रोष हा - विनति—ईस ऐका बरें !
झणि स्वस्थ व्हां, किलकिलाट आतां पुरें
करुनी न ध्या अधिक शोभना याहुनी
समजा मनीं उडुनि जा कसें येथुनी ॥५॥

* * * *

खगवृत्त हें समजलेंचना विस्तृतें ?
तरिही पुन्हां बहरतेस कां गे, लते ?
**बघ साचले मम दृगंबुकासार तें**
नच ठाउकें, तरि विचार सांगल तें ॥६॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
महाशिवरात्री(मध्यरात्र)शनिवार शके १८५० ]

---

१२२ वें वृत्त—प्रमदा ]
—१२० वें „ कुररीरुता ] क. क्र. ११४ "प्रमदा" पहा !

---

## क. क. ११६ नवशिशु.

१२३ वें वृत्त प्रहरणकलिता (७+७ = १४) ||||||S-|||| ||S
न न भ न ल ग

सुवसित अनिलें शुभवच कथिलें
'नव सुम खुललें उपवन हंसलें
वनहि विनटले, सदनहि फुलले
सकल बदलले नवरङ्ग गमलें ॥१॥

लचकति लतिका फुलवित कलिका
करि जणुं अधिका स्तिमितचि पथिकां
अभिनय नव तें, अभिनव गमतें
जग सुखिं दिसतें, त्रिभुवन हंसतें ॥२॥

डुलवि तरुतती द्रुत अनिलगती
प्रमुदित दिसती, जनमन हरती
मधुकर पळती कमल हंसवितां
जरिहि शमित ती हंसत वसुमति ॥३॥

उपवनलतिका हळुं हळुं सरल्या
**नवशिशु** बघण्दा सहसित दिसल्या
शशिमुखि कसल्या ? शशिच चवथिच्या
हंसत हंसत या—जवळिंच जमल्या ॥४॥

गरगरित असा मधु शशि मधला
बघुनि चिमुकल्यां खदखद हंसल्या—
पसरुनि धरिती मृदुकरकमलां
कुतुहल करिती—तरि शिशु दमला ॥५॥

**नवशिशु**जननी स्वकरिं उचलुनी
वरिवरि धरुनी मुख शिशुवदनीं

त्रिभुवन गणुनी निरखित हंसुनी
चमकत मधुनी लव जल नयनीं ॥६॥
मधु सुमनिं वसे, नय नयनिं दिसें
जननि जसजसें स्वकरिं धरितसे
सुख हृदिं विलसें, स्मित अधरिं वसें
मिळत फल असें कितितरि नवसें ॥७॥
बहुविध कुतुकें करिति जन किती
तरि न लव दिसे स्तिमित-अविकृति
बघत न इकडे चुकुनिहि जगतीं
निरखित असतो सतत नभपथीं ॥८॥
जनक न जननी उमजुनि उमजुनी
समाचि समजतो सकलजन मनीं
टकमक बघतो जनमुख भिउनी
तरिच दचकतो वरिवरि मधुनी ॥९॥
अमर, अज असें सुखमय जग तें
हुडकित जणुं तें निजसदन तिथें
अनिमिष नयनीं निरखुनि बघतें
म्हणुनि न अवनीं शिशुमन रमतें ॥१०॥
निज सदन खरें म्हणुनिच वरती—
बघत सतत तें त्यजुनि जडमति
उगिच जगति जे जन, नित फसती
सुख न लव तरी भवपदिं मरती ॥११॥
अजर, अमर, जी स्थिति अनुभविली—
त्यजुनि, चुकुनि जे पडत जगतलीं
निज अनुभव कीं नयनिंच वदतें
नच जरि वच तें परि मनिं पटतें ॥१२॥

पद जगिं पडतां प्रथमाचि रडलें
असुखचि गमलें, मन हिरमुसलें
क्षणिक अनुभवें स्वमत ठरविलें
म्हणुनि चिमुकलें अजुनि न हंसलें ॥१३॥
अनुभवि अम्हि कीं स्वसुख विसरलों !
विषयसुखजलीं लव नच तरलों !
अविरत रतलों भवतालें दडलों !
विषममयभवीं सतत थिनटलों ! ॥१४॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार आश्वि. व. १ शके १८५१]

---

१२४ वें वृत्त—मंजरी १२१ वें.(२ पथ्या)चौदा अ. ५+९ = १४
क. क्र. ११९ "मंजरी" पहा !

---

१२५ वें वृत्त—मधुमाधवी. ११८ वें (२ उद्धर्षिणी) १२७ वें (३ वसंततिलका ) १२९ वें ( ४ सिंहोद्धता ) १३० वें ( ५ सिंहोन्नता. ) चौदा अक्षरी य. पा.

क. क्र. ११० स्वातंत्र्य १११ "साहित्यसेवक व ११२ "सिंहावलोकन" पहा !

---

१२६ वें वृत्त—मध्यक्षामा (११९ वें ( २ कुटिला) १३१वें ( ३ हंसश्येनी. ) चौदा अक्षरी ४+१० = १४
क. क्र. ११३ "मानव्य" पहा !

---

१२७ वें वृत्त—वसंततिलका. ११८ वें (२ उद्धर्षिणी.)१२५ वें( ३ मधुमाधवी.) १२९ वें (४ सिंहोद्धता. ) १३० वें ( ५ सिंहोन्नता . चौदा अक्षरी य. पा.

क. क्र. ११०,१११,११२ पहा !

## क. क्र. ११७ "वासंती"

१२८ वें वृत्त—**वासंती** १४ अ. य. पा. SSSSS।।।।SSSSS म त न म ग ग

उद्यानीं एक्यादिनिं फिरतां वाटे, मागें—
हेतूपूर्णत्वें कुणिं मजला खेंचूं लागे
औत्सुक्यानें जों बघत—दिसे ती वासंती
होती आनंदें खुलतहि जी कां **वासंती** ॥१॥
फांदी ती होती अडवि तिची जी कां मातें
वाटे सांगूं इच्छित मज कांहीं कामातें
कांहीं पुष्पें तीवरिं खुललीं होतीं, कांहीं
आता कीं तेंव्हांमधिं, खुलण्याच्या मार्गींही ॥२॥
छोटी मोठी दावित असतां रम्याधिक्य
तत्पुंजामध्यें लघुकलिका होती एक
कांहीं बोलूं इच्छित मजशीं-वाटे ऐसें
त्यायोगें मीही क्षणभरिं थांबेही तैसें ॥३॥
उत्कंठा मोठी दिसुनिहि आली तद्दोष्ठीं
सांगायाच्या मानसिं किति होत्या गोष्टीं
वाटे मच्चितां मुख उघडेना कीं आतां
येऊं उद्यांही फिरुनि इथें ऐकाया त्या ॥४॥
गेलोंही तैसा द्वितियदिनीं तों ती जाई
बोले कांहीं अस्फुट—जवळीं मीही जाई
पाहे तेंव्हां तोंडहि उघडें झालें होते
ओठाच्या आंदोलनिं वच ऐकूं आले तेः— ॥५॥
"आलां कां तुम्हीं ! रसिकवरांचेही राजे !—
जाणें मी तुम्हां तरि म्हणणें माझें साजे
छे हो ! ही माझी जिभलि कशी मेली दुष्ट
कांहींचेंबाहीं बडबडते, जें ना इष्ट ॥६॥

आई पाहे जी रसिकवरांना येतानां
सांगे ती "येण्या फुरसतही लागे त्यानां
सायंकालीं स्वच्छ बघुनि आकाशप्रांतीं
कोणा कोणा घेउनि कधि येती सांगाती" ॥७॥
वाटे आहां सत्कवि अथवा दुःखी कोणी
प्रातःकालीं जे तुम्हि सुखशय्या सोडोनी–
संगे नाहीं कोणिच तरिही आला आहां
तेव्हां निःशंकें म्हणुं ? जगिं मी धन्या आहां ! ॥८॥
आला होतां कालहि—मनिं सांगावें ऐसें–
आले होते फारच, परि बोलावे कैसें–
नाठावें तें जन्महि नुकता झाला होता
जेकां चित्तीं पोटभरुनि बोलूं आतां ॥९॥
सांगा आतां हो ! कशि दिसल्ये मी आरामीं ?
माझ्या सौगंधा पवनहि ने उच्चव्योमीं
नक्षत्रें तेथें चमकत रात्रीं जी होतीं
मत्सौंदर्याच्या मधुसदृशें होतीं कां तीं? ॥१०॥
ज्या फांदीची मी कितिमधु ? ज्याची ती आहे–
त्या आरामींही अविरत शोभा जी राहे
ज्याच्या योगानें टवटवि ये ऐसें पाणी
अल्पत्वें कोणी बघितलि कीं एके कानीं ? ॥११॥
आलों तेथोनी परतहि सारे ऐकोनी
गेलों मी जेव्हां क्षितियनिदीं--ते पाहोनी
आले मन्नेत्रीं जल भरुनी ते सिंचोनी
पाहूंलागे तों दिसलि परी कोमेजूनी ! ॥१२॥
ऐकूं आले खोल अति हळूं ती जे बोले
जाणोनी भावा श्रवणहि सान्निध्यीं नेले

"कां जाईबाई ! " वदताचि मी होतो तेव्हां
होवोनी तीं आपण म्हणते"आ--ला--के--व्हां ? ॥१३॥
झाल्ये मी ऐशी ! वदुं तरि कैसे ? कां कोणा--
विश्वासोनी ज्यांवरि बसल्ये त्यानीं दैना--
माझी ही केली असलि असो--आतां येत्यें
ठेवा माया, लोभ मजवरी--सांगूं कां ते ! ॥१४॥
थांबा ! ऐका ! दोनचि घटिका नाहीं जास्ती--
मंदायुष्याची अधिक नसे येथें वस्ती
आलांही वळेंवर तुम्हि आले जे ओष्टीं
घ्या त्या ऐकोनींच अनुभवाच्या ज्या गोष्टी ॥१५॥
ही माझी आई--इतर अपत्यानंदानें
पाणीही नाणी लव नयनीं मच्छोकानें
माझा बाबा वायुहि-विचरे स्वच्छंदानें
वाटे तेथें धांवत फिरतो सोसाट्यानें ॥१६॥
नाहीं कोणी एकहि जगतीं कोणाचाही
जो तो पाहे सौख्यचि अपुलें ज्या त्या ठायीं
दु:खाचे थोडे दिसाति तरी तुम्हां ऐसे
त्यायोगें होतें लव हलके जें ना सोसे" ॥१७॥
माझ्यानें कांहीं नच बघवे, अश्रू आले
वाहूं लागोनी मम कपडे झाले ओले
मोठ्या कष्टानें परत फिरे, साऱ्या रात्रीं
मोठीं मोठीं भीषण जमलीं स्वप्नें नेत्रीं ॥१८॥
झाला प्रात:कालहि चौथ्यारोजीं तेथें
गलों, पाहे, हाय ! सुमन तें कोठें होतें ?
मातीमध्यें लोळत ! बघुनी मीही लोळे
तेव्हांपासोनी मज गमले मेले डोळे ॥१९॥

वृत्ती मेली मीहि मरुनि मत्प्रेता--संगें--
घेवोनी कीं वागवि, धृति आतां ना भंगे
आनंदाचे तत्सम कधिं तद् दुःखाधारें
सोहाळे पाहे, परि गमते सारे वारे ॥२०॥

शालीबंडा हैद्राबाद द.
चैत्र शु. १०शके १८५१ ]

---

(१२९ वें वृत्त—सिंहोद्धता–११८वें उद्धर्षिणी.१२५ वें **मधुमाधवी** १२७ वें **वसंततलिका** १३० वें सिंहोन्नता*) १४ अक्षरी. य. पा.

क. क्र. ११०, १११, ११२, पहा !

---

१३१ वें वृत्त—हंसश्येनी–११९ वें कुटिला १२६ वें मध्यक्षामा १४ अक्षरी ४+१० = १४

क. क्र. ११३ "मानव्य" पहा !

---

क. क्र. ११८ "शशिकला"

१३२ वें वृत्त—चंद्रावर्ता
–१३५ वें ,, मणिगुणनिकरा ] १५ अक्षरी य.पा. ||||||||||||||S
–१३८ वें ,, शशिकला. न न न न स

उगवताचि सुखवित भुवनिं सकला
गगनिं शशि, अवरुनिवराति **शशिकला**
जणुं रजनि अवनि गगनपटला
विचरत हंसुनि बघत मुखकमला ॥१॥

---

*सिंहोन्नतेय मुदिता मुनि काश्यपेन—छंदशास्त्रकार पिंगलमहर्षि वसंततिलकेचें लक्षण करून "सिंहोन्नता–काश्यपस्य"(काश्यपमहर्षि वसंतातिलका–वृत्तास "सिंहोन्नता" असें नांव देतात ) असें सूत्र केलें आहे.

१ चंद्रकेला.

सरसजलिं सर सर सरकत दिसे
हळुं हळुं तरल लहरिवरति हंसे
खळबळ कुवलय हृदयिं उडतसे
हळहळहि जरि नलिन करित बसे ॥२॥
विरहिजनमनिं अनल धगधगतो
क्षणहि शशिस बघत तरि विरमतो
स्वजन, सुहृदसम सकलमनिं वसतो
निजअमृतकर जगतिं पटवित असतो ॥३॥
निमिषभर नच टिकति लहरि जलीं
थर थर थरकति तरि खुलत कळी
दिनभरिं दिनकर निजकरिं तपवी
भय अजुनि उरत तरि शशि हरवी ॥४॥
त्रिभुवनिं निज अमृतकर पसरितो
आजिवरि आम्हि तुम्हि श्रवणिं परिसतो
अनुभव अजुनिहि पटवित **शशिकला**
जनसुखदधृति कुठुनि शशि शिकला ! ॥५॥

शालीबडा हैद्राबाद द.
शुक्रवार चैत्र शु. ११ चै. शके १८५१]

---

## क. क्र. ११९ अश्रु कांअनावर ?

१३३ वें वृत्त—**चामर*** ] १५ अक्षरी SISISISISISISIS
१३४ वें „ (२तूणक) ] र ज र ज र

भानुअर्ध भाग भासवीत भव्य **चामर**
भूमि-भाल पूर्वभाग भूषवीत भास्वर

---

१ तळ्याच्या पाण्यांत. २ चंचल. ३ कमळ. ४ अग्नि. *पृष्ठ १४३ पहा!

**भारतास** भाग्यदायि होइ काय भास्कर ?
—नेत्रिं दाटती मदीय **अश्रु कां अनावर ?** ॥१॥

नित्य हा असाच आस लाउनी अम्हांस तो
वाढवीत ताप मात्र तापवीत खास तो—
उंच जात जों नभांत कोपतो अम्हांवर
**नेत्रिं दाटती म्हणून अश्रु कां अनावर ?** ॥२॥

भात, तूप काल—शर्करा असो नसो तरी,
आज काय ताटिं ? हाय ! शाक आणि भाकरी !!
हीच कीं उद्यां जरी-मिळेल काय तीवर ?
**नेत्रिं दाटती म्हणून अश्रु कां अनावर ?** ॥३॥

भारतीय भाग्यलक्ष्मि भारतास कां त्यजी ?
श्रेष्ठता, महत्व, हांव, तीव्र धांव, कार्ति जी--
दीर्घ काल राहिली-तिथें बघोनि खापर
**नेत्रिं दाटती म्हणून अश्रु कां अनावर !** ॥४॥

लक्ष्मि, हांव, कीर्ति, नांव, सौख्यभावही नसे
दिव्य ती प्रभा अम्हांत दीर्घ काल जी वसे
आठवे मनांत-पाहुनी नभांत भास्कर
**नेत्रिं दाटती म्हणून अश्रु कां अनावर?** ॥५॥

आज ना उद्यां यशस्विता अशीच वाटली
धक्क जी करोनि सोडिली सदैव राहिली
तींत येउं लागलें पला पलांत अंतर—
**नेत्रिं दाटती म्हणून अश्रु कां अनावर ?** ॥६॥

ऊर्ध्व दृष्टिनें कुणासही न तेज पाहवें
तेच तें अम्हींच काय ? हीनतेज कां जवे !
हाय दैव दुर्विलास ! आज दास ! किंकर !
**नेत्रिं दाटती म्हणून अश्रु कां अनावर !** ॥७॥

पाहतों तदीय पाय देखिलें जयांकरीं–
स्वर्ण-रत्नयुक्त मुक्त छत्र जें अम्हांवरी–
भाग्यकालिं वारिती सहर्ष तेविं **चामर***
**नेत्रिं दाटती** तरींच अश्रु हे **अनावर !** ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार पौ. व. ३० शके १८५०

---

क. क्र. १२० "तूणक[1]"

१३३ वें वृत्त—चामर
१३४ वें ,, तूणक
७+८ = १५ SISISIS-ISISISISर ज र ज र

काय वाहुं मी तुला प्रभो ! जिथें तिथें दिसें–
सर्वही तुझें असे तुलाच देउं मी कसें ?
तूं सदैव राहशीं, तशी न वस्तु कीं मिळे
शोधुनी थके तरी, असे कुठें न तें कळे ॥१॥
आतपा[2]मुळें सुकें तसें नकोच पुष्प तें
हृत्प्रसून[3] वाहतों तुझ्यापदीं जगत्पते !
हुंगिलीं अनेकशीं सुवास त्यास ठाउकें
पाहिलीं सुमें कितीं–दिसें न एकही टिकें ॥२॥
एकलाच तूं तरी स्वरूपही अवर्ण्यसें
हेंहि वर्णहीन कीं तसेंच एकटें पिसें

---

* वृत्तदर्पणकार या वृत्ताच्या लक्षणेंत 'यति पादांतीं' लिहितात आणि गीर्वाणलघुकोशांत याच लक्षणेंत अवसानक्रम ७+८असा लिहिला आहे;पण यातच"तूणक"असेंही एक नांव असल्यावरून या'चामर'नामक कवितेंत य. पा. ठवून पुढील "तूणक" ( क. क्र. १२० ) कवितेंत यति परिपूर्तता केली आहे.

१ बाण ठेवण्याचा भाता. २ ऊन्ह. ३ हृदयपुष्प.

योग्य हें तरीच कीं मनास वाटतें असें—
गा प्रभो ! गमेल हें तुलाहि तेंवि दिव्यसें ॥३॥
प्राप्त होइना मुळीं जगांत कांहिंही कवीं
होउनी हताश कीं सदा कदा जळे मवीं
यत्नि हें बघूं तरी कसें ? व काय होतसें ?
राहुं इच्छितों अतां जशास होउनी तसें ॥४॥
वाटतें असेंहि कीं तुझें स्वरूप ना दिसें
साधु सांगती तरी, कुणीं कसें, कुणीं कसें.
निश्चिंत असेच मी, न शंकतेंच चित्त जें
तें स्वरूप तूंच—हें हळूं हळूं हृदीं रुजें ॥५॥

शालबिंडा हैद्राबाद द.
रावविार चैत्र शु. ५ शके १८५१ ]

---

१३५ वें वृत्त—मणिगुणनिकर
—१३२ वें „ चंद्रावर्ता
—१३८ वें „ शशिकला ] पंधरा अक्षरी क. क्र. ११८ पहा!

---

## क. १२१ "धनमद"

१३६ वें वृत्त—मालिनी (८+७ = न न म य य ) IIIIIISS-SISSISS

**धनमद** बघुं नादे अल्पही न्याय, नीती
प्रभुतरि कशि ऐके सर्वदा मागणी ती
कधितरि धनयोगें ठेंच लागेच सर्वा
उतरवि अणि धुंदी घालवी तेंवि गर्वा ॥१॥
निजसुखाचि बघे जो दुःख देई दुज्याला
महति कुठुनि कैशी—नाहिं बुद्धीच ज्याला !

कनक दिसत जेव्हां -न्याय ना नीति ठावी
चुकुनिहि नच त्याच्या राहि-मानव्य गावीं ॥२॥
अतुल कनक कोणां जें लुटीनें मिळालें
रजहि जवळिं त्यांच्या राहिलें नच कालें
नच जरि जित, जेते आज कोणी न पाहे
नयन तरिहि सांगे "दुष्कृती मात्र आहे" ॥३॥
जरि धनकण नाहीं भावना ना निमाली
लव तरि हृदयाची संपदा नाच गेली
अनुभव कनकाचा सांगती जे शहाणे--
"नच कधिं धन कोणां राखिलें, रक्षुं जाणे" ॥४॥
**धनमद** मनुजाला जेविं पाशव्य देई
त्वरित मग लयाला सर्व ऐश्वर्य नेई
कनक नच कुणाचें जाहलें-नाच होतें
परि मद चढल्यानें दिव्य मानव्य जातें ॥५॥

मु. प्रभासपट्टण (सोमनाथ)
ज्ये. व. ३० शके १८५३ मंगळवार.

---

## क. क्र. १२२ "लीलाखेल"

१३७ वें वृत्त—लीलाखेल १५ अक्षरी य. पा. SSSSSSSSSSSSSSS
म म म म म

विश्वाचा धाता, त्राता, संहर्ता तल्लीलाखेलें[1]
अंशत्वेंही वर्णाया तत्संपूर्णत्वें भागेल !
तर्पाया विश्वाची इच्छा जो जो जें जें मागेल
आहे, तेव्हां शक्याशक्यत्वाची शंका ! बाधेल ॥१॥

---

१ खेळ. २ खेळाडू.

विश्वव्यापी ऐसा जो कां गाऊं लागे त्या एका
गातां गातां पोंचे त्याला तेव्हां खट्ट व्हावे कां !

पूर्णत्वानें, अंशत्वेंही आहे, राहे केव्हांही
अर्धे मुर्धे ऐसें नाहीं कांहीं सुद्धां कोठेंही ॥२॥
आद्यंतीं, तन्मध्यें, तीन्हींकालीं पूर्णत्वें राहे
पूर्णत्वाचा चष्मा त्याचा तद्वर्णीं सारें पाहे
कांहीं कैसेंही राहो—तन्नेत्रीं तें संपूर्णानें—
राही, त्यांच्या साम्राज्यीं छोटें, मोठें नाहीं नाणें ॥३॥
एकाचीं खंडें केलीं तीं संख्यातीताची झालीं
मोजूं गेल्यानें वाटे—ती सारीही वाया गेलीं
नाहीं झालीं केव्हांही तीं खंडें एकत्वत्यागें
साऱ्या तद्भागाला एकेकानें मोजावें लागे ॥४॥
विश्वाचीं कार्यें सारीं सारी जो हातांवाचोनी
आद्यापासोनी ना पाही अद्यापी गात्रें कोणीं
'गावें मन्नामाचें गाणें विश्वानें' त्या योगेंही -
व्हावें "गांवानांवाचें" त्याच्या हें गांवींही नाहीं ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शुक्रवार चैत्र शु.११ शके १८५१ ]

---

१३८ वें वृत्त—शशिकला
१३२ वें „ (२) चंद्रवर्ता
१३५ वें „ (३) मणिगुणनिकर. ]

१५ अक्षरी.
क.क्र.११८ "शशिकला" पहा !

---

क. क्र. १२३ "अचलधृति"

१३९ वें वृत्त—अचलधृति १६ अक्षरी य. पा. ||||||||||||||||
न न न न न ल

किततरि मधुतर गमत अंचलधृति
सुख—भग-यश—बल सकल मधु गणति
निजमहति तरि अधिं अभिमत जगतिं
अचलपद कुणिहि अतितराचि वदति ॥१॥
अधिकृत करित रमत नच नरमति
म्हणुनि न कधिं अनुभवित अंचलधृति
सुखचि म्हणत नित असुखद करि कृति
त्यजितहि मग यश न मिळत नव मति ॥२॥
कधिं कृति लव जरि घडत सहजगति
मधिं मधिं मुरडत उलट मनुजमति
अपयश पटत तव मतिसहित कृति
सकल बदलति मुळिं न मनिं कचरति ॥३॥
हळुं हळुं जरि कुणि सतत करिल कृति
वसविलहि निजसदनिं सुरतरुतति
त्रिभुवनिंहि चटचट यशचि मिळविति
मरति न कधिं मग अविरतचि जगति ॥४
नयनिं दिसत सतत फिरत वसुमति
रवि-शशि-उडुगण सकल किति झटति
म्हणुनिच नवफल नित दिसत जगतिं
सतत करित कृति तरिच अंचलधृति ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार फा.व. १२ शके १८५० ]

---

१ न ढळणारें धैर्य. २ ऐश्वर्य. ३ इष्ट. ४ योजिलेलें. ५ कल्पवृक्षाची रांग.

## क. क्र. १२४ अश्वगति भाग्यगति"

१४० वें वृत्त--अश्वगति—अ. १६ अक्षरी य. पा.SIISIISIISIISIIS

भ भ भ भ भ ग

सांगतसे जणुं धांवत धांवत **अश्वगति**
स्वार बसे जंव पाठिवरीं शिकवीत मति
स्थायिक बैठक साध्यहि सत्वरि होइल ती,
**'तोल सदा अवरून बसा मग नाहिं भिती'** ॥१॥
जो बसतो हयपाठिवरीं झणिं गुगतसे
चाल जशी जशि चालत चालत वाढतसे
मौज पलैक गमे तरि शाश्वत नाहिंच ती,
**'तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती'** ॥२॥
'तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती
—स्वार दिसे जंव ऐटित त्यावरि पाहुनि ती
व्यर्थ न वाक्य वरील, वरीवरि आटवतें
अश्व न तें वदतो ठरतें जणुं विश्वमतें ॥३॥
लक्ष्मिहि चंचल तेंविच वाटतसे बघुनी
कोणि हयावरुनी पडल्यास उठेहि झणीं
आज दिसे जरि नांदतसे घरिं भाग्यवती
**'तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती'**॥४॥
स्वार पडे तरि अश्व कितीक उभे असती
भाग्यनगाहुनि ढासळतां नच थांबत ती
ज्याघरिं हा शिरली—नच दीनपणास मिती
**'तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती'** ॥५॥
लक्ष्मिमुळें किति काळजि ती घटकोघटकीं
ज्यादिनिं राहिल ना जवळीं कवडी फुटकी

व्यर्थाचि जीवन होइल ना! मग काय गती!
**'तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती'** ॥६॥
भाग्यमदें[1] दिसले नयनास न ज्यास मुळीं
धूलिच खालचि आज दिसे, मग काल गिळी
मातिंतही नच अश्वपती-राज भूमिपती
**'तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती** ॥७॥
भाग्यभयें मम छाति अशी दडपे--नच ते-
सांगु शके मुळिं काय कसें लव ओझरते
भूत पिचाच्च भयानक अल्पहि ना गमती
**'तोल सदा अवरुनि' बसे मज नाहिं भिती** ॥८॥

शालीबंडा, हैद्राबाद द.
बुधवार फा. शु. १०शके १८४० ]

---

क. क्र. १२९ **"माझे अश्वारोहण"**

१४० वें वृत्त—अश्वगति" १६ अक्षरी य. पा. SIISIISIISIISIIS
भ भ भ भ भ ग

एकदिनीं सहजीं फिरतां नवत्रारुवरी
चाल बघोनिच मी किति हर्षित होय तरी!
हौस फिटेल बरीच—असें मनिं वाटुनियां
स्वैरपणें मग दामटिले नच आलि दया ॥१॥
मी जंव नेहमिच्या अपुल्या हयपाठिवरीं
धांवत कीं असतां मनिं घोळित कांहितरी
तीच सदाचि बसे मम होउनि खोड तशी
हाय! न घेतलि त्या दिनिं काळजि अल्प कशी!॥२॥

---

१ ऐश्वर्य.

धांवतसे नवअश्व नसें मुळिं भान मला
धांउ दिले मग मीहि तयास, विचित्र खुळा !
नाठवली कशि त्या दिनिं ती मज शब्दतती:—
**"तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती"** ॥३॥
ती जुनि खोड जरी मनिं माझि मलाहि कळे
आठवली कविता मज त्याक्षणिं दैवबळें
इच्छित पेन्सिलिनें झणिं ती लिहिण्यां कितिदां
आदळली मम भालिं तदा नवदैवगदा—॥४॥
एक भली पुढती मज गर्त अशी दिसली
खोल मती कसली ! तरि तीहि पुरी चकली
त्याक्षणिं टाकुहि ना शकलों उडि झट्टदिशीं
काय वदूं मग झालि दशा मग काय ? कशी? ॥५॥
आठवतों कितिदां तरि या क्षणिं भ्रांतमती:—
**"तोल सदा अवरूनि बसा मग नाहिं भिती"**
तेंच फिरोनि विचारितसे मज कोणि पहा:—
होइल काय कशीतरि सोडवणूक ? अहा ! ॥६॥
"हा उपदेश असे इतरां - मम प्रश्ननसे"—
मीहि सुटेन जरी सहजीं म्हणतांच असें
निश्चित राक्षिल आव पुराणिक पद्धतिचा
काय पळूं मग मीच भिऊनि मदीय वचा ? ॥७॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार फा. शु. १० शके १८५०

क. क्र. १२६ ऋषभगजविलसित[1]"

१४१ वें वृत्त—ऋषभगजविलसित सोळा अ. य. पा.SIISISIIIIIIIIIS

सिंह गुहेंतुनींच वनिं न पदहि हलवी—
एकचि गर्जना करुनि खळबळ उडवी
मेष, अजा, कुरंग[2] थबकति वनिं चरतां
लोपवि तो क्षणांत ऋषभगजविलसिता ॥१॥
अंबरिं मेघाचे स्तनित[3]--परि अवनिवरी
तो ध्वनि तत्क्षणीं प्रलय करित कितितरी
जे भयभीत भानहि हरविति थरकतां
तेंवि करी हरीहि ऋषभगजविलसिता ॥२॥
जो नर शूरही म्हणवुनि जगिं मिरवला
सिंह तया जरी दुरुनिच विपिनिं[4] दिसला
वांचवि जीव घेउनि करिं मरत मरतां
हास्य निमे बघोनि ऋषभगजविलसिता ॥३॥
जो न तसा तरी मरत झणिं हरि बघतां
चित्तिं गणेल तो विहिताचि मरण घडतां
लाभत भूपजन्म--जुनि म्हण अशि असतां
कां न ह्मणाच योग्य ऋषभगजविलसिता ॥४॥
साक्षमिषें म्हणेलहि 'गगन असुनि खुलें
पाहुनि सिंह कां खग तरुसिच चिकटले'
काल जरी जगां सतत भिववित असतां
शूर खरा हंसेच ऋषभगजविलसिता ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
फा. व. ३ मंगळवार शके १८५१]

१ बैल—गज यांचे व्यापार. २ हरीण. ३ गर्जना. ४ अरण्यांत.

## क. क्र. १२७ "चित्र"

१४२ वें वृत्त—चित्र ८+८ = १६ SISISISI–SISISISS
र ज र ज र ग

**चित्र** पाहतांच चित्तिं विस्मितें जडेच भक्ति
दाटतो प्रभाव, येत दिव्यशक्तिची प्रतीति
'हें **शिवाजिचेंच चित्र**'--नेत्र सांगती मनातें
चित्तिं तत्क्षणीं असेंहि येतसे--मुळींच ना तें॥१॥

जेविं तोच देश, भूमि पाहतोंच आज रानीं
दुर्ग जो उभा अजून कीर्ति ऐकवीत कानीं--
लोकवास्ति तेथ नाहिं' ऐकु ये असेंच कांहीं--
'काल वाहतो सदैव वाहले जगत्प्रवाहीं ॥२॥

कीर्ति वांचली सदैव, सत्य जी अपल्य तीच
जागवी नव्या जगास, नित्य वाढते तशीच
कोरडी जरी जमीन वाहते तरीहि नाव
तारिते कितीक आज !' धन्य कीर्ति आणि नांव !॥३॥

तो **शिवाजि** भूप काय हा नसे ? कशावरोनि ?
ऐट, जोर, ठाणमाण, शौर्यभाव ये दिसोनि
"जीव नाहिं येवढेंच काय जें कमी तयांत"
वाटतें जयास—जीव नाहिं त्याच वाटण्यांत ॥४॥

अश्व हा पहा म्हणेल 'सांगतो प्रभू म्हणोनी
थांबलों मधेंच पाय अर्ध उच्च थांबवोनी'
दुर्ग सर्व बोलतात—हे अम्हीं तुम्हीं बघोनी
ऐकतोंच कीं अजूनि चित्त लावुनीहि कानीं ॥५॥

हीं भवानि दिव्यशक्ति, ही विशाल शौर्यमूर्ति
प्राण घालिती भूतांत--ऊर्मि कां म्हणूनि येती ?
कार्य जो करी--नव्हेच बोलका अबा शिवाजी
गेलि ती मिळेल काय भाग्यलक्ष्मि बा! शिवा ! जी ॥६॥

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार फा. व. ६ शके १८५० ]

---

क. क्र. १२८ "भारता !"

१४३वें वृत्त—**पंचचामर** १६ अ. य. पा. ISISISISISISISIS ज र ज र ज ग

भविष्यकाल भावितांचि कल्पना प्रभारता
भयाण चित्र भींवती तुलाहि काय **भारता?**
नभांत नित्य पाहशीं प्रचंड चंड भास्कर
स्वयेंच केविं उंच जाइ, खालिं येइ सत्वर॥१॥
म्हणोनि तोच दीन[1] काय जाहला कधीं तरी?
त्यजोनि यत्न कीं लवैक धांवही न आवरी
अनंत काल लोटला न होय अल्प निष्फल
तसाच जाहला न तो पलैक ही निराकुल[2] ॥२॥
नसेंच कार्य एकही निरूढ[3] वा निरर्गल[4]
पडे, झडे पुन्हां उठे असेल जो न निर्बल
फुलेच कंटकात तो जरी गुलाब कोमल
त्वदीय शक्ति, हांव, धैर्य नाच होइ निष्फल ॥३॥
जगास भूतकाल तो तुझा अजूनि आठवे
उन्हून रक्त सांडिलें अतांच केंवि तें निवें
पराक्रमास पाहिजे जरा स्वरूपही नवें
जुन्यास पाहिजे जुना, नव्यास कीं नवा हवे ॥४॥

---

१ क्षीण. २ शांत, स्वस्थ. ३ अढळ, इंद्रास नेलेलें. ४ निर्विघ्न.

नवाच काल जाहला, दिशा नवीन लागली
जरीहि आपुली जुनीच जन्मभूमि माउली
नवीन मार्ग, वेशही जसा तशीच साउली
नव्या दमें—परंतु चालुं लाग याच पाउलीं ॥५॥
तमांत गोंधळूं नको! पहा! पहाट होतसे!
दिसेच शुक्र चांदणी पुढेच तूंहि हो तसे
अहा! उषाच येत काय पंचपंच भास्वरा
दिसेल काय वारितां पुनश्च पंचचामरा? ॥६॥

शालीबंडा हैद्राबाद. द.
रविवार माघ शु. १ शके १८५०

---

क. क्र. १२९ "सुबुद्धि"

१४३ वें वृत्त—पंचचामर १६ अ. य. पा. ISISISISISISISIS
जरजरजग

कळे न कीं कधीं, कुणी, करी कठोर कृत्य कां?
खन्यास दुःख खेद कां? खपे खराच सारखा
गणे-गुणी गरीब—गौण गोष्ट—गर्वितागडी
घरोघरीं घमेंड हीच, घाण ही घडोघडी ॥१॥
चटावली अशीच चाल चालली चरीं मुदा
छळेच छत्रधारकास छाग्नि छत्रवान्सदा
जराहि जोर जाहल्या जरत्करूस जर्जर--
झटे करावया झणीं झणाणवीत झर्झर ॥२॥
टळे न टाळितां तटांत संकटादि कंटक
टके तरीहि—ठार कीं करी ठकां महाठक

---

१ झांगड. २ नदीत.

डगे न डाम डौल डंबरांत--डाग पाहुनी
ढळे न--पार ढण्ढणे तरीहि--अश्रु ढाळुनी ॥३॥
तरावयास तातडी करीत ताप-तप्त तो
थकेच थोरही जिथें तिथें थडीस थांबतो
दयाळु देव दीन दुःख जो सदैव दाहतो
धरूं शके जधीं न धीर धांवण्यास धांवतो ॥४॥
परी पदोपदीं परास पाडि पापबुद्धि का
फसे कुणीं न फारसा तरी पडे फुका फिका
वलिष्ट वा बडे ब्रडे बघोनि बोबडी वळे
भल्या मल्या न भावितो भयेंच भीववी बलें
यशस्वि यत्नयोग योग्य येतसे यदा यदा
रते न राष्ट्रकार्यिं कीं करीत रिक्त सर्वदा
लबाड लोभ लावुनीहि लोक लुब्धवीत तो
वचेत वंचना वणिज्य वंचकास वाटतो ॥६॥
शनैः शनैः शमेल का **शिवा** ! शुभांशशोषण
षडाष्टकादि दोष भाषणांत षष्ठि भूषण--
सदा सुबुद्धि साधिल्यास सर्व साध्य होतसे
हरोनि हानि हनिता प्रभूहि हर्षुनी हंसे

शालीबंडा हैद्राबाद द.
माघ शु. ५ वसंत पंचमी शके १८५० ]

---

क. क्र. १३० "वाणिनी"

१४४ वें वृत्त--वाणिनी सोळा अ. य. पा. ।।।।ऽ।ऽ।।।ऽ।ऽ।ऽऽ
न ज भ ज र ग

अविरत नाचते हृदयिं कोण **वाणिनी** ही
कधिं गमते अतीव सुखवी, कधीं असेंही--

१ व्यापार. २ नर्तकी.

भुलवुनि चित्त सत्वरिं रसातलांत नेई
मधिंच अशांतिचें बुजगबाहुलेंहि दावी ॥१॥

कधिं कधिं कीर्तिच्या प्रगटवीत उच्चभावा
कधिं जनिं मान्यताच मधु, दिव्य या स्वभावा
मधुतर वैभवास कधिं दावि लोभनीया
कधिं विषयांदिकां महति देइ वर्णुनीया ॥२॥

कितितरि हाव भाव मधु दावितें जनाला,
जनमन आपणास अनुकूल व्हावयाला,
धडपडतेच साखर सदैव पेरण्याला,
लव न बघे परिस्थितिस तेविं शक्यतेला ॥३॥

वरिवरि पाडितें भुरळ पाहिना वयाला
स्थिति, गति जाणितें न मनिं तेविं धारणेला
अविरत हेतु एक मनिं ठेवितें सुखाचा
सरळ पळे तिथोनि नच पाहि गर्त, खाचा ॥४॥

अम्हि जरि इच्छुं नर्तन तिचें विवेकिं व्हावें
शम, दम साधनादिक मनांत कीं ठसावें
मग म्हणतेच बुद्धि झणिं नर्तकी स्वभावें--
"वठत न नाच, आंगणचि वांकडें असावें" ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार चैत्र शु. १२शके१८५१ ]

## "क. क्र. १३१ सूरा"

१४५ वें वृत्त—सूरा ] ८+८ = १६ SSISSSIS-SSISSSIS
१४६ वें „ हरिगीतिका ] त म य र त ग

जीं कां **हरीची गीतिका** गाते अशी वाणी जिला
**सूरा**हि दिव्या, पंडिता[1] संबोधिती सद्बुद्धिला
विश्वेश विश्वाचा पती ज्यानें दिली दिव्यद्युती
देई जगां साम्यस्थिती कोणी परी ना पाहती ! ॥१॥
ईशास ध्यातां स्वांतरीं ऊर्मी उफाळे अंबरीं
खोलीहि वाढे धी-तलीं हेलावुनी खालीं वरीं
दारीं, घरीं, हृन्मंदिरीं यन्नाम घे कोठें जरी
माधुर्ययुक्ता वाग्झरी--वाहे तदा विश्वांतरीं ॥२॥
संपादकाच्या मानसीं संपादनेच्छा प्रेरुनी
आहेच जो संपादिता-- वस्तुंत आद्यापासुनी
वस्तूच नासे, ती जिथें होती तिथें आहेच भू
तैसा सदाचा तो वसे आदीं व मध्यांतीं प्रभू ॥३॥
ज्याच्याविणें ब्रम्हांडिं या कांहीं नसे दूजें, तिजें
ऐशा प्रभूते सोडुनी जो विश्वसौंदर्यीं रिझे
तीं आवडीं पाहोनि तो होतो स्वये वस्तूच ती
तेव्हां बुधा ! बा मानवा ! कां भ्रांत होते त्वन्मती ॥४॥

---

१ पंडिता.

गाई सदा निभ्रांत तूं प्रेमें प्रभूची गीतिका
आटे भवाचा सिंधुही वाटे तयाची भीति कां ?
आहेच केव्हांचा उभा तारावयां ब्रम्हांड तो
पोहूं शके तेव्हांचना? जो कां जला लाथाडतो! ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार आश्वि. व. १४ शके १८५१ ]

---

क. क्र. १३२ "जगतिं एक तूंच"

१४७ वें वृत्त—अतिशायिनी १०+७ = IISIISISIS-IIISISS
स स ज भ ज ग ग

अविरुद्धपणेंच वृत्ति कां विचरते मदीया ?
आजि धांवतसे इतस्ततः विसरुनीच ध्येया
अभिकंपन आणिना मनीं अभव जाणिं मांही
अभिकाम तरी जुमानिते न **अतिशायिनी** ही ॥१॥
अभिकामिक सोडुनी कुठें बहकते कशी कां?
अभिधावन कीं करूं तरी नच सुटेल हेका
कविताचरणीं विहीन मी अभिनिवेशधामा—
त्यजुनी विचरूं कुठें कुठें तिजसवें रिकामा ! ॥२॥
नच अल्प विपण्णमानसा रुचत कांहिं कोठें
असती जरि, लोभनीयही विषय रम्य मोठें
**कविते** ! तव सन्निधानिं कीं वसत काय नाहीं?
प्रतिभा चमके जिथें, दिशा उजळतात दाही ! ॥३॥
घन, घोर तमिस्त्र सारखे अतुल कां न माजे
भिववी इतरां किती जरी तरि न चित्त माझे—

---

१ श्रेष्ठ. २ मोहांत पाडणें. ३ नाश. ४ इच्छा. ५ मार्गे धाकणारी. ६ इच्छिलेलें. ७ पाठलाग. ८ कल्पनासदन. ९ वृत्ति. १० काळोखीरात्र.

क्षिति ना धरितें लवैकही तरिच वेड साजे
न चळें तुजपासुनी कधीं उलट तोच लाजे ॥४॥
नभिं वादळ जाहलें, जगीं उदधि मातलाही
पडले तरु उन्मळोनियां, हदरली धरा ही
खवळोनिच पंचभूत ते बदललेहि कल्प
चरणाजवळोनि मी तुझ्या परि हले न अल्प ॥५॥
अतिवाद जनांतले, सुखें सहज सोशितोंही
रमतों चरणीं तुझ्या मुदें, भयदकाल तोही—
थरकांपतसे मला, असें तरि न कां म्हणूच!
**कविते ! अतिशायिनी** अशी **जगतिं एक तूंच** ॥६॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
रविवार(सकाळीं) माघ व. १४ शके १८५०]

---

क. क्र. १३३ "**निसर्ग**"

१४७ वें वृत्त **अतिशायिनी** १०+७ सतरा अ. = ।।ऽ।।ऽ।ऽ।ऽ-।।।ऽ।ऽऽ
स स ज भ ज ग ग

पितृगेहिं जरीहि जन्मली म्हणावि अद्रिबाला
परि सोडुनि आपगा निघे स्वपतिच्या गृहाला
न पुनश्च पित्याकडें कधीं बघत ढुंकुनीही
जणुं साक्ष अजूनि कन्यका पटविती जनीं ही ॥१॥
बघतों बुध, योगि, तापसी कितिक वेदवेत्यां
नच अल्प अपत्यलोभ हा तरिहि सोडवे त्यां
धरिते पुढचीच धांव ती त्यजुनि कां नयाते
जगतांतिल चाल ही अशी कळत कां न याते? ॥२॥

---

१ काळोख. २ पृथ्वी. ३ अपशब्द कठोर भाषण.

तरि शैल तसाच पाझरे उपल ज्याचि छाती
द्रव हा दगडासही असे जरि न जीवजाती
मनुजास अपत्यभाव हा विरहकालिं जेव्हां–
करि विव्हल, दोष तो नसे परि विशाळ व्हावा ॥३॥
अपुल्याहुनि जे वडील ते स्वजनक स्वमाता
पति पत्नित भाव दूसरा विसरुनी न चित्तां
नभही शिरिं कां न कोसळो मनिं कधीं न यावा
जगिं सान जिथें तिथें धरा निजअपत्यभावा ॥४॥
सम साम्य वयस्क जेवढे स्वजन, आप्त, इष्ट
निजबंधु गणोनि वागतां नच दुजा वरिष्ट
समताच पटे जगीं, तदा विविधभाव लोपे
असल्यास **निसर्ग** व्हावयां मग गमेल सोपें ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार फा. शु. १५ शके १८५० ]

---

क. क्र. ११४ "**नय**"

१४८ वें वृत्त अवितथ
१४९ वें ,, **नर्कुटक** ] ( सतरा अ. ) य. पा. ।।।।SIS।।।S।।S।।S
१५० वें ,, **नर्दटक** — न ज भ ज ज ल ग

( श्रीमन्मयूर पंतानीं यति पादांती धरला आहे पण गीर्वाण लघु-कोशांत ८+९ = १७ असा क्रम दिला आहे. खालील कवितेंत ९+८ = १७ असा अनुक्रम पाळला गेला आहे.

शिर जरि मुख्य त्यांतहि वरिष्ठचि **नर्कुटक**
बघवतसें कुणांसहि न नासिकहीन मुख
जगिं मनुजास तेंविच असें मनुजत्व जरी
तरिच जगोनि सार्थक हृदीं नय नित्य धरीं ॥१॥

---

१ नासिक.

पारे कधिं नूतनस्थिति विचार करूंहि न दे
नय धरितां उरीं भय तदा उपजोनि वदे–
घडत सुधारणा जगिं नयादिक वेड अतां
नव जग तेंवि काहिं, जुनें जगिं कालवितां! ॥२॥
जरि धरि नीति, धर्म न तरांच मिळे यश तें
नर जरि योजि एकाचि–पडे पदरांत शतें
अनुभव रोख हा आजि बघाल उद्याहि तसे
परि न कळे अशाश्वत जरी गमते हितसें ॥३॥
बघति न मौक्तिकें किति अहा! नय–शुक्तित तीं
करविति कल्पनेवरि उभ्या कुविचारतती
नय नसतां दिसे नच खरें नयनास कदा
नच अविचार हा मग चुके वनवास तदा ॥४॥
विनयविहीन काय न फिरू शकती जगतीं?
तरि नच ते खरें मुळिं खरें म्हणजे–पडती!
पडलिही असे मग कधींच न ते उठती
उठविति ना कपाळहि पुन्हां न असें वदती ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार (मध्यरात्री) फा.श.१ शके १८५० ]

---

क. क्र. १३९ "शारदागायन*"

१५१ वें वृत्त—पृथ्वी (सतरा अ. ८+९ = १७) ISIIISIS-IIISISSIS
ज स ज स य ल ग

करी स्वन न शारदा धरुनि मंजु वीणा करीं
तरीहि मधु मौन कां गमतसे निसर्गांतरीं
दिसे न जरि ओष्ठही लव तदीय हाले असें
तसेहि तरि 'हो' म्हणा–मधुरकाव्य ही गातसे ॥१॥

म्हणेल कुणि 'चित्र हें—मम विचित्र कीं सांगणें'
गणेल, तरि सांगतो परि असे असें मागणें—
कसेंहि मम सांगणें क्षणभरीं तरी मानणें
खुशाल मग कल्पनीं रमुनियां मनीं डोलणें ॥२॥
किती हृदयपाकळ्या फुलवि नित्य काव्योद्गता
कितीक कविहंसहीं जगवि **शारदा**-मुग्धता
मृणाल, बिस जीववी रसिकभृंग—गुंजारवें
जगास करि थक्क कां ? परि न हें मुखें सांगवे ! ॥३॥
कराल निज प्रश्न हा जरि मनो मयूरास तो
कसा त्रिभुवनासही विसरुनी पहा नाचतो
नका भलतसें गणां मुळिं नसे सहस्राक्ष हा
असा रसिक नाचतो नच तयास त्याची स्पृहा ॥४॥
कुठें विषयमग्न तो शचिपती मुखां दाखवी
कुठें हृदयभग्न, वा विषयरूप ऐसे कवी
सुकाव्यरसरूप जे तरिच देहभ नां मुके
असोनि मधु—बोलके म्हणविती सदाचे मुके ॥५॥
तरीच मधु एकती सतत देवि वीणास्वनां
स्वयें बनुनि चित्र ते श्रवति **शारदा**—गायना
नितांत मग नाचती मुळिं न जागिंच हालतां
मयूरहि तयास ना दिसत चित्रिंचा नाचतां ॥६॥

श्रीगिरस्थान माणीकनगर.("अपरात्रौ")
आश्वि. शु. १५ शके १८५१ शुक्रवार

---

*प्रकाशन स्थल व काल:—कवि सम्मेलन,शारश्रम नांदेड. १९३१इ. पृ. ११९ ते १२१

## क. क्र. १३६ "सुहृत्पत्निनिधन"

१५१ वें वृत्त—पृथ्वी सतरा अ. ८+९ = १७ ISIIISIS-IIISISSIS
ज स ज स य ल ग

( समक्ष पाहिलेल्या परिस्थितींत अनावर उफाळून आलेले शब्द)

सहर्ष रवि कालचा, मुदित रश्मि त्या फेंकिल्या
सवेंच मधु हृन्नभीं कितिक कल्पना दाटल्या
समुत्सुक जसें तसें सुखद विश्वही वाटलें
परंतु आजि कां असें नभ समग्र हें फाटलें ! ॥१॥
फलान्वित असा तरू उगवला नवोल्हासकः—
दिसेल नयनां, उद्यां मुकुल—रम्यसा बालक
सुचित्र किति कालचें मधुर तें, मनोल्हासक !
विचित्र किति आजचें मन असूच उत्पाटक ! ॥२॥
दिशा उजळल्या जशा -उमलल्याहि आशा तशा
नसें मुळिंच ठाउकें--पिकत दाक्षिणीं कां हंशा !
प्रभात मधु जाहला -नभहि वाढता उज्वल
परी रजनिनें तिथें सघन फांसले कज्जल ॥ ३॥
रवी उगवतां अजी बघत तों कुठें बालक !
समग्र सदनांत कीं भडकला असे पावक !
सुरम्य झणिं कोसळे स्वमनिंचा मनोरा क्षणीं
कसा अदय काल- जो सुहृद्शोकही ना गणी ॥४॥
अगा अदय निष्ठुरा ! हृदय ठेविलें रे ! कुठें
बळेंच आजि कां बरें? त्यजिशि त्याजलां तूं हटें !
फिरोनि बघ त्यातुनी पळभरी तरी सांप्रती
तरीच उमगेलही तुजशि शोकमग्नस्थिती ॥५॥

पतीस नसतां प्रिया-जगत काय रे! त्याजला
प्रियाप्रिय नसेच त्या जगत केविं तो आजला
कळेल तरि हें तुला, अमित जाळिशी हेतुला
कसें हृदय भंगतें, मग कळेल त्याची तुला ॥६॥

मनुष्य दुबळा तरी सुपथ जाणतो अंतरीं
कसें दगड ठेवणें कितिवेळ छातीवरी
तसा यदि कुणीं दिसे विकल तत्हृदा आठवी
अमोल निज अश्रु ते त्वरित ढाळुनी शांतवी ॥७॥

जगे जगति जीवंवी इतर दुःखितांच्या जिवां
अशा सदनिंचा खुळ्या! तरिहि मालवीशी दिवा
तदीयमनसप्रभा मुळिं न जाणशीं अर्भका!
त्यजीच अविचार तो, पडशि कां फुकाचा फिका ॥८॥

स्वयंच यमराज वा असाशि एक तत्किंकर
न जाणाशि कसा बरें-युगुल पार्वती-शंकर
तयामधिं विभक्तता! कधिं घडेल कां यत्नतः
खुळाच अगदीं खुळा शिशुहुनीहि तूं तत्वतः ॥९॥

वृथा सुहृद-पात्नि तूं करुनि आज स्वर्गस्थ ती
पुढयात वद काय तें मिळविलेंस रे! मांप्रती
अम्हीं उलट काव्य हें मिळाविलें मृताच्यामिषें
त्वदीय परि घेतले करुनि शैशवांचें हंसें ॥१०॥

मु० किल्लेकल्याण ते माणीकनगर मोटारींत
आश्वि. व. १ शके १८५१ शनिवार.

## क. क्र. १३७ "भावनामंदिरीं"

१५१ वें वृत्त--पृथ्वी सतरा अ. ८+९ = १७ ।S।।।S।S-।।।S।SS।S
जसजसयलग

(शास्त्रसुधाकर पं. विष्णुशास्त्री बापट यांचा अभिप्राय वाचून)

तुझ्याच गुणगायनीं मधुर केविं वाणी गमे ?
कसेंहि जरि वर्णिले तरिहि चित्त तेथें रमे !
म्हणो–तुजाशिं आवडे–रस म्हणोनि तेथें वसे
तरी स्तवन अल्पही करुं शके न जें दिव्यसें ॥१॥

कृपा न तव ज्यावरी तरि तया कुठें भावना ?
नसेल जरिं भावना कशि सुचावि ती कल्पना !
जरी न मधु कल्पना रमवि काव्य कैसें मनां ?
कवित्व कसलेंहि ना, सकलही तुझी प्रेरणा ! ॥२॥

कुणीं तुजाशीं भावुनी बसवि **भावनामंदिरीं**
तदाच निज भक्तिनें हृदयही खुलें तो करी
कुणास मधु भावनामय अशीच मूर्ती बरी
कुणी तुज विभू गणे, कुणीं प्रभूच सर्वांतरीं ॥३॥

खरें म्हणुं तरी प्रभो ! हृदयिं भावना मुख्य जी
मिळे तरि मिळो ! विभो ! मिळविली तरी ती तुझी
तुझ्या सुमनकोरकां[१] करुनि **पाकळ्या** वाहणें
तुझ्याकडुनि घेउनी तवपदींच त्या पाहणें ॥४॥

---

१ फुलाची कळी.

तुझें तुजाशिं अर्पिता कृति मदीय ती केविं ? गा !
तरी वदविशी तसें जनमुखें प्रभो ! तूं उगा
पटे स्वमानिं काय जें तरि तुझेंच वात्सल्य तें
जसें तुजाशि आवडे म्हणविशी बुधांच्या मतें ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा व दुर्गाबाग हैद्राबाद द.
मार्ग. १५ शके १८५२ शुक्रवार ]

---

क. क्र. १३८ "उलटकामना"

१५१ वें वृत्त—पृथ्वी (सतरा अ. ८+९ = १७) ।S।।।S।S ।।।S।S।S।S
ज स ज स य ल ग

दया तव अधीच ती तरिच इच्छितोना ! दया
नकोच मग दानही परि असो तुझा नाद या
लवेक शिर हें लवे तरि तुझ्याच पायीं नमी
असेन अपराधिही तरि तुझाच होईन मी ! ॥१॥
कधींहि पदवी नको पद तुझें पुरे शाश्वत
नको जडविणें तिथें तनु मनें अधींचा नत
अशी **उलटकामना** उमविशी कशी अतरां?—
तुझ्याहुनिहि पाउलें कितितरी तुझी ती बरीं! ॥२॥
कुणींहि नच इच्छिलें चुकुनि 'याचना दे कधीं'
म्हणोनि नच याचना घडत याच्च नादें कधीं
नकोच विषयांतलें सुख, कसेहि ते राहुदे
असेल मनचंद्रमा तरि मला प्रभो ! राहु दे ॥३॥
प्रशांत असतां सुखें उगिच्च कष्टावें मना
तयाकरवि लागते करविणेंहि आलोचना
जुन्या विसरल्या सुखां कितिक आठवावें अधीं
कुठें मग तिथोनि ते विषय उद्भवावे मधीं ॥४॥

उगाचि उकरोनियां बुजलियास कां काढणें
स्वयें विषय गार्तिं कां कळत आपणा पाडणें
क्षणैकसुख जाणुनी बुजुनि तेंच तें कां हवें
तुलातरि प्रभो! कसें अजुनि हें असें पाहवे ! ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
मार्ग. शु. ४ शके १८५२ ]

---

क. क्र. १३९ "सगुण-घोषणा निर्गुणीं"

१५१ वें वृत्त—**पृथ्वी** सतरा अ. ८+९ = १७ ।S।।।S।S।।।S।SS।S
ज स ज स य ल ग

'कधीं घडुं शकेल कां **सगुण-घोषणा निर्गुणीं**?'
असें गमत ज्या क्षणीं गुण लपे, दिसोनि मणी
पटे परि पदोपदीं सगुण निर्गुणी प्रत्ययीं
तुझ्या गुणमण्यांत तूं गुणमिषें अनुस्यूतही ॥१॥
प्रमोदमय रूप तें परम शांति जी देववी
तुझें तरिच नामही मम मुखें सुखें घेववी !
तयांत रस योजुनी मज मुदें, मदें नाचवी
असें स्वमुख चाखवी—विसरवी जगाची चवी ॥२॥
अधीं जग उभारुनी मजशिं जन्मही देउनी
मदीय मन मारुनी फिरविशीं पुन्हा तेथुनी
तरी अनुदिनीं तुझ्या—पदिं निमग्न मी राहुनी
रथांसम फिरेनही तव कटाक्षयानांतुनी ॥३॥
अधीं स्फुरण देववी मधुनि भावना द्योतवी
अहा ! मग नवे नवे किति विचारही उद्भवी
तयांताचि अनेकदां फिरफिरोनि संशोधवी
कराकरविं अक्षरें भरभरां तदा काढवी ॥४॥

अये ! सरल वेत्रिके ! सगुणशारदादूतिके !
तुझें स्तवनही जरी विसरुं—काव्य वाटे फिके
मदीय मधुदेवते ! सरसचित्तसंमोहिनी
बसोनि हृदिं—नाचवी स्फुरणरूप सौदामिनी ! ॥२॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
मार्ग. शु. ११ शके १८५२ सोमवार ]

---

क. क्र. १४० "**विकृति**"

१५२ वें वृत्त—मंदाक्रांता सतरा अ. ४+६+७ = १७
म भ न त त ग ग SSSS-।।।।।S-SISSISS

वाटे सर्वां:—सहज जगतीं आपुली कीर्ति व्हावी
केव्हांही ती दगदग अशी काहिं मागे नसावी
बैसे ठायीं **विकृति**विभवें काहिं ओळ्या लिहाव्या
पद्यामध्यें बसवुनि तयां मासिकांतूनि द्याव्या ॥१॥
कोणाचीही कैशितरि जरी केलि काहीं कुचेष्टा
ऐशा काव्यें कवि नच गणीं मासिकाची प्रतिष्ठा
आधीं घेती **विकृत**कविता टाकुनी उत्तमास
आधीच्यानां वचनवळसें देति बाराहि मास ॥२॥
किंवा लाधे **विकृति**विभवें स्वीकृता आठवायां—
जावीं पत्रें जरि दरमहा सात वा आठ यावा
दुर्भागी ते ! उगिच लिहिती काव्य जे भारदस्त
येते ना जों अजुनि उदया, पाहती तोंच अस्त ॥३॥
सोपी युक्ती ! सहज कविता व्हावयां आचरावी
ज्या ज्यास्थानीं सुचत नच ना शब्द, टिंबेंच द्यावीं
एखाद्याचें **विकृति**विभवें वाकुडें चित्र घ्यावें
वर्णावें तें विकृतवचनें वाचकां हांसवावें ॥४॥

अर्धा आणा पुरुनि उरतो पोस्ट ना जास्त याची
अंकीं येण्यां विनवाणि नको अल्प संपादकाची
दोघांच्याही विकृतिविभवें निश्चयें शीघ्र येते
विद्या, बुद्धि, श्रम लव नको हीनहास्यात्मकातें ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
आषा. व. ११ मंगळवार शके १८५१ ]

---

क. क्र. १४१ "विरोध"

१५२ वें वृत्त—मंदाक्रांता ४+६+७ = १७

सतरा अ. SSSS-IIIIIS-SISSISS म भ न त त ग ग

गाजावाजा जगातें दिसतो नित्य सांपत्तिकांचा
साऱ्या क्षेत्रीं अधिकृतपणें लाग लागे तयांचा
वेंची जोका वरवर जरी देशसेवेंत वाचा
कीर्तीझेंडा सहज मिरवे धन्य त्या मानवाचा ! ॥१॥
कष्टोनीयां तिळतिळ झुरे देशकार्यी सदा जो
कीर्तीच्छाही लव न शिवते नांव गाजो न गाजो
चित्तीं नाणीं, निज अडचणीं, नव्य आपन्नगा जो
सोशी धैर्यें, खडखडि घरीं कां न साकल्य वाजो ॥२॥
देशध्येयें विभव उलटें वर्धतेही कुणाचें
देशप्रेमें मनहि मग जें काय नाचेच नाचें
तन्नृत्यानें उडत रज ते सत्य भक्तांस जाचे
धूली ती तत्पदरिं पडते तीहि सेवोनि वाचे ॥३॥
देशाचे जे धुरिण बघती ना तदीयापदाला
प्राणांतीही चुकुनि न चढे देशदास्यापदाला
निभ्रांतत्वें कृति करित जो नित्य सातत्य ठेवी
हा दुर्दैवा ! न परतविशीं ज्याचि त्यालाच ठेवी॥ ॥४॥

गेले, मेले अजुनि मरती काय तत्पुण्य वाणूं !
स्वातंत्र्याचा तरि न उगवे राष्ट्र-ऐश्वर्यभानू
अंधःकारीं परवशपदें अल्प ना हालती ते
राहे ही भू लवतरि कळो-होत जे हाल तींते ! ॥९॥

प्रभुदरबार व सैफाबाद फायनान्स हैद्राबाद द.
आश्वि. कृ. १३ बुधवार शके १८५१ ]

---

## क. क्र. १४२ *"जगुनि मिळतो स्वर्ग वाटेल तेव्हां"

१५२ वें वृत्त—मंदाक्रांता सतरा अ. ४+६+७ = १७

SSSS-।।।।।S-S।SS।SS म भ न त त ग ग

स्वर्गेच्छा ती कसलि? न कळे काय? आली कुठोनी
जो तो सांगे- सहज वरती अंगुली दाखवोनी
'पुण्यात्माला त्वरित मिळतो मृत्यु येईल जेव्हां
आम्हीं सांगूं—"जगुनिं मिळतो स्वर्ग वाटेल तेव्हां" ! ॥१॥
येथे ! येथे ! सुरनगर तें राहती लोक जेथें
व्यक्तित्वानें अजुनि वसती आजही विश्वजेते
लोकासाठीं सतत झुरती त्या इहामुत्र कोठें ?
ज्यानां नाहीं स्वहितचि मुळीं तेच ते श्रेष्ठ, मोटे ॥२॥
सर्वार्थी जे मुकुनि जगतीं स्थापिती स्थैर्य, शांती
एका शब्दें, जग हलविती लेखिती, तुच्छ कीर्ती
कालाचेंही शिर दडपुनी काहिं चालूं न देती
स्वर्गंगेची अमृतसरीता या जगीं वाहवीती ॥३॥
जो कर्माचा विधिच सगळा, दावि आलोक शक्ती
जो सत्याचा कनकपुतळा, फांकवी दिव्य कांती
सर्वार्थांचा अचल मथळा, दाखवी विश्वभक्ती
स्वार्थत्यागें सुखवि सकलां, वाढवी प्रेम, शांती ॥४॥

स्वार्थी जैसे मरत जगतीं देह लोटूनि शोकीं
लोकार्थी ते मरुनि उरती लोककार्यार्थ लोकीं
जाती स्वर्गीं कितिक निरयीं पुण्य पापामुळें ते
कर्माकर्में–बुध म्हणति कीं–'नित्य दोन्हीहि येथें' ॥९॥

मु. गणेशबाग, हैद्राबाद. द.
मार्ग. व. १० शके १८५२ सोमवार]

---

क. क्र. १४३ "धन्य ती धन्य भक्ती!"
१५२ वें वृत्त—मंदाक्रांता सतरा अ. ५+६+७ = १७
SSSS-IIIII S-SISSISS म भ न त त ग ग

आकाशाची अभिनव सुमें खालिं येतीं किती तीं !
रात्री तेथें तरि झळकते दिव्य नक्षत्रकांती
जीवोद्याना–मधिल सुमनें काय तेथेंच जाती ?
त्यांची यांची-म्हणुंच मग कां–तीच ती एक जाती? ॥१॥
उद्विग्नांचें मन रमविती, नेत्र आल्हादवीती
छोटे मोठे झळकति.तरी व्योम उंची किती ती !
वाटे चित्तां जवळिं वसतां काय भासेल कांती !
जेव्हां येती त्यजुनि गगनां कां न ये ती प्रतीती? ॥२॥
खालीं येती तरिच-म्हणु कां-राहवेना म्हणोनी !
घेती कां ते पडत पडतां तेजही सांवरोनी ?
वाटे हेंही कधि कधि मनां-द्यावयां तेज आम्हां !
उद्धाराते उगि न बसवे–धन्य त्यांचाच प्रेमा ! ॥३॥
प्रेमासाठीं ढळुनि वरुनी नित्य येतात खालीं
ऐशा साठीं उरत भरुनी ईश विश्वाद्यवाली

---

*प्रकाशनस्थल व कांल:—विहंगमाला १६ वें साहित्य संमेलन विशेषांक मे १९३१ इ. पुस्तक ७,८,९ पृ. ११

जैसें तैसें अजुनि भरुनी व्योम आहेच आहे
ऐसे प्रेमी वसति म्हणुनी विश्व साश्चर्य पाहे ॥४॥
तैसें जे जे जनहितपथीं सर्वदा कष्टताती
सर्वार्थानें सतत झटती सौख्य सर्वांस देती
देशापायीं सुखहि त्यजिती, लोककार्यार्थ अंतीं-
प्राणज्योती निज विझविती'**धन्य ती धन्य भक्ती!**' ॥५॥

मु. गणेशबाग, हैद्राबाद द.
मार्ग.व.१०।८५२ रविवार

---

## क. क्र. १४४ ते खरे "भाग्यशाली"

१५२ वें वृत्त—मंदाक्रांता सतरा अ. ४,६,७ = १७

SSSS-|||||S-S|SS|SS म भ न त त ग ग

शृंगाराचें कवन रचण्या आज नाहींच काल
ती तेम्हांची संवय कविनों! काय सोडूनि द्याल?
पाहा आतां पडलि अपुली माय—भू संकटांत
त्यागोनीयां विदुषि मृदुता तीस देतात हात ॥१॥
कोणीं आतां तसलि मृदुता मानिना भूषणाची
शृंगाराचा मनु बदलतां जाहली दूषणाची
जैशा जैशा सकल अबला देशकार्यांत आल्या
संपूर्णाशें सहज सबला कार्यकर्त्याहि झाल्या ॥२॥
मोठे मोठे करुनि थकले त्याच कार्यीं स्त्रियांनीं—
कोठें कोठें यश मिळविलें आपुल्या निश्चयानीं
शूरांना जें मिळुं न शकते शक्तिच्या साधनानें
तें तें सारें सहज मिळतें निश्चयाच्या बलानें ॥३॥
निंदा, हानी गणति म्हटल्या कोमलांगी स्त्रियेला
याच्यापेक्षां म्हणुं जरि खरें काल नाजूक आला

कीं वीरांनीं त्याजीलि म्हणुनी तीस हानी, म्हणोनी
येथें आणी **विधि** जुळवुनी शौर्य, सौंदर्य दोन्हीं ! ॥४॥
लक्ष्मी, कीर्ती अणि मिळविली ज्यांनिं ती प्राप्त केली
सातत्यानें असुं तरि वसे, एकदां गेलि, गेली !
स्वत्वोत्कर्षस्थितिहि तसली जी प्रसंगींच आली
देशोद्धारा-स्तव झटति जे, **ते खरे भाग्यशाली** ! ॥५॥

प्रभुदरबार शालिबंडा हैद्राबाद द.
गुरुवार आषा. व. ३,५२

---

क. क्र. १४९ "**वंशपत्र**"

१५३ वें वृत्त—वंशपत्रपतित सतरा अ. १०+७ = १७

SIISISIIIS-IIIIIIS भ र न भ न ल ग

पाहुनि **वंशपत्रपतिता** गमत मनिं असें—
धांवत उंच उंच पळतो तरु, गगनिं तसें-
पत्र न जाइ एक दिनिंहीं, अवनिवरि पडें
राहुनि उंच जन्मभरिही, परि पतन घडें ॥१॥
उच्चाशिलासमुच्चय तिथें जवळिंच दिसतो
ते नयनीं बघोनि हृदयीं अधिकाचि भ्रमतो
घालवि जन्म जें महितलीं अजि नभिं चढती
नित्य नभांत गोष्टि कथिती महि अजि धरित्ती! ॥२॥
अग्निस वंशवृक्ष वमतां, कधिं कधिं दिसतो
प्रस्तर पोटिं ठेवित तरी प्रगटहि करितो
तो सकलांमध्यें वसतसे जंव मथन घडे
त्या समयीं उफाळुनि तदा जननयनिं पडे ॥३॥

---

१ वेळूचें पान. २ दगडाची उंच ढीग. ३ पाषाण.

उंचाचि राहती विभविं जे नच अधिक तिथें–
भोग घडे तयां फिरुनिया अवनिवरिच, ते–
येतिल जे इथोनि चढती हळुं धरुनि नया
खालति यावया परि नको अवधि लव तया ॥४॥
पावन कोण ? तो कळत ना, पतितहि तसला
उच्चपदीं न कोणि दिसला अविरत वसला
दंडक हा जगांत असला अजवरि दिसला
भूत भविष्य एक पटवी तरि नर खचला ! ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
रविवार चैत्र शु. १३ शके १८५१

---

क. क्र. १४६ "तैजस"

१५४ वें वृत्त—शिखरिणी सतरा अ. ६+११ = १७
ISSSSS-IIIIISSIIIS य म न स भ ल ग

वनश्रींची शोभा मृदुकिसलयीं नाचत असे
रसास्वादें ज्याच्या सहसितमिलिंदावलि दिसे
सुमांनां सूर्याच्या प्रखरतर रश्मी सुकविती
परी रात्रीं–त्यानां त्यजुनि कलिका नव्य फुलती ॥१॥
कुठें नक्षत्रांना लपवि रवि, कां कोणि गिळतो ?
नसे ठावें हेंही पुनरपि तयां कोण वमतो ?
निशीं शांताकाशीं धवल विधुबिंबा प्रगटवी
तसें हत्कासारीं अजुनि कमला कां न खुलवी ! ॥२॥
जगाच्या बाजारीं अभिमत ठरे तो उचलितो
प्रभू ज्याला नेतो फिरुनि नच तो दृष्टि पडतो
कृपाकार्पण्याची मुळिं नच तया ओळख असे
दिसें कां हे ऐसें ? तरिच नर विश्वीं नित फसे ! ॥३॥

सदा साम्यत्वानें उदधिजल राही वरि, तळीं
दयेची टंचाई कुणि न प्रभुकोशीं बघितली
अहेत्वें वागे तो त्रिभुवनिं दयाळूच म्हणवी
सुखें, दुःखें सारीं मनकृत फलोम्दूत पटवी ॥४॥

स्वकर्मा नेणें, तत्सदृश प्रभुरूपासहि, कुणीं
स्वयंकर्माकर्मानिल फिरवि आम्हां निशिदिनीं
शिखांदोलें जैसे हलन अमतो पर्ण गगनीं
तसे झोलें खाती नियतिहत प्राक्सिद्ध म्हणुनी ॥५॥

कसें नित्यप्राप्तां कुठुनि-हुडकावें तरि कुणीं?
दिसेना कोणांला भ्रमित म्हणुनी निष्ठुर गणी
नसे साकाराचा मुळिं न कशिही आकृति खरी
दिसे त्या जो जैसें हृदयपटलीं चित्रित करी ॥६॥

स्वयंसाक्षी हाले नच हलवि-पाहे नित उगा
असे येणें, जाणें तरुशिखरिच्या जीवविहगां
सदा वाताघातें डुलति तरुपर्णें वरिवरीं
तसा कां बुधाही त्यजुनि स्थिरता, दोलन करी ॥७॥

असे-जाणें, येणें जिव शिव असें रूपक जया
श्रुती दोघांनांही समचि-खग संबोधित तयां
जरी जाणों येथें चलनवलनां संभव दिसे
पटेना ज्ञान्याते उभयविध हा भासचि असे ॥८॥

कसा धांवे आत्मा-तदितर नसे स्थान लवही
उरे विश्वव्यापी सघन-भरुनी अंबर, मही
कितीवेळां स्वप्नीं पळुनि पळुनी निद्रित थके
असोनी स्वस्थानीं गहन विपिनीं जेविं भटके ॥९॥

न हाले जागीचा तरिहि फिरणें संभवतसे
अशा त्या आत्म्याला विबुध वदती "तैजस" असें
फिरोनीही नोहे नभिं रवि, शशीचेंहि फिरणें
तशीं कार्यें लोकीं घडवुनि तिथें स्थित नसणें ॥१०॥

मु. श्रीसंस्थान माणीकनगर
गुरुवार आश्वि. ब. ७ शके १८५१ ]

---

क. क्र. १४७ "टकळी"

१५४ वें वृत्त—शिखरिणी ६+११ = १७

ISSSSS-IIIIISSIIIS य म न स भ ल ग

बसावे उच्चत्वें हृदयविभवें ध्येयशिखरीं
असावी केव्हांही फिरत **टकळी** ती निजकरीं
'मुखानें ना बोलां' म्हणु तरि अबोला नच धरा
अशा बोला बोलां, जनहृदय खोलां न विसरा ! ॥१॥
'सुताचा हा धागा ?' अवगणुनि ऐसें आजिवरी
स्वतःच्या दुर्दैवें धन सकल गेलें परघरीं
खऱ्या स्वातंत्र्याचा करिं अचल धागाहि असतां—
कसा डाका आला तुम्हि सदनिं जागेंच बसतां? ॥२॥
"यदा स्वातंत्र्याचा सहजगत धागा गवसला
सुगावा काढावा कुठुनि अपुला डाव फसला"
असेंही ना बोलां:—अवसर न खेळास उरला
कुठें घेवोनीयां अजुनि बसलां ! खेळ करला? ॥३॥
म्हणावे ना आतां—'करुं हळुंहळूं बंद टकळी
दमानें, शांतीनें हळुंहळुं वळूं बंद कसली
करावी तोंडाची आधिं खटादिशीं बंद टकळी
फिरावी हाताची सतत गिरकी घेत **टकळी** ॥४॥

नका बोलूं:—"झाला अजुनि न खुला मार्ग अपुला—"—
विमानोड्डानाला मनिं धरुनि दावा निजबळीं
"न यावी घेरीही निज उरिं जरी धावहि बसे"
अशी स्वातंत्र्याची दुमदुमत भेरी वदतसे ॥५॥

प्रमुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
मार्ग. ब. २ शके १८५२ रविवार ]

---

क. क्र. १४८ "निसर्गाची भेरी"

१५४ वें वृत्त—शिखरिणी ६+११ = १७

ISSSSS IIIIISSIIIS य म न स भ ल ग

**निसर्गाची भेरी** दुमदुमुनि बोले अनुदनीं
"दिले आहे ईशें सरसगट स्वातंत्र्य अवनीं
उरे कोठें आतां अवधि इतकी स्वस्थ बसण्यां
**गतं गोष्टी** गेल्या ! अवसर न ऐश्वर्य वदण्यां ॥१॥
कशाला ती झोळी लटकवुनि खांद्यास दिधली ?
खिळी दांताचीही वडवडुनि केव्हांच बसली
दिलेही ऐकोनी करुनिहि सचोटी, सहविधी
जरी वाटे लाभे तरिहि प्रतिबिंबांतिल निधी ॥२॥
मिळाल्या बोलानें सहज गत संपत्तिहि कुणां
भजी, सोजी, भाजी, मधुरतर पक्वान्नहि म्हणा
कढी बोलाची ती वचनमय भातासह मिळे"
कसें हें चालावें—नच कधि कळे—या कुणि गिळें ! ॥३॥
कृती व्हावी मौनें वचन वदनें काढुंच नये
सदा सातत्यानें श्रमचि करणें तेंहि विनयें
महत्कार्या ध्यावे परि नच वदावे लघु मुखें
श्रमानें साधावे तरिच विचरावें जगिं सुखें ॥४॥

करावें जें काहीं तरि करुनिया चंद टकळी
पदें चालावेंही फिरवितांचि केव्हांहि **टकळी**
बसावे जों लागे सदनिं, चरखा एक फिरवा !
चकाकीचा सारा क्षणिक समजा रंग हिरवा ! ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा, हैद्राबाद द.
मार्ग. व. ३ शके १८५२ रविवार ]

---

क. क्र. १४९ "**वि-योगी**"

१५४ वें वृत्त--**शिखरिणी** ६+११ = १७

ISSSSS IIIIISSIIIS य म न स भ ल ग

तुला चित्तीं ध्यावें, श्रवणिं परिसावें तव गुण
पुन्हा प्रेमें गावें हृदयिं ठसवावें परिसुन
स्वरूपा वर्णावें तरिच उघडावें स्वमुख तें
स्वभावें तें व्हावें जनमन म्हणावें 'हरखतें' ॥१॥
असें काव्यें गावें:—मधुरतर व्हावें अमृतसें
कुणा तें वाटावें:—प्रियविरहभावें वदतसे
प्रमोदें डोलावें डुलत डुलवावें बुधजनां
स्वरूपीं त्वद्भावें रमत रमवावें निज मनां ॥२॥
अशायोगें **योगी**, तरि कुणि **वियोगी** समजतो
विचाराचा रोगी, विरहमय जोगीच म्हणतो
**वियोगी** ना **योगी** अतुल सुख भोगी तव पिसा
नसें जें का स्वर्गीं ठसवि अनुरागी नव ठसा ॥३॥
जगामध्यें काहीं तवसदृश नाहींच लवही
हटे जों जों पाही उरत नच काहीं नव मही
दिशा ज्या का दाहीं भरुनि उरल्याही नच कळे
पटे ठायीं म्हणुनि मन विश्वीं न रमलें ॥४॥

जगद्वैत्वाभासें दिसत नव, खासें, मधुरसें
दिसें जें अध्यासें म्हणुनि जरि भासें तरि नसें
तुझ्या ध्यानाभ्यासें नच मज कसें तें जग दिसें
वदे मी उल्हासें:—'अमृतमय खासे तव पिसें!' ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
मार्ग. शु. १० शके १८५२ रविवार

---

क. क्र. १९० "उपासना कीं विप्रलंभ?"

१५४ वें वृत्त—शिखरिणी ६+११=१७ य म न स भ ल ग

बघावे डोळ्यानीं लव न तव रूपाविण कुणां
न कानीं ऐकावे चुकुनि मुळिं त्वद्वर्णनविना
गमे विश्वीं सारे विषसम दुजे सर्व विषय
तुझ्या दृष्टिक्षेपा-मधिंच वसला विश्वविजय ॥१॥

जरी विश्वोद्यानीं अमित नव पुष्पें विकसलीं
लताकुंजामध्यें मधुतर कळ्यांनीं डवरलीं
तरी त्वन्माधुर्या हुडकुनिहि सादृश्य न दिसें
बघावे जों तेथें मुळिं नच तदल्पांश गवसे ॥२॥

तुझ्या रूपानें हें हृदय भरलें, विश्व बुजलें
दुजें नाहीं काहीं त्वदितर असें दृश्य उरलें
कधा काळीं कोठें श्रवणिं पडल्या कोकिलरव
न वाटे तें तैसें मधुरहि, दुजे, तत्क्षणिं नव ॥३॥

मनें रेखाटावें तरिहि तव चित्रासचि मनीं
तुझ्या रूपामध्यें जगत विनटावें अनुदिनीं
तुला जे भेटावे फिरफिरुनि वाटे तरि असें
मनीं, ध्यानीं, स्वप्नीं त्वदितर दुजा भाव न वसे ॥४॥

पटें मच्चित्ताचें विभव तव सान्निध्य नसतां
नटे मांही तैसा मममनिं तुझें चित्र ठसतां
तुझ्या त्या सौंदर्याविण जगत भासे किति फिकें !
म्हणोनी आनंदें त्रिभुवनहि ओवाळिन सुखें ॥९॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
मार्ग. शु. ९ शके १८५२शनिवार ]

---

क. क्र. १९१ "हरिणी"

१५५ वें वृत्त—हरिणी—(सतरा अ. IIIIIS-SSSS-ISIISIS
६+४+७ = १७ न स म र स ल ग

नयन म्हणतां नेत्रीं, चित्तीं सदैव हरिणीच ये
क्षण नच उभे जेव्हां तेव्हां पळेच विपिनीं भयें
म्हणति, हरिणी कोणीं रानीं वधे जरि एकदां
भुलुनि फिरतें मागें मागें तदा मन सर्वदा ॥१॥
जरि दिसुनि ये कोठें कोठें तदंश-सुलोचना
-हरिणचपला' कोणीं कोणीं तिला म्हणती'म्हणा'
मधुरमयता जेथें जेथें लवांश जयां दिसे
नवल गमतें संपूर्णत्वें तयां म्हणती कसें? ॥२॥
बघुनि कटिला जो जो कोणीं म्हणेलहि 'सिंहिणी'
बघुनि नयनां त्यादृष्टीनें म्हणेच 'हरिणी'कुणीं
परि मनिं पटे साकल्यानें जगांमधिं जो वसे
फिरुनि फिरुनी संपूर्णानें जगन्नयनां दिसे ॥३॥

मु. द्वारका
ज्ये. व. १३ शके १८५३ शनिवार. ]

---

## क. क्र. १९२ "हृदयाची सहाण"

१५६ वें वृत्त--कुसुमितलतावेल्लिता अठरा अ. ५+६+७ = १८

SSSSS-||||||S-SS|SS म त न य य य

( या उभ्या आठवड्यांत कोणी एकही कविता ऐकविण्यासारखा न भेटल्यावरून )

घोरारण्यीं, ही कुसुमितलतावेल्लिता[1] डोलते कां?
कोणीं ना पाहे तरिहि धरिते तांडवाचाच हेका
नाचे नाचेही, डुलतहि बसे, होतसे तीच शांत
कोणीं लागेना तिज रमविण्यां-ती रिझे आपणांत ॥१॥

मोठ्या आनंदें मधुर हंसते पाहिना एकही तें
संतोषें नाचे वरि, परि, कुणी तोषवीनाच तीतें
चित्ताच्या नाना प्रमुदित अशा भावना दावितानां
हा ! देवा ! माना तिळभरि तरी कोणिही हाल्वीना ॥२॥

दावी ही शोभा रुचिरमधुरा दर्दुरांनांच[2] कां ती?
सौंदर्याची करित बसली आपुली व्यर्थ माती
डोले डोले कीं डुलवित तसें आपणा स्वीय-माना
ऐशी उद्यानां चिररुचिर कां शोभना अल्प दे ना ॥३॥

वाटे ऐसेंही कुणितरि तसा दिव्य भोक्ता तिचा तो-
राहोनी येथें अविरत इतें कौतुकें नाचवीतो
प्रेमें गोंजारी म्हणुनि खुलते आवरे मोद ना तो
पापी हो आम्हां ! तरिच नयनां तो दिसेना कसा तो ॥४॥

गा देवा ! देना ! करुनि करुणा शांति या एक दीनां
देशीं वृक्षांनां कुसुमितलतावेल्लितांनां क्षुपांनां[3]

---

१ हालती-किंवा-वक्र फुलवेल. २ बेडकांनां. ३ झुडुपांनां.

कोणी जे माझी नविन कविता ऐकुनी हर्षतानां
हर्षे, मी तेव्हां सुख लभतना, त्याविणें होइ दैना ॥५॥
मत्काव्याते जे श्रवुनि डुलती डोलती तेवढयानें—
तच्चित्ताचें जें चलन घडतें तें बघे सूक्ष्मतेनें
तें आहे जें कां अशनहि तसें सौख्यसर्वस्व माझें
येतें आतां कीं मममनिं असें "तेंहि व्हावेंच ओझें" ॥६॥
जिव्हाळयाचें हें सुख लव जरी येवढेंसेंच भोगी
त्या योगानेंही कधिं कधिं गमे-मी असे कां निरोगी?
मोठ्या या रोगा कुणितरिहि द्या औषधी रामबाण
देऊं कां तुम्हा खरबड अशी **मत्हृदांची सहाण** ॥७॥
स्त्रीयानंदातें रसिकहि नको नाहिं श्रोताहि त्याचा
राहोनी चित्तीं कुणितरि म्हणें "मीच आहे सदाचा
काव्याच्यापूर्वी, लिहित असतां, संपतांनाहि आहे"
देवा ! तो तू कां ? प्रभुवर ! अहा ! अश्रु आलेच-हे ! हे!॥८॥

मैलारदेवपल्ली, हैद्राबाद द.
मंगलवार (माध्यान्हीं फा.शु.१शके१८५० ]

---

क. क्र. १५३ "**चित्रलेखा**"

१५७ वें वृत्त—चित्रलेखा ४+७+७ = १८

SSSS·IIIIIIS SISSISS म भ न य य य

वासंतीं या नव फुटत असे पालवी जी तरूंना
त्यमाजींही नवठ गमतसे पाहतां पिंपळांना
पर्णें त्यांचीं सकलहि झडतीं जेधवां, त्याचकालीं—
म्हाताऱ्याच्या मुखगत खुलते ही गुलाबी अकालीं ॥१॥
तीं बाऴहंशीं मृदुलतर अशीं पार्णं पाहोनि लाली
वाटे चित्तां—जणुं आजि नुकती कामधेनूच व्याली

काड्या काड्या तरुभरि दिसल्या, पाहती हेच डोळे
तेथें आहा! सुरतरुची सुप्रभा आज लोळे! ॥२॥
कोणालाही कधिंहि न म्हणतो "या मला पाणि घाला"
जागेचा जो तसुभर न हले कोणिं घालाहि घाला
झाडांखालीं कितितरि पडलीं वाळलीं पीत पानें
हानी झाली रजनिसमयिं कां यादवी माजल्यानें? ॥३॥
पाण्याचा कीं चुकुनिहि नव्हता जेथ अत्यल्प लाग
झालें कैसें? कुठुनि फुलविला? वाळवंटात बाग!
पानें सारीं नविनचि दिसलीं-ही कृपा कोणिं केली?
वाटे सांगे गगन निरखुनी—"हाच त्रैलोक्यवाली"! ॥४॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार चैत्र शु. २ शके १८५१ ]

---

क. क्र. १९४ "फिरती कारंजी"

१५८ वें वृत्त—**नंदन** ११+७ = १८ अठरा अ.

।।।।S।S।।।S-।S।SS।S म ज भ ज र र

वरि वरि पाहुनी भुरळही सदैव आशा मला
फिरवितसे, उगाच कधिंही न जीव हा टांगला
गमत असे मनास म्हणुनी तिच्यासवें जातसे
पिळवटुनी मदीय हृदया तरीच फेंकीतसे ॥१॥
रवि तपताच आम्रफलही तदुष्णतेनें पिके
अधिकाचि गोडि वाढत परी मदीय होतें फिकें
मजशिंहि दुःख संकट करी सदैव संतप्त तें
मधुर बनेल शांतिफल तें बघे समुत्कंठितें ॥२॥
फिरुनि तशीच कंठिं बिलगे अशी निराशा मला
अवनि तमामुळें मज गमे सदाकदा शामला

सरासिं तरंगतांडव तदा बघोनि त्यांची तती
गमत कधीं असें—तमभयें भिवोनि ते कांपती ॥३॥
पटवित उत्तरास—**फिरती** म्हणेल **कारांजे** ही
सतत धरावयास फिरतां न लाभली कधींहि
नवलसमान चोजहि गमे न सांपडे हें कसें
जवळि समोर एक पळते पळांत गाठूं असें ॥४॥
पलभरि दूर राहति कधीं न एकमेकांहुनी
लभत न सौख्य दुर्विधिवशें तदीय भेटींतुनी
उभय सदैव धांवति, पिसें तरी—निराशेमुळें
अनुभव सांगतोच सुखदा तदाच आशा कळे ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार चैत्र शु. ६ शके १८५१ ]

---

## क. क्र. १५९ "**नाराच**"

१५९ वें वृत्त—**नाराच** ] अठरा अ. य. पा. ।।।।।।ऽ।ऽऽ।ऽऽ।ऽऽ।ऽ
१६२ वें ,, **सालसा** ] न न र र र र

झणिं करित सुटेच सूं सूं असा घोष **नाराच** हा
चुकुनिहि परते कधीं कालिं ना ऐकु आले पहा !
सुटत जंव धनुर्धरापासुनी थेट लक्ष्यावरी
शर शिरत उशीर लावी न अत्यल्प, धांवे **उरीं** ॥१॥
समरस हृदयीं त्वरें होतसे प्रेरिला ज्यास्थलीं
क्वचितचि पारे जाणती काय आहे कला त्यांतली,
कुणि नयनशरास अत्यंत जे कां भिती आकुला
गमत सकल भाग हा ठाउकाही असे त्याजला ॥२॥

---

१ लोखंडी. २ निशाण.

इतर सकल जाणती कार्यकारी खरा, तें सदा—
त्वरित करित काय जें ध्येय त्याचें ठरें एकदां,
लव कुचरपणा कसा ठाउकाही नसे, तो तशा
सरळ करित राहतो ठेवि ना, कांहिं माया दया ॥३॥
मधुर, सरळ, वाकडा, जन्म जो कां मिळे—तो भला—
गणुनि रमत राहि, जो एकदां लाभला लाभला
रडुनिहि उपयोग नाहींच कांहींच हें जाणुनी
विचरति जगिं जे—समाधानही त्यास लाभें क्षणीं ॥४॥
नच चुकुनि कठोरता ना दया कांहिंही आणितें
सुरतरुफल[१] काय जें श्रेष्ठसें जाणि कर्तव्य तें
अपयश, यश, पाप, पुण्यादि आज्ञापकाला असे
तरिच असहनीयही आपदा भोगितानां हंसे ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार चैत्र शु. ७ शके १८५१ ]

---

क. क्र. १५६ "**जनन मरण***"

१५९ वें वृत्त—नाराच ] अठरा अ. य. पा. ।।।।।।S।SS।SS।SS।S
—१६२ वें ,, सालसा ] न न र र र र

सकरुणनयनें प्रभो ! पाहशीं दीन या किंकरा
म्हणुनि संत्रय तीच*जाहली कीं दयासागरा!
मम मन म्हणतें दयेहूनही योग्य शिक्षा बरी
तरि अनुपम दिव्यशांती गमे ती मदीयांतरीं ॥१॥
**जनन मरण** जन्मठेपास ठोठाविशीं त्यांतही
सुसहाचि गमुं लागलें दुःख या देहकारागृहीं

---

१ कल्पवृक्ष. *प्रकाशनस्थल व काल:—तत्वज्ञानमंदिर व १२ अं. ४ चै. १८५३-१-१९६१ पृ. ३१

सतत संचयिनें जसें जात काठिण्यही त्यांतलें
महति न उरली तयीं, चित्त येथेंहि आनंदलें ॥२॥
नुरलि मरणशोभनाही अतां वाटतें मन्मनां
अजुनि तम दिसे निशीचा म्हणोनीच झोंपे पुन्हां
**जनन मरण** काय तें स्वप्न दोनक्षणाचें गणूं !
उभय उघडझांक हे पापणींचे असें कीं म्हणूं ! ॥३॥
उघाडि नयन जों हळूं-एक अंधार त्याते दिसे
फिरुनि फिरुनि तेंच तें पाहतां कां न यावें हंसे?
तरिहि बघुनि लोभ कीं जीवनाचा जगांतील तो
हंसुनि हंसुनी शेवटीं तोंच खेदाश्रु मी ढाळितों ॥४॥
गमत कधिं असेंहि:—दिव्यप्रभा ती तुझी फांकली
**जनन मरण**भावनाही नुरे तींत कीं साठली
नयन दिपति-कीं म्हणूं झांकती पूर्वीच्यासारखे !
प्रभु ! बघ ! मन होउंही लागलें आपणां पारखें ! ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द. ]
गुरुवार फा. शु. ११ शके १८५० ]

---

## क. क्र. १५७ "विबुधप्रिया"

१६० वें वृत्त—विबुधप्रिया ] अठरा अ. ३+५+५+५ = १८
–१६३ वें ,, हरिनर्तनछंद ] SIS-IISIS-IISIS र स ज ज भ र

वाटतें बघता मनां कविता खरी **विबुधप्रिया**
त्यामुळें बुधवाचकां विनवीतसे धरुनी भया
स्वेच्छिता कविता यदा जरि वाचण्यां करिं घ्याल या
सज्ज ती हृदयांतली करुनी अधीं अपुली दया ॥१॥
योग्य मी नच अल्पही कविता कधीं लिहुंही शके
नाहिं मी लिहिलीचकीं दृढमानसें मज ठाउकें

नेहमीं हुडकितसे मग कोण हा लिहितो तरी !
कायहो वदुं ! आजही नच तो मला गवसे परी ! ॥२॥

नित्य हें मज वाटतें:—अजि काढितो हुडकोनियां
कल्पना नित धांवती दमती तशा फिरती रित्या
गाठिं त्या परि बांधिती अजुनी नव्या मग सांगती—
'थोडकें चुकलें पुन्हा—असुंद्या उद्यां तरि खात्रि तीं' ॥३॥

ठाउकें जरि-कल्पना नच पोंचती कधिंही तिथें
पाडिती मजमाजिं, जी प्रतिभाप्रभा हृदिं दाटते—
वाटतें मग विभ्रमें कधिं सत्य तें मनही रमें
लागतो चरणीं पुन्हां विरमे तरी कधिं ना रमे ॥४॥

सोडुनी जरि नाद तो प्रियवाचकांवरि भिस्त ती—
ठेउनी चरणीं तया जरि लागुनी परि पाहती—
कोणि कीं प्रतिभा कशी, कुणि शब्द ते, कुणि कल्पना
काव्य कीं रमवूंशके नच सर्वदा सकलां जनां ॥५॥

त्यामुळें चहुंबाजुनीं जगिं जो असे अतिसुंदर
एकदा तरि पाहुनी नयनें तया, मग सत्वर—
ठेउनी पुढती तशा वळणास ती नव नक्कल
त्यादिनीं लिहुनी स्वयें ठरवील हा हृदयाकुल॥६॥

तेधवां जनरूप जे जगदीशहो ! तुम्हि भक्तिनें—
अर्पुनी तुमच्यापदीं म्हणवेलही मग खात्रिनें—
—माझि ही कविता पहा ! नवसौख्यदा, विबुधप्रिया
तूर्त द्या मज आशि ती यशदायिनी करुनी दया ! ॥७॥

* * * *

ठाउकें मज ऐकुनी नच येतसे परतोनि तो–
पाहतां प्रभुधाम तें, तरि अश्रु हे अजि ढाळितो
गीतिकातरि स्वप्निंही नच आठवे म्हणुनी मनां–
हे असें रमवीतसे कधिं गाउनी रडगायना ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार फा. व. ८ शके १८५० ]

---

क. क्र. १९८ "शार्दूलललित"

१६१ वें वृत्त—शार्दूलललित अठरा अ. १२+६ = १८

SSS।।S।S।।।S SS।।।S म स ज स त स

उद्यानीं फिरुनी थके परतुनी येण्यास निघतां
मार्गी कोणितरी मला हटकिलें तों पाय पळता--
डोळे झांकुनि धांव घेत सुटलों ठेंचाळुनि पडे
पाहे ज्या क्षणिं मी सुरक्षित, गमे पथ्यावरि पडे ॥१॥
आलों जों घरिं थेट माडिवरती जाउोनि बसलों
तेंव्हां खास मलाच मी बघुनियां अर्धाच हंसलों
तों बाहेरुनि कांहिंसें तुटक कीं जे शब्द पडले--
कानीं, ऐकुनि हाय ! पायहि तसे पोटांत शिरले ॥२॥
वार्ता बोलतिः–"आज वाघ सुटला" हें कानिं पडलें
कोणी–"सिंहचि पिंजऱ्यांतुनि तसा दोघेहि सुटले"
तें ऐकोनिच बोबडी वळलि जी मागेंहि वळलों
माझें अर्ध बघोनियां उपरणे तों मीच नुरलों ॥३॥
वाटे तोच असेल वाघ धरि जो मार्गांत मजला
हातीं घेउनि धावलों तरिच हा मत्प्राण उरला

---

१ सिंहाचीलीला.

किंवा तो असल्यास जाहाले पहा! गात्रेंहि गालित
याच्या या म्हणण्यावरोन गमते शार्दूलललित ॥४॥
सायंकालिंच ऐकिले जंव असें "दोघांहि धरिले–"
गेलों त्यास्थलिं पाहण्यास फिरुनी-तों काय दिसलें?–
काटेरी झुडुपास तें उपरणें होतें अडकलें–
केले काहिं जरा न वर्षभर तें हांसे अवरलें ॥५॥

शालीवंडा हैद्राबाद द.
शुक्रवार चै. शु. ११ शके १८५१ ]

---

१६२ वें वृत्त—सालसा ]
–१५९ वें ,, नाराच ] अठरा अ. य. पा.

"नाराच" क. क्र. १५५ व "जननसरण" क. क्र. १५६ पहा!

१६३ वें वृत्त—हरिनर्तनछंद ] अठरा अ. ३+५+५+५ = १८
–१६० वें ,, विबुधप्रिया ] "विबुधप्रिया" क. क्र. १५७ पहा!

---

क. क्र. १५९ "मेघविस्फूर्जिता"

१६४ वें वृत्त–मेघविस्फूर्जिता ] एकोणीस अ. ६+६+७ = १९
–१६८ वें ,, सुवृत्ता ] ISSSSS-IIIIS SISSISS य म न स र र ग

मयूरें ऐकोनी सहर्षितमनें मेघविस्फूर्जिताला
किती आनंदानें थरकवितो त्या आपुल्या चंद्रकाला
शिरीं त्याची चूडा हलत असतां लाजवी नर्तकींते
तयाच्या केकाही विसरविति कीं हावभावादि गीतें ॥१॥
गमे नृत्यालापें नच मन रमें, मेनकाद्याप्सरांचे
बघोनी कौशल्य स्थिति म्हणुनि कीं तो सहस्राक्ष नाचे

---

१ सिंहाचीलीला. २ मेघगर्जना. ३ हर्षितमनें. ४ पिसावरील डोळ्याला. ५ तुरा. ६ इंद्र.

अशे स्वर्गाळाही अवनत करी मेघनादानुळासी
बघे तन्नृत्याला सुरनगरिचा कोण होईल अर्थी ॥२॥
यदा गर्जे व्योमीं क्षणभरि जरि चातकाल्हादकारी
पुढें तच्चंचूनां उघडवुनिया तत्पिपासा निवारी
जरी जातां जातां हिरवळिवरी अल्प वर्षोनि वारी
क्षुपांनां वृक्षानां हसवित निंव तत्क्षणीं दुःख वारी ॥३॥
बघोनी आकाशा कृषिकगण कीं देव जाणोनि पाणी–
मुदें जोडोनीयां, विनविति तया वर्षवीं आज पाणी
मिठी घाली कंठीं नवयुवति जी घाबरोनी पतीला
तदा तो वाखाणी कितितरि मुदें **मेघविस्फूर्जिताला** ॥४॥

शालिबंडा हैद्राबाद द.
गुरुवार चै. व. २ शके १८५१ ]

---

क. क्र. १९० "**माझी मराठी मला***"

१६५ वें वृत्त—**शा. वि.** एकोणीस अ. १२+७ = १९
SSS||S|S|||S-SS|SS|S म स ज स त त ग

कोणी पोहति संस्कृतार्णवि, कुणी हिंदीनदीमाजिंही
बंगाली मधु, रम्यशी उपवनें जी रंजवीती तिही
भाषा आंध्रहि, कोणि गुर्जर, गणी कर्नाटकी सोज्वळा
सर्वांचिक्य अशी गमे त्रिभुवनीं **माझी मराठी मला** ॥१॥
कोणी आंग्ल विमानिं बैसुनि बळें डोक्यावरी धांवती
जाती येति नभांतुनीच फिरती श्रेष्ठत्व कीं दाविती

---

१ खालीं वांकलेला. २ मोर. ३ इच्छिणारा. ४ झुडुपानां. ५ शेतकरी. ६ हात. *प्रकाशनस्थल व काल:—राजहंस हैद्रा. द. ज्ये. श. १८५२ अंक २ रा.

हें उच्चत्व पटेल कां पटवितां ऐश्वर्य संपब्दलां ?
आहे श्रेष्ठ-म्हणां ! खुशाल–'दुबळी'–**माझी मराठी मला** ॥२॥
सॉनेटादिक सर्वही दशदिशा आली फिरोनी जरी
केली यावनि आत्मसात्गजलही आहे फिरूनी घरीं
ऐश्वर्यस्थित यांत्रिकोन्नति घडो, लाभोत कोणां कला
स्वर्गीया लखलाभ एकचि असो **माझी मराठी मला !** ॥३॥
वृत्तावित्र्यगुणें विशाल असुनी स्वीकारि जी गज्जला
तेजस्वी असुनी स्वयें करितसे स्वीकारही कज्जला
ऐशी यावनि लांब लांब मजला मारीतसे आजला
भाषासौष्ठव राखुनी रमविते **माझी मराठी मला** ॥४॥
वृत्तक्षेत्र जरी विशाल अपुलें भावावते ना कधीं
शेजारस्थितिहि मधून मधुनी डोकावते तीव्र धी
अन्योद्यानिं खुशाल फेरफटका मारोनिही उज्वला
ऐशी एकचि सर्वगामि गमते **माझी मराठी मला** ॥५॥

हैद्राबाद ते श्रीमाणिकनगर रेल्वेंत व मोटारींत ]
शुक्रवार अ. शु. १५ शके १८५१

---

क. क्र. १६१ " **व्यवहारमग्न मनुजा***"
१६५ वें वृत्त--शा. वि. एकोणीस अ. १२+७ = १३
SSSIISISIIIS-SSISSIS म स ज स त त ग

बा ! मोठया **व्यवहारमग्नमनुजा !** धन्या महा त्वन्मति
काव्योच्छ्वासवतीमती न शिवते, यावी कशी कीव ती
संसारांतिल दक्षता तुझि कुठें ! ही रूक्षता !–'होय ना?'
प्रत्यक्षस्थित फायदा तव कुठें?'ही आमुची कल्पना! ॥१॥

---

*प्रकाशन स्थल व कालः—तत्वज्ञानमंदिर ( जानेवारी १९३० ) अं. ४३ पौष्य १८५१ पृ.४४

सारे वर्ण्य ठरावयां कवि अम्हीं जन्मास आलों जरी
रीती थोर तुझी न वर्णु शकतों झाली लुली वैखरी
ती सांसारिक नित्यनूतन तुझीं दिव्यें जशीं ऐकिलीं
दोन्ही हात, शिरें, पहा तुजपुढें आतांच कीं टेंकिलीं ॥२॥

'सोन्याचा किति भाव?' शोधित रहा! "सोनेंच होणें अम्हां"
बाजारांत सदैव धांवत असां तेथें दमां कीं रमां
जा! धान्यादिक भाव शोधुनि पहा! साधे जरी एकदां—
हंगामावरि आधिं साठवुनियां मोठाच घ्या फायदा ॥३॥

संसारांतिल सार्वभौम तुम्हि हो! संसार मोठा तुम्हां
'खोटा तो' म्हणतों-म्हणूनिच वसे मोठाच तोटा अम्हां
संसारांत नितांत रंगत बसां, काठेंहि पाहू नका!
घेतां सांडुनि सावली स्वगृहिची-काव्यांगणीं ऊन कां? ॥४॥

हे आहे 'ध्वनिकाव्य'—यांतिल पहा संभाव्यभावास कीं
जाणे पूर्ण जरी-'न शोभत मुळीं काव्यस्तुती स्वन्मुखीं'
'छेकापन्हुति' तेविं श्लेषहि इथें,'अन्योक्तिमाधुर्य'हें
कोणां ऐकविलें?वदें मुख तदा-छातीच फाटे भयें! ॥५॥

काव्यां ऐकुनि एकदां सुरसिका रोमांच कीं दाटले
आतां ऐकविले, परंतु दिसले कांटे तिथें थाटले
काव्याचा रस काय होय असल्यां-तो दाट कीं पातळ?
नाहीं येथ कवे! तुझी धडगती-जा! तूर्त काढी पळ! ॥६॥

हैद्राबाद ते कलबुर्गी रेल्वेत रात्रौ ]
मार्ग. शु. १२ शके १८५० सोमवार ]

क. क्र. १६२ "व्याख्यान"

१६५ वें वृत्त—शा. वि. एकोणीस अ. १२+७=११

SSS||S|S|||S-SS|SS|S म भ ज स त त ग

व्याख्यानास म्हणोनि मंड्इमधें जातां त्वरेनें मला—
घाईनें तिकडेंच धांवत असा जो—एक कीं भेटला—
होता "गद्य व काव्य" हा विषय,—तो तद्वत्कसा वाटला
भाग्याचा म्हणुनीच कीं अवचितें मातें तिथें भेटला ॥१॥
वाटे मागुनि कीं—कुठोनि म्हटलें—होईलही योग्य तें—
व्याख्याता जरि ऐतिहासिक अशी ठेवील दृष्टी तिथें
ऐकोनी इतिहासशब्द म्हणतो—"तें सर्व मी सांगतों
**बाजी** कोण? प्रभू **शिवाजि** कुठला? **संभाजि**ही कोण तो! ॥२॥
भाजी भाकरि यांत सर्वचि असे हें एक मी जाणतों
पाला, माजि, मुळें, फळावळ सदा ताजींच कीं आणतों
माझी भाकरि मीच आज मितिला भाजींत आहे जसें
सांगा ! एक तरी असा कुणि दुजा जो स्वावलंबी असे ॥३॥
**राजा** काय तदीय जीवित असें सारें प्रजेच्या करीं
सारा घेइ म्हणोनि सेवकाचि तो सेवी प्रजा-चाकरी
राजा आज, दुजा उद्यां, कुणितरी तीजा न तो शाश्वत
लक्ष्मीपुत्र अम्हींच देश सगळा द्रव्यार्जनीं रक्षित ॥४॥
कांदे, गाजर आणुनी--बघुनि ही गर्दी अशी सारखी
**(शाकान्वर्थक नाम कीं पटविलें--ज्ञानी तसा पारखी)**
आहे येथ लिलाव काय म्हणुनी तो साधण्यां धांवलो"
**(येण्याची जंव कारणें समजलीं-ऐस्क्रिमसा जाहलों)** ॥५॥

* * * *

आला एक वकील घेउनि सवें मोटार सर्वोत्तम
पोटाचे जरि दास कीं इतरही हा खास दासोत्तम

त्याच्या भाषणिं शब्द तेच फिरवी जे काय़द्याचे निघे
शैली, ऐट तदीय मी टकमका व्यामूढचित्तें बघे ॥६॥

चालू दे वकिला ! समन्स तव, तें हायकोर्ट वा केसही
डोकें होउनि पाय चालत जरी तोंडास ये फेसही
काव्याचें जरि कांस मी तुजपुढें घालूं तरी फीस ती--
देऊं कोठुनि, दूषवूं उलट कां ? ही काव्यदेवी सती ! ॥७॥

* * * *

आला एक असाच डाक्टर, तदा माञ्चित आनंदलें
--जोकां पोटहि फाडुनी बघुंशके मातें असें वाटलें:--
काव्याचेंहि तसेंच कीं हृदय हा जाणीलही तत्क्षणीं
जेव्हां हाहि सदा जनां सुखविण्यां कष्टे अहर्यामिनीं ॥८॥

माझे हेच विचार हर्षितमनें मी जेधवां दाविले--
बोले तो " अगदींच कीं घसरलां--कोणीं असें बोलिलें?
आलों काय तुम्हां खुळयांसम इथें व्याख्यान ऐकावया?
जेव्हां येइ कुठेंहि--निश्चित गणां-रोगां तपासावया" ॥९॥

**वाटे स्वात्रिघरीं अमंत्रित कशी आली निराशा बया?**
**रोगी कीं न कळे--परी दिसत--हा आला जगीं याच या**
**हाडें जाहलिं सर्वही खुळखुळीं--कीं ढांसळे सापळा**
**मदकत्न् मी बसतां मुखें वच निघे "साऱ्या कवींनों पळा!" १०**

[मु. माणीकनगर
मार्ग कृ. २ शके १८५० ]

## क. क्र. १६३ "तो माझा"*

१६५ वें वृत्तः—शा. वि. एकोणीस अ.

SSS॥SISIIISSSISSIS म स ज स त त ग

पुष्पांची कमनीयता, मधुरता, संश्लिष्टता[१] लोपते
सौंदर्याधिकही सुगंधसरिता वाहोनियां भागते
नक्षत्रांसहि लाजवीतचि कळ्या झालीं फुलेंही जरी
विश्वोद्यान भरोनिही डवरलीं ज्याची न येई सरी ॥१॥

वाढे आणि खुटे, झुरे झरझरा ज्याच्या भयानें कुढे
कोठें तो रजनीश होउनि फिका जोका पडे ज्यापुढें
यद्दिव्यद्युतिचा प्रभाव विलसे भूमीवरीं, अंबरीं
ऐसा भास्करही गणालतरि त्या **ज्याची न येई सरी** ॥२॥

देती नांव कुणी सहस्रकर कीं पृथ्वीस जो द्योतवी[२]
ऐसा शक्तहि यन्नखांशपुढती सारीं करें टेकवी
होतो पूर्ण हताश, गर्वहि जिरे ओशाळुनी स्वांतरीं
**तो माझा** स्वयमेव तैजस असा **त्याची कुणा ये सरी?** ॥३॥

नाहीं कीं अवसान[३]भूमि लवही दंडायमानाविणें
निर्वाणस्थिति जी सुखां प्रसवते पूर्णांश ज्याच्या गुणें
आनंदैकरसस्वरूप वसतो संसिद्ध सर्वांतरीं
**तो माझा** मग मी तदीय सहजीं **ज्याची न येई सरी** ॥४॥

---

१ संबद्धता २ तेजोमय. ३ विराम. *प्रकाशन स्थळ व कालः—
"वाग्गीश्वरी"विलास १२ वर्ष १लें श. १८५२

**तो माझा** इतुका समीप विलसे:--मूर्ती न माझी उरे
साम्यासाम्य असाहि भाव नुरला, स्वानंद चित्तीं भरे
माझा मी म्हटल्याहि ना बिघडते अंशें न मी तो जरी
**तो माझा** मग हेंहि सत्याचि तसें **ज्याची न येई सरी** ॥९॥

बल्लारी ते हुबळी रेल्वेंत व मोटारींत
सोमवार माघ व. ११ शके १८५१ ]

---

क. क्र. १६४ **"माझें मला ना मिळें"***

१६५ वें वृत्त—**शा.** वि. एकोणीस अ. १२+७=१९

SSS||S|S|||S-SS|SS-S म स ज स त त ग

माझें **जें** म्हणवी मनोमयहि तें आहे मदीयांतरीं
मावें तेंच दशेंद्रियांमधिं तसें पृथ्वीवरी अंबरीं
मागें तेंच, वसें पुढें, फिरकुनी पाहे--परी ना--कळें-
माझा मीच, परी भ्रमोनि म्हणतों--**माझें मला ना मिळें?** ॥१॥
माझा मी पटतो, गमे उलटही--मी हें कळावें कसें !
शंका ज्याक्षणिं कीं अशी प्रगटते येथेंच हो मी फसे
ऐसा कीं पडतो तदा घमरुनी देवा ! कधीं हें कळे--
**माझा मीच परी भ्रमोनि म्हणतों माझें मला ना मिळें** २
देवा ! धांव ! असें यदा म्हणत तों वाहेच बाष्पावली
हातीं घेउं शके पलैक न मुळीं ती दिव्यरत्नावली
नेई बाष्पतुफानही तळिं परी येतो वरीं व्याकुळें
मन्नेत्रांतिल मुक्त सत्यचि परी **माझें मला ना मिळें** ॥३॥
केव्हां मानसही मदीय म्हणतें जी गोष्ट हातांतली
आहे पूर्ण, परंतु तीच उलटी होतां दिसें धीतली

---

*प्रकाशन स्थल व काल:—तत्वज्ञान मंदिर अं. ४७ वा. जाने. १९३१ पौ. १८५२ (पृ. ३८)

तें दिव्यत्व **महाबलेश्वरबलें** विश्वस्वरूपांतलें
विश्वाद्यंतविचार लोपुनि गमे **ज्याचें तयाला मिळें** ॥४॥
हो एकस्थिति **शंकरा !** स्थिर वसो ! हालूं न दे अल्पही !
जैसें या स्थलिं पाहतों तुज तसें राहा भरोनी मही !
विश्वीं वावमिळो तयाविण--न जें बाह्यांतरीं दाटलें
पूर्णत्वें पटवी, पुन्हां नच गमा **माझें मला ना मिळें** ॥५॥

म. श्रीक्षेत्रगोकर्णमहाबळेश्वर
महाशिवरात्रि शके १८५१

---

क. क्र. १६६ **"जाणे कुणा कोण तो"** *

१६५ वें वृत्त—शा. वि. एकोणीस अ. १२+७ = १९

SSS॥SISIIIS SSIIIS SSISSIS म स ज स त त ग

नाहीं शक्याचि भास्करोदय जिथें, ना अस्तही तो कधीं
चंद्राचें नच चांदणें खलुशके या दिव्यराज्यामधीं
हें साम्राज्य मदीय अप्रतिहत प्राविसद्ध जें जाणतों
**स्वात्मानंदनिमग्न चित्त असतां जाणे कुणां? कोण तो?** १
विद्युत् तेविं हिरे--तमासह जिथें नक्षत्र समावती
त्यानां मन्नयनप्रधान- मजला-मी इच्छितां—दाविती
सूर्याच्या द्युतिलाहि वाव न मिळे अंधारही नेणतो
**स्वात्मानंदनिमग्नचित्त असतां जाणे कुणां? कोण तो?** २
आनंदातुनि दुःखजन्म न कधीं होईल, सोडा भिती !
कोठें कां ठिणग्या कधीं—हिमशिला घासोनियां पाडिती?
नाहीं कीं जळण्यास शुष्कवनही—तो कोण? कां जाळतो?
**स्वात्मानंदनिमग्नचित्त असतां जाणे कुणां? कोण तो?** ३

---

*प्रकाशन स्थल व काल:—तत्वज्ञान मंदिर अं. ५६ वा. अक्टो. १९३० आश्वि. १८५२ पृ. (१४)

स्वानंदान्वित—गाढ सुप्ति-नटली हृद्रंगभूसंस्थित
नाचावें कुणि ? आणि पाहिल कुणीं कौशल्य-नृत्यान्वित ?
आगोचा जरि डोंब—सागर असे तत्सान्निधीं सिद्ध तो
स्वात्मानंदनिमग्नचित्त असतां जाणे कुणां? कोण तो? ४
होतें कर्म सदा सुखास्तवचिना ? प्रारब्ध? इच्छाच तां !
व्याघ्राची जरि तीक्ष्ण, घातुक नखें वाघास कां बोचती?
कोठेंही त्रिघडे न अल्पहि-असें जो निश्चयें सांगतो
स्वात्मानंदनिमग्नचित्त असतां जाणे कुणां? कोण तो? ५

हैद्राबाद द. कामटीगल्ली शालीबंडा ]
गुरुवार फा. व. ६ शके १८५१ ]

---

क. क्र. १६६ "वधुवरांस"
१६५ वें वृत्त—शा. वि.

विश्वव्यापिनि विश्वनाथवनिता विद्याविधींवादिनी
उन्निद्रारुणपल्लवाब्जनयनस्फीता—जगन्मोहिनी
वात्सल्यें कविच्या मुखीं विकसवी द्राक्षाधिका माधुरी
लाभो मंगल, पूर्ण यां वधुवरां कुर्याद्द्वयोर्मंगलम् ॥१॥
वाटे या कलिका पहा सकलिकां कीं सांगती "आइका !
कोणीं पाहिलि, कौतुका न करि, ती कोठें कधीं आइ कां?"
तैशी आज मही पहा करित ही स्वापत्यसत्कौतुका
हर्षोल्हास अहा ! कसा दिसतसे कुर्यात्सदा मंगलम् ॥२॥
जशी मोहवि माधवीं मधुलता जी चित्तसंमोहिनी
शोभे जेंवि निजप्रभें दिपवितां सौंदर्यसौदामिनी
तारांची कमनीयता झळकते जैशी नभःप्रांगणीं
किंवा चित्तचमत्कृती चमकवी चंद्रप्रभा चांदणी—॥३॥

किंवा ही वधु कांचना वर जणूं त्या दिव्यरत्नापरी—
शोभे कीं शशिचंद्रिकाचि सुषमा सौंदर्यनीलांबरीं
सद्धर्मीं यश, शांति साधुहृदयीं, सौगंध पुष्पीं, जसें
तैसें मीलन हें सुखत्सुयशसें कीं आज झालें असे ॥४॥

होतां काल पथीं म्हणोनिच गती होती अतीमंद ती
साथी संगति कांहिं एक नव्हती आयुःप्रवासीं सती
आतां व्हाल रथीं सुसंसृतिपथीं व्हायां अती संस्कृती
ऐका ! सर्वहि **सावधान** म्हणती **कुर्यात्सदा मंगलम्** ॥५॥

व्हा हो ! शीघ्र रथस्थ लग्नघटि ती साधोनि उच्चास्थिती
दावो मार्ग **उमापती—भगवती** रक्षोत दोन्ही रथीं
होवो सारथि **पार्वतीपति** सुखें लावो रथा सत्पथीं
देवो आयु, भवप्रवास सुखवो **कुर्यात्सदा मंगलम्** ! ॥६॥

साधाया सकलार्थ गा वधुवरा आतां करावी त्वरा
साधा लग्न, सदा स्मरा प्रभुवरा, संसार साधा खरा
सेवा सार असार सारुनि करा संसारफेरा पुरा
साधो स्वार्थ परार्थही प्रभुकृपें **कुर्यात्सदा मंगलम्** ॥७॥

पावो कीर्ति यशःप्रजादि विभवां हे युग्म नांदो सुखें
यांचें ऐकुनि नित्यनूतन असें मांगल्य सर्वामुखें
हर्षोत्फुल्लमनासवें वरिवरीं हे आमुचें कर्णही
लाधो ऐकुनि कीर्तिवृत्त शुभदा **कुर्यात्सदा मंगलम्**" ! ॥८॥

* * * *

प्रेमानें **यशवंत** ऐकावितसे स्फूर्त्युल्लसद्गायनीं
मोदें मंगलअष्टकां म्हणतसे **झिंजोटि** रागांतुनी
या लग्नोत्सवकौतुकां बघतसे हर्षोल्लसल्लोचनीं
हार्दिक्यांतुनि आशि ही निघतसे '**कुर्यात्सदा मंगलम्**' ॥२॥

शालिबंडा हैद्राबाद द.
शके १८५०

---

क. क्र. १६७ "**सुमधुरा**"

१६६ वें वृत्त—**सुमधुरा** एकोणीस अ. ७+६+६ = १९
SSSSISS-IIIIIS-SSIIIS म र भ न म न ग

नैराश्याच्या निशीथीं[1] तळमळत तों आली **सुमधुरा**
कीं **श्रीशंभूशुभांगी**[2] जगत–शुभदा सौंदर्यरुचिरा
सर्वार्थां द्यावयाला उसळुनि जशी आली जणु उषा
निद्रेते त्यागुनीयां करुणहृदया संत्रस्त सुवशा ॥१॥
वाटे देवी निघाली अवनिवरती शोकास हरण्यां
सांडी पीयूष[3]–सांगे द्रवजल जणूं मांगल्यकरुणा
कीं सिंची प्रेमवारी हळुं न कळतां वात्सल्यहृदयें
कोणीं ? केव्हां? वसे ते तरिच नयनां ना ते दिसुनि ये ॥२॥
आशेची पालवी ही तरिच फुटली, नाविन्य वसलें
विश्वाच्या हृत्प्रदेशीं उभवि कलिका आनंदसलिलें
वैरस्यें शुष्कवृक्षां सुमन खुलवी वात्सल्यविभवें
योजी नाविन्यभावें जनन नसतां पीयूषहि नवें ॥३॥
सारल्यीं पूर्ण साठे अभिनैव असें माधुर्य सगळें
वस्त्रें सार्धीं[4] उषेचीं जणु रजनिनें पाहोनि अपुले–

---

१ रांत्रीं. २ पार्वती. ३ अमृत. ४ साधेपणांत. ५ नवीन, अपूर्व.

नक्षत्राचे हिरे जे वसनिं जडले फेंकून दिधले
कीं दावाया मुखातें विरमालिमनीं लाजोनिच पळे ॥४॥
पुष्पाच्या सौरभाला अनिल[1] बहुनीं धांवोनि पुढती
संपादी स्वागताची यशकृति अधीं तैसे तरुतती-
स्वादू पुष्पें फलेंही हरखुनि उषे-प्रीत्यर्थ लुटिती
पक्षी आनंदगीतें सुघनविटपीं[3] बैसोनि म्हणती ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार चैत्र शु. १४ शके १८५१ ]

---

क. क्र १६८ "सुरसा"

१६७ वें वृत्त—सुरसा ७+७+५ = १९
SSSSISS-IIIIIIS-SIIIS म र भ न य न ग

आकाशाचें जिचें कीं सदन सुखदसें रम्य सुरसा
राहे, वागे तिथें जी अविरत विहरे सुंदर रसा
स्रग्पुष्पें, द्रव्य, धेनू वसुमति जवळीं काय न वसे?
स्वर्गाहूनी नको ते मरुनि मिळविणें, सौख्य नवसें ॥१॥
आम्हां तें प्राप्त येथें चिररुचिरसा दिव्य सुरसा
जन्माचा जो अभागी अमरपद म्हणे सौख्यद, पिसा
मृत्यूच्या भीतिनें तो अवनिस गणतो घोर अहिसा
खोटे सारे सदाचे अमरपुर नसे, नाहिं तमसा ॥२॥
मेल्यानेंही न जातें अधिकचि मिळतें सौख्य जगतीं
उत्क्रांतीतत्व आम्हां पटवित तरि ना सोडि सुमति
पर्णा-पुष्पादिकांनां अविरत बघतो नित्य नव ते
आत्ताचें-कालचे ना मुळिंच आम्हि—असें शास्त्र वदतें ॥३॥

---

१ वायु. २ सुंदर, मधुर, ३ दाट फांदी.

ऊर्वीनाविन्यभोगां क्षणिक गणुनियां लोभ अवरी
भाग्याची ती विभूती–पद्रजाहे अम्हां पावन करी
कैवल्यानंद ऐसा म्हणवि बुधजनीं तोच भजनी
कानीं ऐकोनि ठावे, प्रभुवर ! कधि गा ! देशिल झणीं ॥४॥
येई तो प्रत्ययाला कधि कधि कवनीं–वाटत असें
ठावे ऐकोनि हेंही फिरुनि परत तो येतहि नसे
त्या धामां ज्याक्षणीं जो लवहि चिकटला होइ तिथला
विश्वव्यापार त्याचा–मग न म्हणुं शके–कोण, कुठला ॥५

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार चै. शु. १४ शके १८५१ ]

---

१६८ वें वृत्त—सुवृत्ता— ] ६+६+७ = १९ अक्षरी
–१६४ वें ,, मेघविस्फूर्जिता ] मेघविस्फूर्जिता क.क्र. १९१पहा

---

क. क्र. १९९ "गीतिका*"

१६९ वें वृत्त—गीतिका वीस अ. ५+७+२०

IISIS-IISISII-SISIISIS स ज ज भ र स ल ग

अशि गीतिका तव गाउंदे प्रभु ! गात गात उगी बसूं !
स्वर उद्भवे तव जन्म होउनि-संपतां निघु दे असू
मधु भूत तो, कटु भावि कालहि, कांहिंही नच आठवी
स्मृतिविभ्रमीं मन चित्त वाहुनि वर्तमानिंच साठवी ! ॥१॥
कधि गायनीं रमलें यदा मन भावना विसरो झणीं
नित गाउंदे, मम जाणिवासहि जाउंदे मज सोडुनी

---

*प्रकाशन स्थल व कालः—तत्त्वज्ञानमंदिर अक्टोबर १९३१अं.४१
वा. आश्विन १८५२ (पृ.१)

कशि गीतिका? कुणि गातसे? कधिं? शब्द त्यांतिल वा ध्वनी
सकलांतुनी निजशुद्धि जाउनि-गानरूपाचे होउनी ॥२॥
निजगायकासह गीतिका नच अल्पहीं ध्वनि काढुनी
रमु दे प्रभो! किति कल्पही जरि लोटले तरि गायकीं
नच दीर्घ कीं, लघुही तशी, मधु मध्यमा अशि गीतिका
कधिंही जुनी नच होउदे! नित गाउंदे तव भाविका! ॥३॥

शालीबंडा, हैद्राबाद द.
सामवार फा. व. ७ शके १८५०

---

क. क्र. १७० "सुवृत्त"

१७० वें वृत्त—सुवृत्तम् वीस अ.

ऽ।ऽ।ऽ।ऽ।-ऽ।ऽ।ऽ।ऽ।ऽ।ऽ। र ज र ज ग ल

श्रीप्रभूस गात नित्य, ईशनाम ज्यांत येत तें सुवृत्त
लौकिकीं वदे तसेंच वर्तनांतही यदीय तें सुवृत्त
अल्प ना खपे असत्य ज्या-असाच नित्य आचरेल सत्य
तोच सत्य नीतितत्व दाखवूं शकेलही जगास नित्य ॥१॥
चित्तिं बाळगे सदैव सर्वभूतिं जी दया तयामुळेंच
होउनी बसे दुजास नीति आचरावयास कर्स तेंच
शांत राहि सार्वकाल संकटस्थितींतही न होत क्रुद्ध
ध्यानधारणाप्रकार त्या असो नसो तदीय कर्म शुद्ध ॥२॥
कोणि त्यासही गणेल कीं, असे तदीय तो स्वभाव एक
मार्गदर्शि होय तोच कीं तदीय सत्कृती जनां अनेक
हें महत्व त्यांतलेंच अद्वितीय जें असें वसें तयांत
त्यामुळें मिळेचमान आजही तयास या अशा जगांत ॥३॥

श्रेष्ठ जेविं वागतात नित्य तोच यत्न कोणि एकवेळ–
कष्ट फार घेउनीहि साधिल्यास तेहि तत्क्षणीं निमेल
धन्य ते तरीच लोकिं नित्य वंदनीय होति साधु संत
ते दिगंत कीर्तिवंत देहही निमे तरी सदा जिवंत ॥४॥
विश्व हें कुटुंब ज्यास तो तदीय पोषणार्थ साधि कर्म
प्रेम, काम, स्वीयभाव सर्व राखुनी तदीय भावमर्म
जाणुनी अधींच तेंच तेंच उत्सुकें करीत नित्य कर्म
तोच तो खरा अलिप्त धन्य हेंच तें अहेतुकर्मवर्म ॥५॥

प्रभुहरबार शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार का. व. ५ शके १८५१

---

## क. क्र. १७१ "सुवदना"

१७१ वें वृत्त—सुवदना—७+७+६ = २०

SSSSISS-IIIIIIS SSIIIS म र भ न य भ ल ग

दिव्यालंकारवेशा विविधरसयुता देवी सुवदना
सौंदर्याधारभूषा त्रिभुवनविदिता आपत्तिकदना
विश्वा आनंददायी कविजनसुखदा भक्तां सुफलिता
ऐशी जी मायधात्री जणुं सुरभि दुजी कीं दिव्यकविता ॥१॥
दृष्टी जेथूनि हाले नच लवभरिहि दूजे न बघते
वृत्तीतल्लीनकालीं बघत बघत ती सौंदर्यि मुरते
जीवांच्या नित्यशोका सहज विसरुनी आश्चर्य गमतें
जों जों पाहे दिसे ही नव मधुररसा चित्तांत वसते ॥२॥
पाहे जें एकवेळां नच चुकुनि पुन्हा तेथें मन बसें
किंवा येतो कितीदां अनुभव उलटा, ऐसेंहि गवसे–
चांचल्याची स्थिती ही–निज मनाचि खरें–ऐसें जरि गमे
नाविन्याच्या सुखाला मग मनुज मुके कोठेंहि न रमे ॥३॥

स्थैर्यें कंटाळतो जो-त्वरितगतितही तो सत्वरि थके
कालाचेंही जिथें कीं स्मरण नच असे तें पाहि कुतुकें
सर्वांना आवडे हें-मिळवुं म्हणत तों तेथेंच हरवें
ऐसें सोपें नसें तें-चुकुनिहि लव मिळे-तेंही न वदवे ॥४॥

मोठ्या भाग्योदयाचा दिवस जरि म्हणूं-होतोच रवि तो
ब्रह्मांडाला प्रकाशीं द्युतिमय बनतो दूजा न उरतो
नैसर्गें वावरे तो शुभशकुनचि कीं वाटे मग जनां
जैसा अत्यंत हर्षे उदयिं कुणि बघे कोणा **सुवदना** ॥५॥

शालिबंडा हैद्राबाद द.
मंगळवार चै. शु. १५ शके १८५१ ]

---

क. क्र. १७२ "नन्दनवन"

१७२ वें वृत्त—धृतश्री
१७३ वें ,, पंचकावली
१७४ वें ,, सरसी ] एकोणीस अ. ७+७+७ = २१
IIIISIS IIISIIS-IISISIS न ज भ ज ज ज र

किति तरि दिव्यसें अतुल निर्मियलें त्रिजगांत **नन्दन**[१]
अनुपम सौख्य तें गमत ऐकुनियां जरि हर्षतें मन
इहसुख जें इथें पदरिं आज असे तरि कां अमुत्र[२] तें
मधुहि उद्यां मिळे पटत सत्यहि तें तरि चित्त धांवतें ॥१॥

नवल गमे किती मनुज कल्पकही म्हणवीतसे जगीं
वरुनि कुकल्पना करुनि घेत असे अपुलें हसें उगी
धडपडतो सदा त्यजुनियां करिचें पळल्या धरावया
हर ! हर काय हा शिशुसमान वृथा निज घालवी वया ॥२॥

---

१ इंद्राची बाग. २ परलोक.

कारिताचि कल्पना नचसुटे तरिही व्यवहारबुद्धि ती
जडलिच खोड जी–हृदयिं जन्मभरीं नच नीति आणिती
मिळत सुधा तिथें अतुल दिव्य अशा ललनाहि त्यावरी
सविषयकुंपणापुढति ना सरडा जरि धांवला तरी ॥३॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार चै. शु. ६ शके १८५१ ]

---

## क. क्र. १७३ "प्रभु येवढें करी"

१७२ वें वृत्त—धृतश्री
१७३ वें ,, पंचकावली ] ७+७+७ = २१
१७४ वें ,, सरसी ||||SIS|||S||-||SIS|Sन ज भ ज ज र

म्हणाति कुणी असें स्वपरमेश्वर कीं वसतो सदा इथें
म्हणुनि मधीं मधीं वचुनि पंचमुखीं वदतोहि सत्पथें
अचुकपणें जगां सहज सांगवितो भवितव्यही किती
नकळत हातनी वस्तसे, पटलें कितिदां न त्या मिती ॥१॥
परि न कळे मुखा कुलुप घालुनि कां बसला प्रभू मुका ?
तशि न अता घडे, प्रतिति मंद पडे जगिं आजकाल कां ?
तुरल्हि शांति ती कितितरी वसुधा आजि फार कावरी
तरिच अहा ! स्फुरे, प्रभुच सांगतसे?—"लिहि पंचकावली"२
हळुंच कधीं असें हृदयिं वाटतसे—करि कार्यही तसें—
जरि कुणि अल्पसे मग अशक्य असें जगिं काय तें असे ?
म्हणुनि उगी वसे प्रभुहि आज तनें गमतें तुम्हां कसें—
समजुं हळूंचसें—जणुं विचारितसे प्रभु तोच तो असे ॥२॥
चरण पिपीलिका करुनि धांवलियां गिरि पोखरूं तरी
सहज पटे मनां परि जुटी तशि ना घडते जनांतरीं

---

१ दैव, नशीब.

तसलिच दिव्यशी शिराले शक्ति जरी लवही अम्हांत ती
उलथुनि पाडुं कीं दुरितदुर्ग[1]हही हिमसाम्य[2] त्य[3] तती ॥४॥
धडपडतांच कीं निघुंच सत्वरि या दुरवस्थितींतुनी
जनमतिसंघ हा जुळवि, बीज तसें रुजवी झणीं मनीं
पसरविशी हृदीं सरलता, निशी सरसीं[4]—सरसीरुहें[5] तरी
अगणित सारखे भरुनि जातिल कीं प्रभु येवढें करीं! ॥५॥

मैलारदेवपल्ली. हैद्राबाद द.
शनिवार महाशिवरात्र(माध्यान्हीं)शके १८५०

---

## क. क्र. १७४ "सर्वव्यापी असा तूं"

१७५ वें वृत्त—स्रग्धरा एकोणीस अ. ७+७+७=२१
SSSSISS-IIIIIIS-SISSIS म र भ न य य य

देशोंदेशीं फिरावें म्हणत निजमुखें केधवां भेटशीं तूं'
चित्तीं वाटे प्रभू! गा! घरिंहि पुरविशी आमुचा हाच हेतू
चित्तस्वास्थ्यां मुकावें तरिहि उगिच कां घालवावें वयाला
कालक्षेपाहुनी तें-अधिक मिळविलें काय सांगावयाला? ॥१॥
जातों जों जों कुठेंही अविरत दिसशी तूंच तों तों सदाचा
थारा ना कल्पनेला, मतिस नच गती, काय कोठील वाचा?
नानावेशें नटोनी अविकृतविकृतें भासशी सर्वही तूं
केव्हां, कोठें, कसेंही दिससि तरि म्हणों—'तोच आजाहि नातू ॥२॥
लोकांना जें म्हणावें 'सदनिंच बसुनी कांहिं ना साध्य केलें'
केल्यां ता प्रश्न आम्हां, म्हणुं आम्हिं:—"अजुनी चित्त आहे भुकेलें"
धांवावें दूर जों जों प्रभुवरहि गमे होतसे दूर आम्हां
विश्रांती ना क्षणाची चुकुनिहि लभते त्यागितां स्वीयधामा ॥३॥

---

१ दुर्जय संकट २ हिमालयासमान, ३ रांग, समूह. ४ दैन्य. ५ तळ
६ कमळ.

ठायीं ठायीं फिरावे हृदयिं ठरवुनी—कांहिं नाविन्य पाहूं
पाहूं जातां गमे कीं मनशशिस गिळी पूर्ण उद्विग्नराहू
ज्या ज्या मार्गी रिघावें अधिकचि अधिकें चित्त संत्रस्त होतें
"यात्रा केल्या"असें जें स्वजनिं म्हणविल्या ना कळे काय हो! तें ४
कोठे विष्णुस्वरूपीं दिसशि तरि कधीं श्रीमहादेवरूपीं
जैशी गंगा म्हणावी-लघुजरि सरिता, कूपतें ज्ञानवापी-
तैसें नानामिषें तूं प्रभुवर! वससी एकला सर्वजागीं
सर्वव्यापी असा तूं तरि न उमजती तेच मोठे अभागी!! ॥५॥

---

## क. क्र. १७५ "बहुरत्ना"

१७६ वें वृत्त—अमृतध्वनि बावीस अ. ४+७+७+४ = २२

SSIS-IIISSIS-IIISSIS-IIIS

हा कालचा तरणि आकाशिं ये फिरुनि तैसाच कीं तळपतो
जो त्याच त्या क्षितिज दिग्भालिं कीं उदित होवोनिया झळकतो
रश्मी तशा हळुं गवाक्षांतुनी शिरत ढुंकोनियां—परि रित्या—
जाती, पुन: परत जेथोनिकीं पळत आल इथें त्वरित त्या ॥१॥
आला तसा परत त्या पाउलीं सतत जातो तयां शिणवित
येण्यांतला कळत हेतू न तो, फिरत कां हात ही हलवित?
आहेत ही कर हजारों जरी तरिहि कांहीं न कीं करितसे
जें काय तें घडतसें—तापवी जगत-तें ही निशीं शमतसें ॥२॥
पृथ्वी जरी दिसत व्योमांगणीं सतत वाटे तशी फिरतसे
फेरी तिची परि म अत्यल्प ही विफल, झाले कधीं नच तसे
साक्षी जरी नयन देतीच कीं,-'वसन हें कालचें अजि वसें,'
तैसेंच कीं सहज त्या पाहतों किति तरी जीर्णसें दिसतसें ॥३॥
तम्दावनें दिसतसे आंतलें जणुं अलंकार ते कधिं कधीं
माला कधीं, कधिं हिरे, मौक्तिकें अतुल माणिक हो मधिं.मधीं

तीं कचुंकी हरित पीतांबरीं दिसत सौवर्ण तो पदरही
हाले जसे झळकतानां दिसे विविध वर्णा अशी जणुं मही ॥४॥
येतां रवी कनकसे सारखे मुगुट घालीतसे तरुशिरीं
पक्षी मुखें मधुर गीतें किती म्हणविते, स्वागता जणुं करी
नेमें जणूं विमल तेजें दिनीं धवलवस्त्रांतरीं झळकते
काळीच कीं निशिथ कालीं धरा सकल वस्त्रें पुन्हां बदलिते ॥५॥
सौंदर्य ही अढळ कीं, यामुळें अजुनि तें राहिलें जगतिं या
वृद्धा जरी गणुं शके ना कुणीं कितिक ते जाहले दिन वया
आहे अशीतरि इच्या अंतरीं अमित वैशिष्ट्य का महति ती
नाविन्य ही वसतसे, नित्य जी म्हणविते नूतना वसुमती ॥६॥
कालाचिया सतत जातीं मुखीं तरिहि रत्नें अशीं प्रसवते
विश्वांतरीं कितिक सत्पुत्र ही आजि इचे नांदती अतुलते
थोडे जरी दिसति बोटांवरी चुकुनि, त्यांच्यामुळें अजुनिही
सर्वांमुखें सतत-केंव्हांहि कां न-बहुरत्ना अशी म्हणवि ही ॥७॥

शालीबंडा हैद्राबाद द: ]
शनिवार माघ शु ७ शके १८५० ]

---

## क. १७६ "बंधू"*

१७६ वें वृत्त—अमृतध्वनि बावीस अ. ४+७+७+४ = २२

SSIS·III SSIS·III SSIS·III S त भ य ज स १ न ग

प्राची दिशा उजळवी ही उषा पिकत वाटे हंशा दशदिशीं
गेली निशा निपटुनी ना-तशा समयिं जी दुर्दशा किति? कशी?—
होते सदा विपिनिं ती पाहुनी वदुं शके कां कुणी क्षणभरी
ईशा ! अहा ! घनतमीं, यामिनीं दिसुनि येतें झणीं तुजंतरीं ॥१॥

---

*प्रकाशन स्थल व काल:—"यशवन्त" मासिक.अ.२३ अक्टो. १९२३

सांगों अम्ही तुजाशि कांहीं जरी सकल ते ऐकुनी निजदया—
आम्हांवरी करिशि तेव्हां न कां बघाशें रात्रीं अहा! विपिनिं त्या?
तेंही तुझें म्हणविती हिंस्र जे पशु अरण्यांतले, परि पहा:—
व्हावी अधीं हरिण इत्यादि त्या गरिब प्राण्यांवरी तव दया ॥२॥

रानीं तशीं नगरिं नाहीं स्थिती-अधिक ही त्याहुनी प्रखर ती
तेथें तरी नच सजातीय ते वधिति व्याघ्रदिकां मृगपति
येथें पहा मनुज लोभामुळें सहचरां फाडितो मदनरवें
मेलों जरी अरि तयाचा तरी फिरुनि मारी दुजा, न हरिखे! ॥३॥

कोठेंहि ना दिसुनि आले तुझे नयन कोणाचिया नयनिं ही
तैसेंचकीं श्रवण ते ना जरी-करिशि सारेच तूं श्रवण ही
देशी अहा! निजदयें दिव्यशी श्रवण जोडी कशी सकलिकां!
तैसे तया नयन देवोनियां करिशि मोठी दया! तरिहि कां? ॥४॥

'लोभामुळें' नसुनि हे हिंस्रही करिति हिंसा किती वरि वरी
—'द्वेषामुळें' कधिं कुणी खूनही करिति निःशंक ते किति तरी
—'जातीमुळें' कधिं विजातीय ते वधिति साधोनियां अवसर
एकाच कीं नगरिं राहोनियां म्हणविती बंधु ही! हर! हर! ॥५॥

"धर्मामुळें" कधिं अशी क्रूर कीं कृति घडे-अंश ना वदवते
व्याघ्रादि त्या पशुसही लाजवी आजि अमानुष्य हें जगपते!
जो आपुल्या सदनिं राहे सदा बसुनि ढुंकी दुरी नच कधीं—
शेजारिंही-चुकुनि स्वग्रामधीं-तरिहि दूजा तया उगि वधी!! ॥६॥

हें पाहवे जरि तुला ईश्वरा! मग कुठें आसरा त्रिभुवनीं!!
आम्हीं जसें नगरिं राहोनियां समरिं आहों-तसें घनवनीं
दारीं, घरीं-त्रिपथिं-एकाच कीं समयिं-राहून मानस असें—
होतें त्रिधा-परि अम्हां पाहुनीं म्हणति त्रेधा-कुणी उडतसे ॥७॥

कैसा असा रुजविला धर्म ! कीं मनुज धर्मासही विसरती !
ज्याच्यामुळें बहकुनीयां खुळे अतुल मानव्य ही हरविती
काळीज कीं सतत येतें मुखां परत कष्टें तया गिळुनियां
लागे सदा हृदयिं आणावया फिरुनि गांभीर्य वा निज नया ॥८॥

रविवार माघ शु. ८ शके १८५०
१७-२-२९ इ. ]

---

क. क्र. १७७ "मंदारमाला"*

१७७ वें वृत्त—अश्वधाटी
–१८० वें मंदारमाला ] बावीस अ. ४+६+६+६=२२
SSIS-SISSIS SISSIS-SISSIS
त त त त त त त ग

सयत्न हा वृक्ष-राहील जो दक्ष ठेवोनियां लक्ष त्याच्यावरी
त्याला फले तूर्ण, निःसंशयें पूर्ण वाढे जरी—जीर्ण ना तो तरी
भूमिवरी वाढुनी सत्वरी डोलतीं अंबरीं उंच त्याचीं शिरें
हें पाहती नित्य जे संप्रती ना कळे तन्मती कां न यत्नीं शिरे॥१॥
सातत्य हें दिव्य पीयूष ! जें ना मरूं त्यास दे कांहिं झालें तरी
कार्यी चवी नित्य तें वाढवी ना सुधेला कधीं येइ त्याची सरी
वाटे मनीं 'श्रेष्ठ त्याच्याहुनी यत्नचिंतामणी मानवा लाभला
तेव्हां कुणी त्यास चित्तांगणीं कां न ठेवी झणीं-होइ लोकीं भला २
चिंतामणी ना कुणाला हवा ? सद्यशाचा दिवा तोच आहे जनीं
आहे जसा स्वर्तरू दिव्यसा 'श्रेष्ठ' बोले रसा 'यत्न हा त्याहुनी'
तो साधिल्यां धन्यतो एकला होइ लोकांतला-बोलवी आगळा
वाटे-खरा-यत्न जो साधिला-घालि **मंदारमाला*** तयाच्या गळा॥३॥

---

*पत अमृतध्वनि किंवा अश्वधाटी म्हणतात(समग्र पंत ८ पृ.५१पद्य!)
व वृत्तदर्पणांत "अश्वधाटी किंवा मंदारमाला" असा उल्लेख आहे.
*येथील यति भंग अपरिहार्य आहे.

क. क्र. १७८ "काय करें?"

१७८ वें वृत्त--उमा ] बावीस अ. ६+६+६+५ = १२
-१८१ वें „ मदिरा (१) ] SIISII-SIISII-SIISII-SIIS
भ भ भ भ भ भ भ ग

'जाशि कुठें? वद' "काय म्हणूं तुज! कोणि असा कधिं का पुसतो?
जाइ अतांच न वेळ बरी नच हा घटकाभर कीं बसतो—
कोण उडे आजि पंतघरीं नव धांदल! जाहलें हो! मुलगी!
आणुनि साखर वाटुं घरोघर थांबविले तव येथ उगीं" ॥१॥
'आज कुठें?' "छट-काय बुवा तुम्हिं फारच लोचट, कालच ना?—
सांगितलें:-शुभकार्यि निघे जंव ना हटका, नच कांहिं म्हणा!
हा बसतो क्षण नंतर सांगिन,—कांहिं शुभाशुभ नाहिं तुम्हां
पत्रिकळें:-चिमुताइस पुलहि—कां हंसता उगि? काय अम्हां?" ॥२॥
आज पहा शिशुवाढदिनीं किति थाट उडे! आजि तोच पुन्हा
बाहुलिलग्नहि! चौल कधीं, मग जावळही, कधीं मुंज म्हणा
तीच वधू, वर तोच असे, आजि लग्न ठरे-किति मोद वसे!
व्याहि विहीणिस कीं फुगतां मग व्योमहि वाटत दाटतसे ॥३॥
शोभनही, मग डोहळजेवण-प्राशन योगाचे उच्च असे!
नातुमुखासहि पाहत सत्वर पंत गृहीं मग विश्व वसें
तोच घडा जरि पंतसुपुत्रहि योग्य दशेंतहि घेत असे
तोंहि फिरोनिच आपण घोकित, पंत परंतु न स्वस्थ वसे ॥४॥
नातुवरी मन, देव घरीं क्षण एक तरी दिनिं नाच बसें
नाहिंच पूजन, पोथिहि वाचन, आन्हिक कोठुनि होत असें?
आसन, मार्जन, याजन अर्चन, ध्यान, विसर्जन काय करें?
वंदन, तर्पण, ध्यान न चिंतन, मांडण तांडण वाढतसे ५॥
बोलुन बोलुन-दांतहि लासुन पंतमुखांतुनि जाति जसे
ऐकुन ऐकुन-कानहि त्यागिति, नाक हळू हळुं लांबतसे

पाहुन पाहुन-नेत्रहि मागुन जाति-घरीं मग अंध बसे
घालुन पाडुन-दांच जुनी परि जीभ अजूनिहि गर्जतसे ॥६॥
दिव्य असें सुंदरसें किति ध्यान अहा! नव हें दिसतें
लोभवलें परि पंतहि होतिच कीं युवकाहुनि थिल्लरते
इंद्रिय एकहि शाबुत ना तरि, नित्य नवें मन होत असें
धांवतसे मग हांव हि त्यांतुन ती अधिकाधिक वाढतसे ॥७॥
पंतसभोंवति कालहि संतत संथ फिरे तरि ना विसरे
स्वर्ग तसा नच दूरहि फारच, दोन-न एकचि बोट उरे

* * * *

तोंच पुन्हां मग फार दिसांवरि पंतसहोदर येत दिसे
भान न राहुनि प्रश्न उफाळुनि येत जुना तंव **काय कसें?** ॥८॥
"काय वदूं तरि-बालक फारचफार रडे तरि शुद्धि नसे–
माइस अल्पहि, तत्पितयासहि फार बरें नच-पंत तसे–
आठवडाभर आज उद्यांमधिं-ते घटकेवर येत असे...."
तोंच वदे मग येउनि चाकर "हाय वदूं तरि-**काय कसें?**"॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
सोमवार माघ शु. ९ शके १८५० ]

---

क. क्र. १७९ "भद्रक"

१७९ वें वृत्त—**भद्रक** बावीस अ. य. पा.

SIISISIIISISIIISISIIIS भ र न र न र न ग

**भद्रक** हे प्रभूचरण ध्यात जो नित तयास भद्र करिती
रक्षिति तन्महत्त्व अधिं, मंगलास शिकवीति **भद्रकरिती**[1]
भक्तिपथावगाहक असो, नसो, म्हणवि भक्तही तरि, दया–
त्यावरि ठेउनी निजकरें, धरोनि पथिं चालवी मग तया ॥१॥

---

१ कल्याणकारक.

शक्त करोनि पूर्ण यश आधिं तत्पदीं बांधितो, करवितो—
कार्य तयाकडोनि, मग कौतुकें बघत आपणां रमवितो
ब्रीद असेंच चालवि जगत्रयीं—सतत भक्तकार्य करणें,
बोलवुनी स्वभक्तवच बोबडे तरि सुधेसमान गणणें ॥२॥
भक्तमनोरथास पुरवावया हृदय आर्द्र संतत वसें
एकचि चित्त आणि मन त्यास कीं चरणयुग्म[1] पूरक असे
भक्तमनोरथोम्द्वहि भक्तवत्सल अधींच दिव्य करवी
कौतुक कोड सर्व पुरवोनि मातृहृदयासही विरमवी ॥३॥
वत्सलपुष्पसौरभ दिगंत जो भरुनियां उरे जगनिं या
तत्कमनीय[2] दिव्यचरणांबुजांतिल पराग वर्षवि दया –
श्रीप्रभुकल्पवृक्षविटपाश्रितास कमि काय तें त्रिभुवनीं!
एक वसे प्रभूच्च यदि सत्तलोक वसतीच चित्तसदनीं ॥४॥
सत्प्रभुनाम ऐकुनिच अंगणीं, सदनिं मद्धृदीं वसतसे
मगल**नाम** तद्यश सदैव गातअसणेंच आवडतसें
स्फूर्तिद तो, तसेंच परिपूरकत्वहि तयाकडेंच असतें
दाउनि नाममात्र मज गाववी म्हणुनि **नामकार्य** घडतें ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार चै. व. २ शके १८५१ ]

---

१८० वें वृत्त—**मंदारमाला** ] बावीस अ. ४+६+६ = २२
–१७७ वें „ **अश्वधाटी** ] "**मंदारमाला**" क. क्र. १७७ पहा!

---

१८१ वें वृत्त—**मदिरा** ] बावीस अ. ६+६+६+४ = २२
"**काय करूं?**" क. क्र. १७८ पहा!

---

१ जोडी. २ रमणीय.

क. क्र. १८० "**वाक्सेवा**"

१८२ वें वृत्त—**हंसी** (२) बावीस अ. ८+१४=२२

SSSSSःSS-||||||||||||||SS म म त न न न स ग

या दिनाची ही **वाक्सेवा** प्रभुवर परतर सुखकर देवा !—
ध्यावी, त्यायोगें उद्धर्ण्या यशकर तवकर झडकरि दे, वा—
रक्षी माते ऐशी इच्छा नच कधिं चुकुनि ममहृदयिं होते
येतें चित्तीं जें तें ऐसें—लवतर अतितर सकल तुझें तें ॥१॥
जेव्हां जें जें होतें जातें तुजविण वदुंतरि मग कवणां तें?
भोक्ता, श्रोता, भ्राता, कांता, जनक, जननि, नुरविशि लव नातें
त्या सर्वांच्याजागीं माझा मग सहजचि प्रभुवर ! उरलाशीं
जें कां हातीं येतें त्याचीं तरिच तवचरणिं उभवित राशी ॥२॥
कोठें ठेऊं ? कां तें घेऊं ? कुठुनि ? मज जवळिं कितितरि ओझें !
द्यावें आधीं कां—जें झेपे नच ? करित परत तुजशिंच तूझें !
नाहीं कोणीही सत्तेचे, सुख, असुखहि वदुंतरि कवणांशी ?
त्वद्योगें नासे? नासूंदे ! जंव उरशिं ममहृदयिं अविनाशी ॥३॥

शालबिंडा हैद्राबाद द.
बुधवार चै. कृ. १ शके १८५१

---

क. क्र १८१ "**अद्रितनया**"

१८३ वें वृत्त—**अद्रितनया**
१८५ वें ,, **अश्वललित** ] ते.अ.११+१२+२३ ||||S|S|||S |S|||S|S|||S
म ज भ ज भ ज भ ल ग

निज जनकाघरीं धरितसे सदा किति लघुत्व **अद्रितनया**
अभिनव हें गमे बघुनियां तसेंच किति जाहले दिन वया
तरि नवबालिकासम तिथें अजुनि नित वाहते झुळुंझुळूं
निज पतिच्या गृहीं जंव निघे तरीच मग वाढते हळुंहळूं ॥१॥

---

१ पर्वत कन्या. २ अगदीं नवीन.

गरगर घेत घेत गिरके फिरे हिमगिरीवरी वरिवरी
नच कधिं नाच-नाचुनि थके, दिसे सतत बागडे कितितरी
अविरत काय ही खिदळते ! किती खळखळाट होत असतो !
तरिच सदैव शांत गिरि तो प्रहर्षितमनें ग[1]भीर दिसतो ॥२॥
शिशिरिं, वसंतिं पाझरतसे तदा गमत तो हिमालय असा
बघुनि उन्हास वाटत तया न सोसवत बालिकेस सहसा
कितितरि कष्ट होति तिजला झुरे म्हणुनि तेधवां, शिशिरिं तो
परि अधिकाधिकेंच बघुनी इचें खिदळणें नितांत थिजतो ॥३॥
बघत पुढें पुढें जंव दुरी अम्हांस दिसते गभीर असली—
विरघळवीत जी निघतसे कितीक अघशैल[2] पाडुनि जलीं
सुलभपणेंच मज्जुनि तिथें असंख्य जनता सदैव तरती
निज पतिच्या गृहिं जरि महा ! विशाल दिसते न गर्व धरि. ती
लवहि तिथें महत्व धरिते स्वयें असुनि स्वर्धुनी[3] तरि न ती
विसरुनि आपुल्यासहि महातिला सरित्पति[4]पुढें सदा करि नती
पटवितसे जनास जणुं ही असोनि किति थोर सेवित नया
कितितरि आदि, अंतिं धरिते अवर्ण्य लघुभाव अद्रितनया ॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार फां. व. ९ शके १८५० ]

## क. क्र. १८२ "मदिरा"

१८५ वें वृत्त—मदिरा—ते. अ. SIISII-SIISII-SIISII-SIISS
भ भ भ भ भ भ भ ग ग

कालहि वाटत कीं मदिरा अति झोकुनि झिंगत नित्य नव्यानें
चार किती कुणि भ्रांतपणें करि, नाच विचारहि होइ तयानें
नाचत नाचत नाच थके कधिं ना खळगे नच खाचहि पाही
आज गटारिंच लोळतसे तरि घाण लवेकहि झाडित नाहीं ॥१॥

---

१ खोल गंभीर. २ पापगिरी. ३ गंगा. ४ सागर.

वाटत शुद्धि न राहिलि अल्पहि त्याचमुळें आजि सांवरणेंही—
इच्छित नाहिंच कीं उठण्यासहि घाणींत संतत डुंबत राही
पाहुनि येथिल ही कुदशा मग कां न दुजा कुणि हांसत राहे
आपटतो अधि एक, दुजा मग तोहि हळूं हळुं वाहत आहे ॥२॥

भांग अफूहुनि मादक, मोहक, नाजुक, साजुक, सुंदर राणी—
सर्व जगांतिल मादक वस्तुंत ही **मदिरा** जणु श्रेष्ठ शिराणी
द्रव्यमदें कुणि धुंद दिसे, मग ती **मदिरा** जणुं झोकितसे तो
तद्यश, कीर्तिस पाहुनि निर्मल शुद्ध दरिद्रिहि लोभुनि जातो ॥३॥

जो **मदिरा** अति सेवुनि झिंगत मार्गिं पडे जंव शुद्धिहि जाते
तोच उठें जरि शुद्धिंत येउनि लाजहि वाटत कीं मग त्यातें
ना तरि त्यावरि कोणि तरी करि कींव नसो जरि कांहिंच नातें
कोणि हंसे, तरि कोणि दया करि, नेउनि पोंचवि तत्सदनातें ॥४॥

जो पडतो निज जाउनि धुंदिहि तोच उठे तंव मार्ग दिसावे
घेत जरी नित कीं **मदिरा** जन, कोण कुणा मग काय हंसावे—
—आपुलि पाठ न पाहुं शके कुणि-हेंच बरें खरि ईशदया ती
ना तरि तें निज भेसुर चित्रचि पाहुनि फाटुनि जाइल छाती ॥५॥

क्रोध अहंकृति, लोभ, विमोहन, मत्सर, दंभहि यांत गणावें
ते विषयादिक सर्व विकारहि मादक वस्तुच कां न म्हणावें !
गुंगतसे जन झिंगत राहुनि संतत लोळति पापगटारीं
वाहवतो नर जो अधिकाधिक त्यास तयांतुनि कोणि न तारी ॥६॥

प्रीति असे अति शुद्ध, पवित्रचि तीस जरी जन मानित देवी
प्रेम, शुभाशुभकर्म वसें पश जें मदिरेसम झिंगत ठेवी
धार्मिकवेडहि जें हट वाढवि काढि कुरापत कांहिं न कांहीं
घेइ भयंकर रूप कधीं कधिं मानुषधर्महि लोपुनि जाई ॥७॥

यद्यपि कांहिं-ज्या व्यसनांशहि स्वस्तुतिमध्यहि घातुक होई
योग्य, अवश्यक जे बुध सांगति कीर्तिहि, हांवहि व्यर्थ न जाई
तींच असत्यहि भाषण बोलवि, कृत्रिमता मग आचरवींते
मादक ती जाशि कीं **मदिरा**-ताशि ही असुनी वरि मारक होतें ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार माघ शु. ११ शके १८५० ]

---

क. क्र. १८३ "**शारदारि**"

१८६ वें वृत्त—**मदिरा किंवा सवाई!** तेवीस अ. ६+६+६ = २३
SIISII SIISII SISIII-SIISS भ भ भ भ र न भ ग ग

कोण बरें जगिं मूर्ख असा-जरि इंदिरा सहज आलि तरी तीं—
रक्षणही करुं ना शकतो लव, सर्व घालवित तो विपरीतीं
व्याघ्र गणोनिच धांवतसे यदि कामधेनु उभि ठाकलि पाठीं
आपण होउनि आलि जरी तिज घालवी त्वरित हाणुनि काठी ॥१॥

स्वर्गिहि धुंडुनि ना गवसे कधिं **शारदारि** जगिं एकचि तैसा
त्याजवळीं जरि संतत पंडित, ग्रंथभार बहु, पुष्कळ पैसा
राजगृहीं जरि त्या पदवी, जनिं मान्यता दिसुनि आलिहि भारी—
हा असला जरि मित्रहि होइ, न **शारदारि** कधिंही हितकारी ॥२॥

'गाय अहा! कशि ती कपिला-गृह संपदा सदनिं संतत होती!
कालचि ना किति शोभवि अंगण! आज कां दिसत नाहिं इथें ती?'
"घाण अतीं,ताशिं तीं चिलटें किति, टाळिलें म्हणुनि संकट भारी"
हा असला जरि पुत्रहि होइ न **शारदारि** कधिंहीं हितकारी ॥३॥

"काल जसा-आजि तो जलसा घरिं होउंद्या-फिरुनि तैशिंच पेयें
काय नसे मुळिं ती मदिरा आजि थेंबही सदनिं? व्यर्थ जिणें हें !
कां नच फुंकुनि टाकित ? देइल हें उमेसदन किंमत भारी !"
हा असला, जरि **शत्रुहि** होइल, **शारदारि** मग त्या हितकारी ॥४॥

मैलार देवपल्ली हैद्राबाद द.
माघ शु. १२शके १८५० बुधवार ]

---

## क. क्र. १८४ "कवि–रसिक"

१८६ वें वृत्त—**मदिरा किंवा सवाई** तेवीस अ. ६+६+६+५ = २३
SIISII-SIISII-SISIII-SIISS भ भ भ भ र न भ ग ग

तो कवि ! तो कवि ! ऐकवुनी निज बिंबवी हृदय यत्कवितेचें
भान न राहुनि आ¹नन हर्षित होउनी खुलत सद्रसिकांचें
तोच गमे शशि तन्मनदर्पणिं स्फूर्तिचा उदधि वाढवितोही
त्याचमुळें जणुं लाटहि संतत उंच उंच अशि कीं उसळे ही ॥१॥

तो कवि ! तो कवि ! दाखवि या जगिं कांहिंही करुनि सुंदर रां²का
व्यर्थहि जें जनिं-अर्थ तयांतुनि काढुनी सरस लावित वाक्यां
शब्द तसें मधु आभरणान्वित, मातृका जुळवि तेथुनि जो कां
दाखवितो तंव येत महत्वहि प्रत्ययां रसिक सांगत लोकां ॥२॥

तो कवि ! तो कवि ! नाचवितो महि अंगुलांवरिच संतत लीलें
काय म्हणोनिच दिव्य सभोंवति ईश्वरें गगन हंतरवीलें
मावत सर्वांचि उच्च नवोनव कल्पना तरिच गोवित जातो
श्रेष्ठ न कां मग-पक्ष नसोनिहि त्यासवें रसिक उंच उडे तो ॥३॥

---

१ तोंड. २ पूर्ण चंद्र युक्त पौर्णिमा.

व्योमपथीं शिर, भूमिवरीं पद ठेउनी वसत अक्षितलीं कीं
तो कवि ! जे रवि पाहुं शके नच-दाखवू शकत-तेहि विलोकी
पाणबुडा जणुं तज्ज्ञ बुडे तंव लाभते अतुल रत्न तयांत
नातरि संतत खारट वारिच वालुकानिकर सेवित नित्य ॥४॥

मैलार देवपल्ली हैद्राबाद द.
गुरुवार माघ शु. १३ शके १८५० ]

---

## क. क्र. १८९ "भार तुझ्यावरि"*

१८७ वें वृत्त—सवाई दुसरी ७+६+६+४ = २३

IIIISII-SIISII-SIISII-SIIS न ज ज ज ज ज ज ल ग

अविरत अंतरिं आठवितों तरि आठवतें नच काय असें—
आतिशय सुंदर जें हरवें मम-ध्यास वसे परि तेंच कसें—
अजुनिहि ध्यानिंच येत नसें, मन धांवतसें उगि नाच बसें
अवसर अल्पहि आठविण्यास्तव देत नसें हृदिं लावि पिसें ॥१॥
कधिं कधिं वाटत शोधित शोधित घालवितो झणिं मीच करीं
विसरति घोकित घोकित एकचि शब्द मुलें जशि त्याचपरी
वरिं वरिं सन्निध गांठित गांठित तें चुकवोनिच नित्य पळें
हुडकित राहत घालवितों वय,-अब्द-मितें, दिन तास, पळें ॥२॥
पदरिं असोनिच शोधित कां मग?-वाटतसें कधिं-तोंच हुके
क्षणभरिही नच ऊर्मि वसे हृदिं, जी चमके नच कीं चमके—
पुनरपि शांकित वृत्ति करी मज-दाटतसे मग दाट धुके
हळुं हळुं वाढत तेच भयंकर अंधतामिस्राचि खोल टिके ॥३॥
फिरविशि कां उगि गा प्रभु ! वाटत त्यांत मजा तुज कायतरी !
तळमळतों किति गा ! तवकारण-घालवुं हें वय कोठवरीं?

---

*प्रकाशन स्थळ व कालः—तत्वज्ञान मंदिर एप्रिल १९३० अं. ४४ वा. चैत्र १८५२ पृ. १२. १ वर्ष. २ वीज. ३ गाढ अंधकार.

फिरत फिरूनिहि तेंच तसें नित घेत फिरूं किति रे फिरके !
तरि हृदयीं लव शांति पलैकहि तों चुकुनी कधिं ना फिरके ॥४॥
किति जरि तूं मज चाळविशीं तरि **भार तुझ्यावरिं** ठेउनियां—
रमवितसे मन स्फूर्तिमिषें, हृदिं जाणतसे तव हीच दया
डुलवितसे मज नित्य नवोनव गात असे जव गूण तुझे
अतितर हर्षवि कैंवि वदूं तरि नित्य तुझ्यांतचि मोहि वसे ॥५॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
शुक्रवार माघ शु. १४ शके १८५१

---

क. क्र. १८६ **"माझा प्रभु"**

१८८ वें वृत्त—**तन्वी** चोवीस अ. ५+७+१२ = २४

SIIS-IIIIIIS SIISIIIIIISS भ त न स भ भ न य

कोण अहा ! ही जणुं सुरललना सुंदरि सुंदर अतितरतन्वी[१]
स्वर्धनु[२] किंवा चमकत चपला, भ्रुकुटि वक्र जणुं सशरधन्वी[३]
दृष्टि जयाची जशि दिसत तया मद्धृदयीं परि वसत निराळी
सुंदर जो कां तिजहुनिहि असे तज्जनकासचि बघत निरांळीं[४] ॥१॥
विश्वकुटुंबी जवन[५] पवन तो जीववितो अवनिवरति जीवां
कैंवि तयाची द्रुतगति गणवे कोठुनि कोठवरि फिरत केव्हां
रक्षणकार्या अविरत करतो काय तया फल मिळत असावें !
कां श्रमतो तो ? किततरि जनते कारण ? कोणिं लवतरि वदावें ! ॥२॥
प्रेमभरानें उपवनिं वनिंही मुग्धकळीस पवन कुरवाळी—
वाढवि त्याते, तंव मधुकरही गाउनि तन्मुखिं खुलवित लाली
खाउनि स्वस्त अगणित किति त्या वाढवितो तव काळि खुलते ही
वत्सलतेची महति न वदवे काय कसें तिळभरतरि तेंही ! ॥३॥

---

१ नाजुक स्त्री. २ इंद्रधनुष्य. ३ शरासह धनुष्य ४ आकाशांत. ५ वेगवान्.

तज्जमकाते जंव मम हृदयीं आठवितों कितितरि गमतो तो
व्यापक ऐसा-नच वदवत तें अल्पहि, कल्पक हतबल होतो
तद्दलयाच्या अणुंत अमितशीं सांठवुनी फिरत असति विश्वें
कार्य जयाचें ध्वनि म्हणवि तरी काय तदंशहि कवनिं न यावें ॥४॥
काय वदावें! उगिहि न बसवें हें नम जें नच वदवत कोणा
जो **प्रभु माझा** सहजगत तया स्वोदरिं वागवि सुरनरराणा
पंचहि भूतें भरभर फिरतीं संतत लोळति चरणि जयाच्या
तो मम चित्तीं अविरत वसतो! कायतरी म्हणुं-शिणवि न वाचा ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार फा. शु. शके १८५० ]

---

क. क्र. १८७ "**छाया**"

१८९ वें वृत्त—**क्रौंचपदा** पंचवीस अ. ५+५+८ = २५

SIISS-SIISS IIIIIIII-IIIIIIS भ म स भ न न न न ग

**क्रौंचपदा** वा चाष[1], ससाणा[2], क्रंकर[3], गरुड, पिकं[4], कलख[5], चटक[6] या
व्योमचरांची एकवटोनी द्रुतगति जरि आम्हि मिळवुं, तरि वयां
व्यर्थचि वेचूं, साधुं न कांहीं गगनिं, अवनिं, उडुं फिरुं, दमुनि बसूं
लोभ व आशा साध्य न होई धडपड करिताचि हरवूं निज असूं ॥१॥
एक असावें ध्येय सदाचें त्यजुनिच तदितर कृति करित असूं
शक्तहि होऊं साध्य कराया जरि न सफलसुख अनुभवित बसूं
चिंतित कार्यी पूर्णपणानें मिळवुं न यश तरि कृतित नच फसूं
हेहि न थोडें कीं नच झालें चुकुनि कधिंहि लव जगतिं निज हसूं ॥२॥
अल्पहि साधे लोभ यशाचा मधुनिच कधितरि लव जरि सुटला
काय पुसावी ती मग दैना कुणिजरि कळवित यशनिधि फुटला

---

१ करकोचा पक्षी. २ तास पक्षी. ३ करढोकपक्षी. ४ कोकिल ५ खबूतर. ६ चिमणी.

त्या क्षणिं होते जी जगिं शोभा उलट सुलट तशि मुळिंच न अवरे
**तेलहि गेलें तूपहि गेलें** मग मरण मरण तरि अजुनि बरें ॥३॥
त्यागुनि आशा, कार्यिं झटाया, स्फुरण लवभरिहि कधिं नच मिळतें
तीच सदाची ठेउनि वागा चरण-शिरसहित सकळाचि गिळिते
ही निज **छाया** निश्चित जाणां पळत धरूं म्हणत अशि नच वळते
पाठ फिरूंद्या कीं बघुनी घ्या! अविरत दुडुदुडु मग काशी पळते ॥४॥
जाल तिथें ती येइल मागें परि जपुनि सतत सरळपथिं असां
हाणुनि आशा, मारुनि लोभा निजपदिं तुडवित कृति करित बसां
शांतपणानें वागवितांही प्रतितिहि पटविल सहजाचि दिवसां
आश्रय घेते हीच पदाचा गगनपथिं चढत तरणि जस जसा ॥५॥

शालबिंडा हैद्राबाद द.
गुरुवार (मध्यरात्रौ) फा. शु. शके १८५० ]

---

## क. क्र. १८८ "भुजंगविजृंभित"

१९० वृत्त—भुजंगविजृंभित सव्वीस अ. ८+११+७ = २६

SSSSSSSS-IIIIIIIIIIS-ISIISIS म म त न न न र स ल ग

सर्वांनां ठावें, दंशानें मरत म्हणुनि नर न बघे भुजंग विजृंभित
ज्या ज्या स्थानीं ज्याला भेटे परि पलभरिहि न टिकत तया किति तरिभित
लोकीं ऐशी रीती चाले चुकुनि दिसत तरि पळती जिवास जपावया
ऐसेही येथें थोडे कां असति? अहि बघुनि वळती तयास धरावया ॥१॥
काळाचीही लोकीं तैशी स्थिति, गति गणति म्हणुनि त्या भयंकर मानिती
निस्त्रैगुण्यां केव्हांही तो प्रचुरतर गमत असतो म्हणोनिच पूजिती
तद्धर्माते जाणे जो कां उलट अनुकुल करुनि घे झणीं तसला गुणी
त्याच्याशीं तो खेळेसुद्धां, निज उदरभरणहि करी असेल तसा कुणी २

---

१ पसरलेला, परिणाम. २ सर्प. ३ संसारातीत, कामनादिशून्य. ४ पूर्ण, व्यास.

वेत्ते, ज्ञानी, मोक्षेच्छूंच्या श्रमाति सुलभतर करण्या कितितरि सत्पथा
आहे, राहे, वाढे मोठी म्हणुनिच अवनिवराति या अजूनिहि तत्प्रथा[1]
देण्यां शाश्वत्स्वीयानंदा पटविति सकरुणहृदयें हरोनि भवव्यथा
द्वेषत्यागें षड्वैऱ्यांना रमविति सुहृदसम तसे **भुजंगविजृंभिता** ॥१॥

शालीबंडा हैद्राबाद द.
बुधवार रामनवमी शके १८५१ ]

---

क. क्र. १८९ **"एक उत्तर"**

(आठवडयांतून एकदां जेवून जगतां कसें" असें कोणी विचारल्यावरून.)

१९१ वें वृत्त—**दंडक** सत्तावीस अ. य. पा.

IIIIIISISSISSISSISSISSISSIS न न र र र र र र र

अवनिं न अशनाविणें पाहिला कोणिं कोठें असा एकहि प्राण रक्षूं शके
अविरत रसनेंत जो तो पहा लुब्धुनी त्याच बाजारिं कीं आपणाला विके
अनुभविकमतेंहि आहेच कीं सत्य अंशत्वही यांत संपूर्ण नाहीं जरी
करिल कुणिं विचार वाटेलही त्यास-खाण्यास धान्येंच कीं काय विश्वांतरीं? १

मनुज उगिं न बैसतो केधवांही अहोरात्र तो राहतो कांहिं आलोचनीं
इतरजन तदाच कीं जाणती, मानिती, जे स्वतःला दिसे पाहतां लोचनीं
उघड न कळतां करी कार्य ऐसें दुजें एकवेळींच जें चिंत्ति चालें मधीं
नयन बघुशके न ऐसें सदा अन्न खाणें न कां संभवे सत्य कोणा कधीं? २

त्रिभुवनिं कविची घडे ती कशी फेरि जागेवरूनी न हाले जरी अल्पही
पटतहि जडदेहभावामुळें खोंचिते सारखी ही अशी आपणातें मही
क्षणभरि हृदयांतरीं आणिल्यां सूक्ष्मता दिव्य ती शक्ति जी येतसे प्रत्ययां
सहज उलगडाहि होईल याचा कुणीं इच्छिल्यां त्या नको खर्चणेंही वयां ३

---

१ त्याची प्रसिद्धी.

विचरति वनिं हिंस्र मांसाशनें जीवितां रक्षण्यां दीनजीवांस ते फाडिती
कितितरि निरुपद्रवी प्राणि पर्णां, तृणां खाउनी आयु जे आपुलें सारिती
मनुज म्हणवि थोर सर्वांहुनी त्यामुळें वाटतें अल्प कीं सार्थ तें व्हावयां
लवतरि रसनादि लौल्यास सांडूंच कांहीं क्षणाऽध्ययत्याग साधावयां ४

शालीबंडा हैद्राबाद द.
फा. शु. ८ शके १८५० सोमवार ]

---

## क. क्र. १९० "आशंसाषट्क"

१९२ वें वृत्त—अर्णदंडक तीन अ. य. पा.

IIIIIISISSISSISSISSISSISSISSIS न न र र र र र र र र

जगतिं जगति ना कुणीं जीवनीं नित्य जेवावया, स्वस्थ झोंपावयां, सौख्य भोगावयां
सतत झटति सर्वही काहिना कांहिं कार्यास साधावयां आपुल्या घालवीती वयां
कुणि अधि ठरवीतसें काय जें ध्येय तें आपुलें निश्चितें-कोणि त्याच्याविणेंही खुळे-
नित नवसुख इच्छिती चित्ति तच्चिंतनीं यत्नि लागोनियां शांतवीती मना त्यामुळें १

वनपशु, विहगादि सारेच कीं प्राणि जे या जगीं राहती रक्षिती आपुल्या जीवनां
सुख,असुख अम्हां मनुष्याप्रमाणेंच कीं दाविती हर्ष-शोकादि तच्चित्तिच्या भावनां
नगरपशुतरि अहा ! केवढें साह्यही देति जे मानवाला सदा सन्निधीं राहुनी
करिति कितिक मोठमोठालिं कामें अशीं जीं न झेपे मनुष्यास तें कष्टही साहुनी २

गमत कधिं कधीं असें मन्मनीं यामुळें कार्य केल्यासही ना धजे श्रेष्ठता द्यावयां
जगिं जरि जगणें असे मानवां कार्यही काहिं ना काहिं ऐसें करावेंच लागे तयां
लव जरि म्हणवेल तें ज्यांत नाहींच अत्यल्पही स्वार्थ,कीर्तीहि ज्याच्यामनीं ना शिवे
अवनिवरि अम्हां तुम्हां सर्वदा काय जें जें दिसें आज-उंचीवरोनीच सारे दिवे ३

मिणमिणित तरी तशा आपुल्याकार्यदीपास कीं त्याच उंचीवरी नेउनी ठेवतो
कशिहि कृतिअसो तयां सत्वरें चारचौघांत आणावयां आधिं बाहेरि तो धांवतो

अजुनि पुरि न जाहली ती तरी वाटतें आपुलीमोहरी राहवी पर्वताच्या शिरीं
पशुस बघुं जरी अशा दृष्टिनें धन्य ते राहती कीर्तिरोगाहुनी लक्ष कोसावरी ४

म्हणुनि पुरवली तशी हीनता लक्ष-कोट्याधिकें या अशा हीनकार्याभिमानहुनी
प्रभुवर ! तुजलातरी येउंदे कींव कांहींतरी मद्‌धूर्दीची अशी दुस्थिती पाहुनी
सदयकरुणासिंधु तूं एकचा सप्तलोकीं-असें ब्रीद जें गाजवीशीं तया लक्षुनी
करिशिं मजजरी क्षमा त्याचवेळीं घडो हीकृपा:-रोग हा ना पुन्हां उद्भवो मन्मनी ५

जरिहि कधिं पुढें त्वदिच्छावलें प्रेमळांनां यदा वाजवूं देशि जी मद्यशोदुंदुभी
श्रवणिं तरि पडूं न दे.तेहि आल्यास तद्धर्षलेशध्वनी होउं ना देच मन्नभीं
तवचरणिं विलीन हा दीन, बा! दीनबंधो! जसाचातसा राहुंदे कल्पकोटीवरी
हंसत रमत ठेविं काव्यीं, तया नाचुंदे, बागडूंदे, करूंदे सदा कोटि कोटीवरी ६

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार फा. शु. ९ शके १८५० ]

# अर्धसमवृत्त

## क. क्र. १९१ "विश्वाद्यानंगक्रीडा"

१९३ वें अर्धसमवृत्त—अनंगक्रीडा प्र. द्वि. च. अक्ष. ८ गुरु
त्रि. च. च. अ. १६ लघु

**विश्वाद्यानंगक्रीडा** ती[1]
आकाशाची मुख्योत्पत्ति
क्षण गगनपथिं विहगगण विहरति
परि रवि, शशि, महि अविरतचि फिरति ॥१॥

आद्यंताचें कोणीं नेणें
जें भासें-तें-जाणें, येणें
सदसत हुडकित बुधमति बधिरत
मिळविल कशि कुणि सुलभ सहजगत ॥२॥

मायोद्भूताते जाणाया
लागे तद्भिन्नत्वें गाया
अवनिवरि वसुनि तिजाशिं करिं धरित
कधिंहि न कृति अशि मुळिंच घडुं शकत ॥३॥

स्वीयानंदाभिन्नत्वानें
कामक्रीडाद्यंतीं जाणें—
तरिच म्हणुं नच अवनिवरिच फिरत
गगनिंहि, परि नच चलन मुळिं घडत ॥४॥

---

१ विश्वाची पहिली कामक्रीडा.

सर्वांच्या राहोनी चित्तीं
सातत्याची नित्योत्पत्ति
करित सतत विचरत जगत सहित
मम प्रभुवर नच दिसत तरि रमत ॥ ५॥

शालिबंडा हैद्राबाद द.
रविवार फा. व. १३ शके १८५० ]

---

## क. क्र. १९२ "अपरवक्त्र"

वें १९४ अर्धसमवृत्त—अपरवक्त्र ||||||||S ११ न न ल ग
||||S||S|S|S १२ न ज ज र

प्रभु हृदयिं, नित दिसत ज्यां
न **अपरवक्त्र** बघे चुकोनियां
स्वपर, अपर निरसुनियां
वसत परात्पर जो पटे तया ॥१॥

तदितर लव जरि दिसनां
ठरवुनि घे मनिं एकरूपता
अनुभव–निकष[1] करिं धरी
वरि वरि निश्चययत्न तीं करी ॥२॥

श्रुतिवचन, अनुभव तसे—
गुरुवच लक्षित शिष्य तो बसे
श्रवण, मनन सतत करी
मन नच शांकित होय तोंवरी ॥३॥

दिसत जरि विचरत जगीं
तरि नच तो रमतो बघे उगी
मन अविरत हुडकितसे
गणत पटेंलाचि एकरूपसें ॥४॥

बघुनि कुणें वदतिल-'पिसें'
अनुभवितो परि सौख्य दिव्यसें
सुखाचि मनुजविषय असें
म्हणुनिच कीं वच ऐकुनी हंसे! ॥५॥

फायनान्स हैद्राबाद द.
बुधवार का. व. ४ शके १९५१ ]

---

1 कसोटीचा दगड.

## क. क्र १९३ "गुर्जरउष्मा"

१९५ वें अर्धसमवृत्त— आख्यानकी
–१९८ वें " उपजाती (इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा मिश्रण)

अकरा अक्षरी ] इंद्रवज्रा SSISSIISISS त त ज ग ग
उपेंद्रवज्रा ISISSIISISS ज त ज ग ग

गावें म्हणावें तरि चित्त माझें
त्रिशुष्क देशीं म्हणते 'न सजे'
देहासवें या स्थलिं चित्त भाजे
बघोनि **उष्मा** जणुं अग्निलाजे॥१॥

दाक्षिण्य बाजार दिसेल सारा
जिथें तिथें एकाच हा पसारा
तसेंच नारी, नर आणि पोरें
बघूं जयां सर्वहि डावखोरे ॥२॥

अस्वस्थ चित्तामधिं कोण देना !
वदूं म्हणावें तरि सांगवेना
**उष्मे**मुळें स्वस्थहि बैसवेना
रडूं-हसूं? काहिं इथें कळेना ॥३॥

जें रोमरोमांतुनि येत पाणी
नळांतही ये न तसें दिसोनी
घामाविणे ओल न या ठिकाणीं
दिसेल दूर्वा तरि पीत वर्णीं ॥४॥

बाधे न शिक्षा कशिही तयाला
बघेल जो येथिल धर्मशाळा
तो वज्रदेहीच–म्हणा–महात्मा
न राहिली त्याहुनि कष्टसीमा ॥५॥

मु. बडोदा
ज्ये. व. ५ शके १८५३ शुक्रवार ]

---

## क. क्र. १९४ "सत्कृति"

१९५ वें अर्धसमवृत्त—आख्यानकी
–१९८ वें " " उपजाति (इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा मिश्रण)

अकरा अक्षरी ] इं. व. SSISSIISISS त त ज ग ग
उ. व. ISISSIISISS ज त ज ग ग

"संकष्ट लोकांस्तव कोण घेतो
स्वकीर्तिलाभास झटेल जो तो"
ऐसें जया वाटत-हीच गोष्ट
विचार केल्यास गमे न इष्ट ॥१॥

लागेच त्यां कष्ट करावयाला
हवी जया कीर्तिमहत्वमाला

सत्कार्य होतेंच तया कडोनी
लभे जरी एक घडेल दोन्हीं॥२॥
कीर्ती मिळाली जरि दैवयोगें

तयामुळें कष्टहि काहिं तो घे
लाजोनि साजेल तसेंच काहीं
करावयां सत्कृति धांवतोही ॥३॥

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
अ. आषा. व. ५ शके १८५३ रविवार. ]

---

## क. क्र. १९५ "आपातलिका"

१९६ वें अर्धसमवृत्त—आपातलिका SS।।S।।SS ९ त ज य
S।।S।।S।।SS ११ भ भ भ ग ग

ईशें जग निर्मियलें हें
साधक बाधक आधिंच पाहे
जें योजित योग्यचि सारें
कलि, परी नर येत शिसारे ॥१॥
रोगादिक उद्भवितां जे
योजित आधिंच औषध ताजें
लागू पडते किति ऐसे
एक परी शतरोगहि नासे ॥२॥
विश्वांत उपायहि नाना
एक परी कसलाहि ठरेना

रोगें हरिती जडजीवां
काय उपाय अजूनि न व्हावा?॥३॥
होतो जरि शूल कपाळीं
योजुनि कांहिं तरी नर टाळी
तें औषध पोटिंच घाली
इच्छितसे यश मात्र अकालीं ॥४॥
होई नच साध्याचि जेव्हां
कंप सुटे शरिरीं मग तेव्हां
कांहीं दुसरें झणि योजी
घालुनियां घटका मग मोजी ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार फाल. व. ३ शके १८५० ]

---

## क. क्र. १९६ "कर्तव्य"

१९७ वें अर्धसमवृत्त—उदीच्यवृत्ति ।S।SS।S।S ९ ज त र
SSS।।S।S।S १० म स ज ग

कुणीं न कोठेंहि पाहिला
कणींही नच तेविं ऐकिला

सुकीर्तिनें आज राहिला
एका कालें असेल जो भला ॥१॥

क्षणांत माना सहस्त्रशा
एक्या हातिंच पाडिल्या कशा
महत्वही तत्कृतींतलें
साधे तें अजि वाटुं लागलें॥२॥
अगाध ज्यां मान्यता मिळे
माना विश्व जयां तुकावले
जया चिरंजीव बोलती
कोठें ते? दिसती न राहती!॥३॥
जगांत जे श्रेष्ठ जाहले
त्यांचें नांव तरी न राहिलें
दिसे तशांची अशी स्थिती
तथें काय अम्हीं! कसें! किती! ४
अलौकिकत्वांत जें दिसे
कोठें लौकिकखूळ कायसें
अलौकिकाची अशी दशा
कां वाटे नच लौकिकीं हंशा ॥५॥
लहान मोठे नका गणूं
ही कालस्थिति सांगते जणूं
घडेल जें कार्य ज्याक्षणीं
**कर्तव्या** करि एक जाणुनी ॥६॥

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार फा. व. ३० शके १८५० ]

---

क. क्र. १९७ **"कोण बरें"**

१९८ वें अर्धसमवृत्त—उपचित्र प्र. त्रि. च. ११ ॥S॥S॥S।S स स स ल ग
द्वि. च. च. ११ S॥S॥S॥SS भ भ भ ग ग

प्रभुला मजला कुणि भेटवा !
सन्निध नेउनि तत्पद दावा
जरि ना-भवसिंधुचि आटवा
धांवुनि ऐकवितो मम धांवा ॥१॥
बघतां दिसती भलत्या खुणा
श्रीप्रभु? कीं जग?ठाउक कोणा! २
दिसतें भलतें सलतें जरी
**कोण बरें?** वदतो उपकारी
श्रुति ऐकवितें-परि दाविना ॥
नेत्र "बघूं" म्हणती-कारि देना !
मधुनी स्फुरतें-"नच दृश्य हें
जो बघतो नित-नित्यचि आहे" ३

मु. धुळे–(पूर्व–खानदेश) ]
भा. व. १३ बुधवार

---

१९९ वें अर्धसम–वृत्त—उपजाति ]
–१९९ वें ,, ,, आख्यानकी ] "सत्क्रांति" क.क्र. १९४ पहा

## क. क्र. १९८ "स्वार्थ"

२०० वें अर्धसम वृत्त—दाक्षिणांतिका प्र.तृ.च. १४ ISISSISIS ९ ज त र
द्वि. च. च. १६ ISISSSISIS १० ज म ज ग

जगांत **स्वार्थास** जो मुके
तदा परार्थाच्या पथीं झुके
सदा कदा **स्वार्थ** बाधतो
कुणां परार्थामाजि साधतो ॥१॥

समाजकार्यास दाउनी
जनांत आवेशांत गर्जुनी–
स्वदेशभक्तीस दाविती
घरें स्वतःचीं उभारिती ? २

महत्त्व लौकीक त्यामुळें
जनीं स्वभावें जें तया मिळे
स्वसौख्य साधावयास तें
कितीक तत्कार्यास साधितें ॥३॥

सभेंत टोपी शिरावरी–
दिसेल खादीचीं, पुन्हा जरी–
बघाल, फेटा विलायती–
बसोनि मोटारींत धांवती ॥४॥

यदा विचाराल, उत्तर–
मिळेलही तुम्हांस सत्वर
परी नको सांगणें इथें
जगास ठावें पूर्ण सर्व तें ॥५॥

तरीहि पैसा करीं तया
अजूनि घामाचा करोनियां
स्वदेशकार्यास जाणुनी–
समर्पिती विश्वासुनी कुणीं ॥६॥

सपत्नि आप्तेष्ट वागती
परी वदे–"विद्यार्थि राहती"
दरिद्रि–नारायणापुढें
टिकेल खोटें काय बापुडें ॥७॥

अर्धीच आहे प्रवृत्ति ही—
शतांतुनी पांचास त्यांतही
ठरे असा जो-सभोंवतें
खऱ्यास त्याचें पाप भोंवतें ॥८॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार चै. व. १० शके १८५१ ]

## क. क्र. १९९ "सुखाचें मूळ"

२०१ वें अर्धसमवृत्त—पुष्पिताग्रा ||||||SISISS १२ न न र य
||||SIISISISS १३ न ज ज र ग

फिरुनि फिरत त्वत्पदीं पुन्हां मी
श्रमत तरी रमतो तुझ्याच नामीं
हृदयिं रुजलि ही अशीच गोडी
हंसताचि हंबरडा मधेंच फोडी ॥ १ ॥

बमत कधिं मुका असोनि वाचा
रमताचि बारगळे जगीं सदाचा
लवहि अपरिपक्व मानसाला—
नच अवगाहित[1] हो त्वदीय लीला २

शिकविशि हृदयां विचित्र भावां
चुकुनिहि भक्त कुठेंहि ना रमावा
न कळताचि चटावली अशी कीं
रमते न वृत्ति लवैक सप्तलोकीं ३

सुख म्हणुं तरि आठवीत ज्याला
अविरत गुंफितसेच अश्रुमाला
'सुख किं असुख?' काहिं सांगवेना!
जगतिं गमो जरि काहिं कां न कोणां ४

हंसुं जरि कधिं येतसें मला जें
वदुंहि कसें मन सांगण्यास लाजे
गमत विषय मीच हांसण्याला
म्हणुं तरि काय अतां अशा मनाला ५

धरुनि बसत जधवां मनाला
चुकवुनि लागतसें पळावयाला
फिरवि जरिहि मोकळें तयाते
क्षण तरि ना रमतें पुन्हां फिरे तें ६

मन तरि जगतीं कसें रमावें !
जनमन निर्मल ना कधीं दिसावें
दिसत परि जिथें तिथें बघावें
कुणिहि कसा तरि कृत्रिमस्वभावें ७

धरुनि नय सदा दरिद्रि व्हावें
करित अधर्म मदें सुखें बसावें
त्यजुनि सदयता जगीं जगावें
पसरुनि दंभ वरी मुदें डुलावें ॥ ८ ॥

वनिं विजनिंच शांति कां वसावी !
उपवनिं कृत्रिमताच कां दिसावी !
घनवनिं कमनीयता दिसावी
परि नगरीं विपरीतता पटावी ! ॥ ९ ॥

हृदय जळत आंत तीव्रतेनें
हंसु वदनावरि आणितां हटानें
म्हणवि जगिं तरीच तो विचारी
कशि नच कृत्रिमता थके बिचारी! १०

फडफडत निशाण शुभ्र भालीं
परि नच अल्पहि शांति ती कपाळीं
स्मित मृदु विकसोनि दावि ओठीं
भगभग हाय!सदा-कदाच पोटीं! ११

१ पूर्ण जाणीव.

उघड दरवडा असत्यतेचा !
परि गमतो व्यवहार नम्रतेचा
वरि वरि उसनीच शांति सारी
उकळविते उदरीं स्पृहा विषारी १२
अविरत झटतें निसर्ग वाया
कितितरि सौख्य नवें नवेंच द्याया
तरिहि लवण, तिक्त मिश्रणें कीं
रुचिररुचीस मुके मनुष्य लोकीं १३

म्हणुनिच अशन वर्ज्य होय स्वर्गीं
घटघट एक सुधाच पीत भोगी
अतुल विविधता असोनि येथें—
मरणिं मरे नर स्वर्ग भोगण्यातें १४
सहज सुलभ सोडुनी सदाचें
धरुनि मनीं सुख काल्पनीक नाच
हर हर ! शिवनाम ये न वाचें
सकल **सुखासहि मूल** मुख्य ज्याचें १

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
गुरुवार माघ व. ५ शके १८५० ]

---

## क. क्र. २०० "प्रवृत्तक"

२०२ वें अर्धसमवृत्त—**प्रवृत्तक**(अ.सम) प्र.तृ.च. ९अ. ISISSISIS ज त र
द्वि. च. च. ११अ. SISIIISISIS र न र ल ग

जगांत जे जे **प्रवृत्तक**[1]
एक तो प्रभुच तत्प्रवर्तक[2]
उगांच कर्तृत्वखूळ तें
बाळगे म्हणुनि त्यास बाधितें ॥१॥
पिपीलिका[3] वारुळा करी
सारखे श्रमुनियां कितीतरी
सदैव जो जीववी तयां
योग्य **कार्ययश** तोच द्यावया ॥२॥

पदोपदीं संकटांतुनी
रक्षितो करित कार्य आंतुनी
सदा कदा तेल घालुनी—
नेत्रिं, त्यां जपतसे जनीं वनीं ॥३॥
घडे महत्कार्यही यदा
येउनी अहि[4] वसे तिथें सदा
तरी न येऊंच दे मनीं
खंति अल्प, करवी दुजें झणीं ॥४॥

---

१ रूढी, चाल. २ करविणारा. ३ मुंगी. ४ सर्प.

फिरोनि कार्यांत ठेवितो
मग्न जो विसरवीत विश्व तो
तरींच ना संपवीत तें
येनकेन रमवीतसे तिथें ॥५॥

शालबिंडा हैद्राबाद द.
बुधवार चै. व. ७ शके १८५१

---

## क. क्र. २०१ "प्रभूची कृपा"

२०३ वें अर्धसमवृत्त—प्राच्यवृत्ति प्र. तृ. च.९ अ. SS||S|S|S न ज र
द्वि.च. च. ११ अ. S|S|||S|S|S र न र ल ग

आधींच कृपा प्रभो ! तुझी
प्राप्तशी कृति बघे यदा अधीं
ती दावितसे अशा मुदाः—
संचली हृदयिं नामसंपदा ॥१॥
आधार तुझा जगत्त्रयीं
त्वत्कृपा वहत जी सुधामयी
आद्यंतिं, मध्येंहि सर्वदां
कष्टि होइ परि कष्ट, आपदा ॥२॥
उद्यानिं तुझ्या निरोध कां?—
कंटकां, मुळिं संकटादिकां
नांवासहि वाव ना दिसे
पाहुनी मनिं असेंहि येतसे—॥३॥
माया, ममता तुझी तिथें
राहते सतत वागते, भिते,
वात्सल्य न हेंहि पाहते—
कोण? काय मज बोलतील? ते ४
इच्छीं प्रभुच्या पदावरी
सर्वहीन मन हें असे जरी—
एखादि बघोनियां बरी
वाहुंयाच कलिका कशीतरी ॥५॥
उद्यान तुझें सदा खुलें
पाहतां दगडहीं जिथें फुले
भ्रांतिष्टमनास वाटलें—
काय काय तरि घेउं यांतलें॥६॥
झाडें किति उंच त्यांतलीं
दिव्यशीं वरि फुलेंहि मातलीं
वेलीं चढल्या तयांवरी
शक्त मी न तरि लोभ नावरी ७
व्यापून नभास टाकिती
कोण अल्पमति मी तिथें किती!
सारेंहि समान दाटले
काय केंवि निवडूं तयांतलें ॥८॥
खालीं गळलीं अशीं फुलें
जन्मुनी न घडलें जरी भलें
वेंचूं मग तींच सत्वरीं
फूल ना सुमनपाकळी तरी ॥९॥

त्याच्यांतिल एक घेतली
तत्क्षणीं अशि कृपाहि लाभली:-
पाहे परतोनि तों दिसे-
पुष्पराशि नव त्या स्थलीं वसे! १०

शालीबंडा हैद्राबाद द.
शनिवार चै. व. १० शके १८५१ ]

---

## क. क्र. २०२ "मणिमाला"

२०४वें अर्धसमवृत्त मणिमाला२ ] प्र.तृ.च.११अ.॥S॥SISISS स स ज ग ग
२०५ वें „ माल्यभारा ] द्वि.च.च.१२अ.॥S॥SISISS स भ र य

मणि जो असतो खरा-तमाला-
हरतो, विश्रुत हें असे जगाला
मग त्याहुनिही प्रभाधिकत्वें
मणिमाला दिपवील निश्चयत्वें १
वदतो कुणि सर्पमस्तकीं तो-
असतोही-परि ऐकुनीच जो तो
मणि इच्छित तों मिळे न त्याला
अहि माला बनुनी पडे गळ्याला २
मणि इच्छित तों मिळेल माला
मग माला म्हटल्यास कां न त्याला-
मणि लाभु नये? म्हणेल कोणीं
जरि लाभे नयनातुनीच दोन्हीं ३
अभिलाष न होत सौख्यदायी
अति उत्पीडित पीडितास होई
उलटें मिळतें न इच्छितांही
जणु वस्तुस्थिति सांगते अशीही ४
जगदीश वसेल केंवि तेथें
असमाधानं जया हृदीं वसे तें
जगिं शाश्वत शांति हीच आहे-
मनिं येतांच भरोनि सांडताहे ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
शुक्रवार वै. शु.१शके १८५१ ]

---

## क. क्र. २०३ "गुलाब"

२०५ वें अर्धसमवृत्त—माल्यभारा ] ११ ॥S॥SISISS स स ज ग ग
-२०४वें „ मणिमाला २ ] १२ ॥SS॥SISISS स भ र य

मृदु, सुंदर, रम्य, माल्यभारा
परि प्यालों बघुनी तयास वारा
गवसे यदि पुष्पपाकळीही
उचली पाउल ना पुढें कधींही १

कळलें न मलाहि काय झालें
विसरें कां दुरवस्थितींत कालें—
चुकुनी अपुला स्वभाव कोणी!
परि मी सोडुनि धांवतोंच रानीं॥२॥
कुसुमां वगळोनि कंटकाला-
कुणि वेडा कवटाळि कां कशाला
सुखवी मज बोचतां पहा हा!
किति तें सौख्य अहा! अहा!अहाहा!
वगळा! वगळा मला फुलानों!
निज छायेंत न येउंद्या लतानों!
मजशीं फटकोनि नित्य वागा
कुणि तैसाच बघोनि नादिं लागा ४
बहके तुमचाच नेहमींचा
त्यजितां शोक नका करा अशाचा
सुम सोडुनि कंटकांसवें तो
गुजगोष्टी करितां किती खुले तो ५
बघतां नयमें तरी तयाते
अजुनी कष्टवितां उगी मनाते
अगदीं विसरा! वनीं रमूं द्या
अथवा स्वेच्छित जागिं त्या मरूंद्या
बहरा तुमच्या स्थलींच मोदें
नच ढुंको, न बघे, भ्रमें, विनोदें,
रमतें मन कंटकीं सदाचें
बघतां बाभळि हर्षयुक्त नाचें ७
विपिनीं मम चित्त पूर्ण रंगे
अनिलस्थागतिनें नभीं तरंगे

नगरीं वसतां त्वरेंच भंगे
निवडुंगीं अति रंगुनांच गुंगे ॥८॥
बघतें मच पुष्पवाटिका त्या
किति ज्या सुंदर मोह रम्य जात्या
असली विपरीत रीत माझी
मज कोणी नच होय येथ राजी ९
जंव उत्तर कांहिं कोणि दे ना
सुम उद्यानिं न एकही हलेना
हलुं लागलिं मत्पदें हळूं हीं
नच कोणीं मनिं आणिलें तरीही १०
मग तेथिल भाव ओळखोनी
जड अंतःकरणें निघे तिथोनी
मनिं वाढत जाय खेद जैसा
हृदयांतूनि निघे तदा उसासा ११
गमलें भिडतेंच गौण्य ओष्टां
मम चित्तां, हृदयां त्यजोनि पोटा
सहवासविमोह सोडवेना
परतोनी बघुं लागलों तयांना १२
कधिं कां नग फुंकरेंच हाले
मम वर्धिष्णुमनास काय झालें!
बघतों परतोनि त्या लतांना
तरु, पर्णान्वितडाहळ्या, सुमांना १३
हृदिं वाढत लोभ मोहयोगें
जवं तें आठवुं लागले वियोगें
मनसोक्त जिथें विहार केला
रमलोंही रमवीत मन्मनाला ॥१४॥

तरुही हलूं लागले त्वरेनें
शिर खालीं करिती जणूं भरानें
मम मार्गहि आडवीत बुद्ध्या
करिती तांत्राचि डाहळ्या निषेधा १५
इतक्यांत कुणीं मला बघोनी
झणि तेथें उडि घेतली वरोनी
चिकटे उरिं, भालभाग चुंबी
धरुनी वस्त्र करीं करावलंबी॥ १६॥
दृढ आवळुनी अवर्ण्य हर्षे
जणुं भेटीस कितीक गेलिं वर्षे
मग अश्रुहि ते मदीय भालीं
किति ढाळी कुरवाळिलेंहि गालीं १७
भिजवीत असें:-घनांबु वर्षे
दृढ आलिंगन घेत घेत हर्षे
बिलगे शिशु कीं अधीरतेनें
नय, सौजन्य न मार्दवास नेणें १८
मजही हृदिं दाटला उमाळा
कवटाळी मग त्यास मी गळ्याला
मम नेत्र भरोनि येति जेव्हां
किति रोमांच अवर्णनीय तेव्हां १९
अति हर्षुनि ती उनाड पर्णें
किति कोलाहल माजवीत यत्नें
उधळोनि सुमें शिरावरी ती
किति टाळ्या पिटिती बरोबरी ती! २०
जंव मी उघडोनि नेत्र पाहे
दिसलें प्रेमळ एक मित्र आहे
वनिं कष्टत व्यर्थचि जात होतों
वदुं कां स्पष्ट! अहा! **गुलाब** हो! तो २१
दिसली कटिभागिं आणि स्कंधीं
उरिं त्याची चिकटोनि राहि फांदी
शिरले किति कंटक त्वचेंत
उगवे आंतुनि कीं **गुलाब** तेथ २२
खुलुं लागति पाकळ्या सरक्त
काळि एकेक मधून येत येत
किति रम्य **गुलाब** जाग जागीं
मज कोणि म्हणु कां शके अभागी! २३
जणुं विश्वाचे भेटलें अकालीं
वन उद्यान सर्वेच एक कालीं
फुलतो जंव एक रम्य भालीं
फुलती थोर लहानही अकालीं २४
उसळे जणु ही उषाच भालीं
खुलली जी बठली **गुलाब** लाली
उगि घेउनि कां फिरूं पसारा!—
मज सांगा-करुं काय? **माल्यभारा**! २५

मलारदेवपल्ली हैद्राबाद द.
सोमवार माघ व. २ शके १८५१]

## क. क्र. २०४ "विपरीताख्यानकी"

२०६ वें अर्धसमवृत्त—विपरीताख्यानकी (आख्यानकीच्या उलट)

मिश्रण. ] इंद्रवज्रा ISISSIISISS ज त ज ग ग
उपेंद्रवज्रा SSISSIISISS त त ज ग ग

असेच जो सौख्यनिधि स्वयें—तो
कां व्यर्थ बाह्यामधि धांव घेतो?
गमेल-बुद्धी **विपरीत** होतां
बाह्यातुनी लाभत सौख्य चित्तां १
स्वयेंच जे मालक ज्या स्थलाचे
त्यां आवडे चार न चाकरांचे

स्ववृत्ति ज्यांची **विपरीत** होते
मोठे अभागीच जनांत हो! ते २
जयाकडें याचक धांव घेती
तथेंच ते आज हमाल होती
असोनि डोळे धृतराष्ट्र खासे
**आख्यानकी** ही **विपरीत** भासे ३

प्रभुदरबार हैद्राबाद द.
अ. आषा. कृ. ६ शके १८५३ सोमवार ]

---

## क. क्र. २०५ "नम्रता"

२०७ वें अर्धसमवृत्त—वियोगिनी ] IISIISISIS १० स स ज ग
–२०९ वें " २सुंदरी ] IISSIISISIS ११ स भ र ल ग

भ्रमते कुणि ही **वियोगिनी**
वसुधेला म्हणती, तरी कुणीं—
वदती वसुनी जगावरी
कुणि माता कुणि तीस **सुंदरी** १
म्हणती कुणि 'हीन ही धरा
म्हणुनी ही दिधली अम्हां नरां
रमते, फिरते सदा कदा
अजुनी भोगित नित्य आपदा'२

जगवी मनुजास जी—तिची—
अशि दैना! मग कोण आमुची—
करि काय म्हणून काळजी!
मनुजा! श्रेष्ठपणा तुझा त्यजी ३
सुर थोर किती अम्हांहुनी
वसती उच्चपदींच या क्षणीं
जणुं ते शिखरावरी तिथें
आम्हिं या धूळिंत लोळतों इथें ४

---

१ विरहिणी. २ पृथ्वी.

सुर नृत्य करोत पश्चिमीं
रडतों पूर्वदिशीं जरी अम्हीं
नच ठाउक त्यां असे नती
वसतों उन्नतिच्या अम्हीं पथीं ५
चढतों धरुनी अम्हीं नयां
पडणें हें उरलें अता तयां
चढणें अमुचाच हक्क तो
पळते क्षोणि, अम्हींहि धांवतों ६
म्हणुंद्या-आजि काय ते अम्हीं'
पडुंद्यां कोसळुनी झणीं तमीं
जगिं उन्नतिकार्य आमुचें
पडण्याचें करितीच ते वचें ७

कृतिही घडुंद्या हळूं हळूं
करुंद्या त्यासाचि खाउंकीं गिळूं
अम्हि संकटिं अल्प ना चळूं
दिसुंद्याना रडतों मुळूं मुळूं ८
जरि आज अम्हांत थोर ते
म्हणवूंद्या अजुनी जनामतें
म्हणतीलहि 'आवरूं ही मही
नच आम्हांहुनि थोर ईशही' ९
अम्हि लीन सदैव राहुनी
म्हणवूं ना म्हणवूं जरी जनीं
प्रभु तोषवुं, डोलवूं बुधां
इतरां पाजवुं नम्रता-सुधा १०

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
सोमवार (रात्रौ) माघ व. ३ शके १८५०

---

## क. क्र. २०६ "वेगवती"

२०८ वें अर्धसमवृत्त—वेगवती १० ।।ऽ।।ऽ।।ऽऽ स स स ग
ऽ।।ऽ।।ऽ।।ऽऽ भ भ भ ग ग

जगिं वीजाचि वेगवती ना
तीहुनि जीभ भयंकर जाणा
मृदु, ओळ तरीहि कडाडे
अग्नि तदा हृदयांत धडाडे ।।१।।
चमके नाभिं जी जंव गर्जे
वृष्टि पडे, मग शांतहि वाजे

पडते यदि भूमिवरी ती
वर्षभरी न अवर्षण भीती ।।२।।
वचनान्वित वीज तशी ना
जाळुनि भस्म करी, छल नाना
सुटल्या शर आवरणें तें—
शक्य नसें, नित जाचक होतें ।।३।।

१ पृथ्वी. २ वीज.

उपमा नच शब्द सुचेला कटु बोलुनि चित्त विदारा—
ती असतां नच कोणि भुकेला कां दवडावि सुधामय धारा! ॥४॥

मु. सं. माणिकनगर
ज्ये. शु. १२ शके १८५३ गुरुवार ]

---

२०९ वें वृत्त—सुंदरी
—२०७ वें ,, वियोगिनी ] "नम्रता" क. क्र. २०९ पहा!

---

क. क्र. २०७ "केली केली"

२१० वें अर्धसमवृत्त—सौम्या प्र. च. सर्व गुरु सोळा अ.
SSSSSSSSSSSSSSSS

द्वि. च. सर्व लघु बत्तीस अ. ||||||||||||||||||||||||||||||||

**सौम्या** रम्या स्वर्गोत्तीर्णा॥सौस्वर्या स्तुत्या संकीर्णा
मृदुल—मधुर—मुकुलित—मुकुर—मलय
गमत मनिं जणुं अमृतमय—कुवलय ॥१॥
दिव्या सौंदर्याधिष्ठात्री॥विद्या देवी किंवा धात्री
करिल कवण मम विरहदव शमन
त्वादितर पटत न निकटतर चरण ॥२॥
दिव्या **सौम्या** रम्याकारा॥प्राग्र्य प्रौज्ञा धीप्रस्तारा
प्रभुपदिं रमविशि भवजभय हरुनि
स्वसुखभुवनिं विचरविशि करिं धरुनि ॥३॥
जी जी होती जैशी झाली॥येथें ती ती **केली केली**
अजुनिहि कितितरि विषयभजक जन
शमविशि, मुरविशिहि कितिक जनमन ॥४॥

---

१ क्रीडा. २ मोहक ३ मधुरस्वरा. ४ व्याप्त. ५ अर्धे मिटलेलें. ६ कळी. ७ बाग, नंदनवन- ८ कमळ. ९ पृथ्वी. १० विरहवणवा. ११ मुख्य. १२ हुषार. १३ भवापासून उत्पन्न झालेलें भय.

नेत्रांनी कैवल्याधामा॥दावी विश्वाच्या विश्रामा
स्फुरण उपजावीशीं कुपितसलिलसम
तरि पुरविशि रु, परि ज्ञाणें शमवि मम ॥९॥

शालीबंडा हैद्राबाद द.
गुरुवार चै. व. २ शके १८५१ ]

---

क. क्र. २०८ "सुखदुःख"

२११ वें अर्धसमवृत्त—हरिणप्लुता च. १-३ ॥S॥S॥S।S ११ स स स ल ग
२-४ ॥॥S॥S॥S।S १२ न भ भ र

म्हणती जन दुःख नको कुणा
बघति कोणि तदीय न सद्गुणां
धरिती हट हाच सदा कदा-
नच घडो चुकुनी कधिं आपदा॥१॥
सुख होइ कुणांसहि संमत
म्हणुनि त्यासच इच्छिति संतत
परि होइ पहा अशि गंमत -
कुणिं न पाहति दोष तदंगत ॥२॥
जगि दुःख सदा समता बरें
स्वगुणसाम्याचि शोधित तें निरें
जरि तत्सम दर्शन त्या घडे—
विसरही मग त्यास तदा पडे ॥३॥
न दुजास सुखी कधिं पाहतो
धनमदें अपुल्यांतचि राहतो
निज सौख्याचे इच्छि निरंतर
कुणि सुखी दिसल्यां करि मत्सर ४

जगिं दुःख नग मनुजत्व दे
तरिच त्या इतराचिहि कींव ये
नच देउ शके धन—सांत्वनां
परि सुधेसम बोल वदे जनां ॥५॥
नित दुःखचि देइ सुखी सदा
उत्कलन—ओळख नाहिंहि तन्मदा
झरतो त्यजुनीच दया, नया
स्वधनसौख्यसुवर्धन व्हावयां ॥६॥
सुखभोग तदा पचनीं पडे
अधिक त्याहुनि दुःख यदा घडे
दिनिं कटत तो निशि सौख्यदा—
तरिच साबुंशकेलहि सर्वदा ॥७॥
घटियंत्रसुमापन सत्य तें—
भरत होत असें दुसरें रितें
सुख—दुःख रहाट सदा फिरे
पडत एक जळीं, वरिं दूसरें ॥८॥

---

१ उसळणाऱ्या पाण्याप्रमाणें.

सुख पूर्व असें पहिलें, दुजें-- नच हें असलें नच तें तसें--
उघड कीं मग पश्चिम दुःख जें उभयही समसाम्यचि दिव्यसें॥ १०॥
तम वा द्युति कांहिं गणां तयां-- शिर तें जरि डोलतसें वरीं
प्रभुचयोजि नरा जगवावया ॥९॥ चरण हे श्रमती फिरती जरी
नच पृष्ठ तरी लघु त्या गणां नच दोन्हिंहि तोषक, दाहक--
हृदय उच्च कसें म्हणवें कुणां? उभयही जगण्यास अवश्यक॥११॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
शनिवार माघ शु. १५ शके १८५० ]

---

## क. क्र. २०९ "हरिणाप्लुता"

२१० वें अर्धसमवृत्त--हरिणीप्लुता ॥S॥S॥S।S ११ स स स ल ग
॥।S॥S॥S।S १२ न भ भ र

कुणिही झटतो सुख व्हावयां
मरणव्याघ्रमुखा चुकवावया
पडते तरि त्यांतचि धांवतां
सुखद कोंवि म्हणूं हरिणीप्लुता? १

पळतां नच भूमि पुरे कुणां
धडपडे म्हणवी जरि शाहणा
परि गोंधळतो, फसतो वृथा
तरिहि कां हंसतो हरिणीप्लुता! २

'सुख दिव्य'! असें कुणिही वदे
झुळुक लागत ना तरि तो मदें
मग नाचत मागुनि, त्याच त्या
उगिच कां हंसतो हरिणीप्लुता! ३

जगिं दुःख गमे मरुभूमि हा
मृगजलासम सौख्य पटानिही
नर धांवत त्यासचि पाहतां
उगिच कां हंसतो हरिणीप्लुता! ४

सुख जें--भ्रम तो!--भ्रमतो उगा
भ्रमचि मूळ असें अपुल्याजगां
भ्रमसंभ्रम भोंवत ह्या, मतां
उगिच कां हंसतो हरिणीप्लुता? ५

सुख ? हाय! नसेच--असे भ्रम--
जवळि तें दिसतें क्षितिजासम
परि जन्मवरी उगिं धांवतां
अहह! कां हसतां हरिणीप्लुता? ६

---

१ हरिणीची उडी.

जगिं रोग किती? नच त्या मिती!
सतत लोटिति मृत्युमुखीं किती !
उघड्या नयनीं नित पाहतां
**उगिच कां हसतां हरिणाप्लुता ?**
अपमृत्यु पदोपादिं कूप तें
कितिकरे! खाणिलेस जगत्पते!
--जपतां? मग खास तुम्हीं भितां !
**उगिच कां हसतां हरिणाप्लुता?**
मरणोत्तर दुःखचि की सुख
नच कुणासहि तें आजि ठाउक--
जगण्यास्तव कां मरतां अतां !
**उगिच कां हसतां हरिणाप्लुता?**
मग होइल काय? कसें मम?
--कुठुनि कीं बघतो हसतो यम
पळतां न पुरेचभुई अतां--
**उगिच कां हसतां हरिणाप्लुता?**

मरणोत्तर काय? विचार तो--
काधिं कुणीं करितो न विचारितो
घडतो अविचाराचि सर्वथा
**उगिच कां हसतां हरिणाप्लुता ?**
पळतां धरि उत्तर ती दिशा
करुनिघेत उगीच दशा दशा
नच वर्णवते मुख पाहतां
**उगिच कां हसतो हरिणीप्लुता?**
परि दाक्षिणभागिं पिके हंशा
श्रवणिं तो पडल्या किति दुर्दशा!
दचकुनी जणुं ऊर उले अतां--
**उगिच का हंसतों हरिणाप्लुता?**
**मरण्यास्तव मी मरणी मरे**
**मरणभीति तरीच झुरे खरें**
**म्हणुनी मृगजातिंत सूक्ष्मता**
तरिच कीं लिहिले **हरिणाप्लुता**

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
रविवार माघ व.१ शके १८५० ]

---

### क. २१० "मरण्यास्तव मी मरणी मरे"

२११ वें अर्धसमवृत्त—हरिणप्लुता ||S||S||S|S ११ स स स ल ग
|||S||S||S|S १२ न भ भ र

**मरण्यास्तव मी मरणीं मरें**
मरणदेश बघा पुरुनी उरे
मरणास न देउं शके सुधा
मरण अमृत मानि खरें बुधा ! १

मरण्यास्तव हें जगणें असे
मरणहीन कुणीं जगिं कां असे ?
मरणें जगिं निश्चित कायदा
मरण रोख असे, नच वायदा! २

मरण्यास्तव मी मरणीं मरे
नवल हें गमतें जगिं कां बरें
मरुनीच पदोपदिं सत्वर
फिरतसे कवि एक निरंतर ! ॥ ३॥

मरणासचि मारुनियां अहा !
वपुशवावरि वागत हा पहा !
बसवी, उठवी, फिरवी तया
उगिच घालवितो न कधीं वयां ! ४

मरण्यास्तव मी मरणीं मरे
अधिक लोभ न तो मनिं आवरे
ताशि सांचि कधीं नच लाभली
**मरण** हा **स्मरणी** फिरुं लागली ! ५

उडु, चंद्र मणी तरणी मणी
मणिच पक्षिणि[1], घस्र[2], निशीथिनी[3]
यम मेरुमणी गणुनी न गणीं
मनुज, सूत्र, मणी फिरवी झणीं ६

मरण्यास्तव मी मरणीं मरे
म्हणत संतत उच्चरवें फिरे
असला गणतो कधिं कां वया?
तरिच कांपत मृत्यु भितो तया ७

मरतां मरतां सुटलें बरें—
मरण तें मम हातुनि सत्वरें
म्हणुनी नच दावितसे मुखा
तरिहि भोगुं न देइन त्या सुखा ८

मरण्यास्तव मी मरणीं मरे
सतत माळचि ती फिरवी करें
झिजुनी गळती फुटती तमे--
वयमणी अर्जुनीहि कितीकसे ! ९

कधिं पृथ्वि गमे फुटकी मणी
अखिल विश्वहि ना भरते मनीं
जगणें कसलें? मरणापदा !
मरण भेटतसे परि एकदां १०

मरण्यास्तव मी मरणीं मरे
मरणहेतु धरोनिच बावरे
नवजन्मचि होइ वरीवरी
मनुज पुत्र--कलत्र बघे तरी ११

यम एकदिनींतरि ना दिसे
सतत छंदचि हा हृदयीं वसे
करिं प्राण धरोनिच आरती--
फिरत उत्सुक मी करण्यास ती १२

---

१ पूर्णिमा. २ दिवस. ३ रात्र.

मरण्यास्तव मी मरणीं मरे
उलट मृत्यु पहा मज घाबरे
मरतो मितराच अनेकदां
मरण भोगित तो जगतो सदा।१३

हटयोगि वडे गिरिकंदरीं
परि उभा यम संतत कंधरीं
पुरती मग पाठचि जो पळे
उलटतां मग व्याघ्रहि ना गिळे।१४

मरण्यास्तव मी मरणीं मरे
तरिच मृत्यु मला भितली मरे
कधिं येत किचार मदंतरीं—
मरण ओढवलें मरणावरी।१५

पर-हेतु असे जगण्यास्तव
जगति लोक वृथा मरण्यास्तव
कधिंचा मरुनी उरलों असे
मरणभीति मला अणुही नसे!१६

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
बुधवार माघ व. ४ शके १८५०]



# विषम वृत्तें

## क. क्र. २११ "विषमकाल"

२१२ वें वृत्त—**विषम:**—

प्रथम चरण—**स्वागता** SISIIISIISS र न भ ग ग
द्वितीय ,, —**माल्यभारा** IISIISISISS स स ज ग ग (पूर्वार्ध)
त्रितीय ,,—**शालिनी** SSSSSISSISS म त त ग ग
चतुर्थ ,,—**इंद्रवंशा** SSISSIISISIS त त ज र

राहुंद्या ! **विषमकाल** कसाही
तरिहि आणि वे उडी प्रवाहीं
काढाया दुःखीजनां धांव घेतो
तेव्हां महात्मा म्हणवी जगांत तो १

तो जें जें बोले तसें वागण्याला
जो सिद्ध—तो—बद्ध तरीहि मोकळा २
जो झटे सुखविण्यास जनाला
पडतें मुळि ना कमी तयाला

**स्वागतास** जन उत्सुक ज्याच्या
जनि बोलति बंधु जो जनांचा
सत्याचा भोक्ता भितो ना कुणाला
माला यशाची मग शोभते गळां ३

---

## क. क्र. २१२ "उद्गता"

२१३ वें विषमवृत्त—उद्गता १०,१० प्र. IISISIIIS द्वि. IIIIISISIS
११,१३ त्रि. SIIIIIISIIS च. IISISIIISISIS

प्रभु नित्य नूतन असोनि
वसुमति दिसे सदा जुनी
ईस बघत असतांच मनीं
गमते म्हणेल आणि **उद्गता**[1] कुणी १

जरि **उद्गता** अशि गणोनि
बघु—सुटुं विसंगतांतुनी
आठवत जरि न आयकुनी
म्हटलें असे अर्जुनि कोणि या जमीं २

---

१ उगवलेली, वर आलेली.

प्रभु एक तोच अभिजात हेंच अभिमतहि पूर्ण मता
इतर जग तत्स्वरूपत: मग योग्य होइल—म्हणेन उद्धृता २

शालीबंडा हैद्राबाद द.
मंगळवार फा. व. १४ शके १८५० ]

---

क. क. २१३ "शिखा*"

२१४वें विषमवृत्त—शिखा प्र.१६,१३,(२९)||||||||||||||||||द्वि.||||||||||||
द्वि.१३,१५.(३१)||||||||||||||||च. |||||||||||

प्रभुचरणिं नमित,मुदितमन म्हणत स्तवन अतुल सुख सुरनगरिं कुठुनि
त्रिभुवनिं तरिच म्हणवित शिखा म्हणुनि मनुज रमत जगिं निशिदिनिं २
विनताचि सतत असुनि मग आविरत वरि वरि बदलत वसुमति म्हणुनिच
जगतिं कुणिंहि कितितरि मग सरिखा १ सुर धडपडति जनन घडण्या
अमरनगरसुर तरिहि लघुतराचि तरि सुरनगरसुख निजमनिं धरुनि
तपहि नमन नच घडत तयां नरविचरत अवनिवरति मरण्या ४
स्थल अवनतिकर,नातिविहिन म्हणुनी नव जंव उगवत गतदिन विसरत
अवनि वरिच पडति नर फिरुनियां५ मिळवित वसत नित नवसुखा
तपन, जप, तप घडत अवनिवरिच नवकृतिहि घडत प्रभुहि नव गमत
शम, दमहि सहज अनुभवुनी वसुमतिस म्हणुनि म्हणुच आम्हि शिखा

शालीबंडा हैद्राबाद द.
वर्षप्रतिपदा बुधवार शके १८५१ ]

---

१ मूळचा. ३ इष्ट, प्रिय. ४ सन्मानित. ५ तुरा. ६ नम्र. *'शिखा' वृत्ताचे चार चरण; पण कविवर्य पंतानीं द्वितीय व चतुर्थ चरणाच्या शेवटीं यमक पाळला आहे. ( समग्र पंत ८ पृष्ठ ५१७ पहा! )

## क. क्र. २१४ "अमरनगरसुख"

२१५वें विषमवृत्त-खजा* प्र. द्वि. १६,१५.(३१) ||||||||||||||||,|||||||||||||||
द्वि. च. १६,१३.(२९) ||||||||||||||||,|||||||||||||

प्रभुवर यशकर **अमरनगरसुख**
पुरवित निशिदिनिं मज घरिं बसल्या
श्रमत मनुज परि उगिच मनिं धरुनि
बसत समजुनि अधिक तसल्या १

पटवित अविरत अनुभवुनि वदत
अमृत, सुरतरुफलसदृश कविता
समजत मम मन मधुतर सुहृदहि
जननि, जनक, युवति, सुत सुता २

हलवित नच निज चरण तव तरिहि
दशदिशिं निजाशि विचरवित सहजें
त्रिभुवनहि वसवित प्रभु मम सदनिं
नर मरत तरि न दिसतहि जें ३

शालीबंडा हैद्राबाद द.
वर्षप्रतिपदा शके १८५१ बुधवार ]

---

* "खजा" वृत्ताचे चार चरण, पण कविवर्य पेतानीं द्वितीय व चतुर्थ चरणाच्या शेवटीं यमक पाळला आहे (समअपंत ८ पृष्ठ ५१७ पहा !)

# मात्रा वृत्तें*

## क. क्र. २१९ "प्रेमगान"

२१६ वें मात्रावृत्त—आर्या ] जाति मात्रा प्र. १२+१८ = ३०
-२२१ वें " गाथा १ ] द्वि. च. १२+१५ = २७

प्रेमचि गात निघालें वरतीं खालीं सभोंवतीं शिरलें
नैसर्गिक नच उरलें दुसरें तद्व्यतिरिक्त असलें ॥१॥

विश्वचि व्यापित चाले त्वरित असें धांउलागलें तोंच
दाहि दिशा कोंदटल्या म्हणुनि घुटमळूं लागलेंच ॥२॥

फिरुनि फिरुन जरि आलें एकूं तरि एक तेंच तें भरलें
फिरलें, शिरलें, उरलें परि फिरुनि तिथेंच तें विरलें ॥३॥

परिपूर्णस्थितिनें जें वसतें जेथें, तिथोनि तें निघतें
वेडें करितें इतरां स्वयें सदाच वेडें असतें ॥४॥

---

*स्वराच्या उच्चारास जो काल लागतो ती मात्रा होय. लघुची एक आणि गुरुच्या दोन मात्रा. मात्रा वृत्तांत या रीतीनें जे गण मोजले जातात ते पांचच प्रकारचें असतात. गणग म्ह. 'मेघा' सगण म्ह'सविता-' जगण म्ह. 'जनास'—भगण म्ह. 'भाजन'-नगण म्ह. नवास चार मात्रांचा गण भरावयास या पांचावांचून कोणताही गण येत नाहीं.

मात्रा वृत्तासही चार चरण असतात; पण प्रथम व त्रितीय चरण निर्यमक असून द्वितीय चरण यमकात्मक असल्यामुळें दोन चरणी लिहीण्याचा प्रघात पडला असावा. कविवर्य पंतांनीं "पज्झाटिका" वृत्तांत (समग्र ग्रंथ ८ पृ. २२) चार यमकान्वित ७८ कविता लिहिल्या आहेत, आणि त्या वृत्त नामावर टीप देऊन "हें मात्रा वृत्त आहे." असा स्पष्ट उल्लेखही केला आहे.

प्रेमळहृदय दिसुनि कीं आलें ज्याक्षणिं तिथोनि ना हालें
वेडावतें दुजांना वेडें स्वयें परंतु झालें ॥५॥
गातांना गुंगवितें मौनस्वांकितचि होय गुंगत तें
स्वाश्रुविमोचननिस्वन ऐकुनि गोंगाट मग म्हणतें ॥६॥
हंसतां जरि मोद म्हणों मन अश्रू गाळितां खरें रमतें
प्रेमाचें साधन तें विसरविण्या विविधविश्वांतें ॥७॥
रोदन, मोद न उरलें द्वंद्व अभेदांत शाश्वतें विरलें
न निघालें ना शिरलें एकामेकांत तें मुरलें ॥८॥
गानप्रेमचि भरलें या आर्याभूमिमाजि वैपुल्यें
हृदयांदोलन काव्यें, भाग्यें परकीय जरि डोले ॥९॥
कवि रसिकादिक कोठें प्रेमाच्या गायनक्षणीं उरती
प्रेमशशांक बघोनी प्रेमोदधिलाहि ये भरती ॥१०॥
प्रेमचि विश्वीं नटलें जाणुनि जाणीव लाजली जेथें
ज्ञानाचें भान उडे प्रेमगान एक पटल्यानें ॥११॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
शुक्रवार प्रातःमाघ व. ६ शके.१८५० ]

---

## क. क्र. २१६ "कालपूर"

२१७ वें मात्रावृत्त—आर्यागीति (मात्रा) प्र.च. १२,२० = ३२
द्वि. च. १२,२० = ३२

जगतीं एकुणएकां स्वेच्छें निर्मुनि तूंच एक बा! गात्या
आर्यांच्या मागें कां लाउनियां देशिं दारिद्र्यबाधा त्यां? ॥१॥
मोर्दे डोले कैसा दीन दरिद्रांनांच दुःख जो देतो
लेश न अत्यल्प तयां वाराही नच भासतोच जो दे तो ॥२॥
अधिकार, भाग्य, लक्ष्मी ज्या जवळि तोच जागिं जाणति मनुजहरी
परि यांच्या जीवांवर लादुनि तो उलट दुरित दैन्य निज हरी ३

ज्याच्यापासुनि मिळवुनि अगणित निजदेशीं सुवर्णनग वसवी
कष्टुनि काळे पडतां यांचें याच्यांताचि सु वर्णे न गवसवी ॥४॥
निज जन्म भिजत तापत ढकलावा लागतो सतत अधनातें
ज्यास कुबेर करावें ते ठेविति, दाविति तदीय अध नातें ॥५॥
हंत ! होतृ हैमासनिं होता जो तोच कीं होतसे होतां
नाव आज गाड्यावरि पाहूं **कालपूर** बदल उद्यां होतां ॥६॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
माघ व. ८ शके १८५० रविवार ]

---

## क. क्र. २१७ "शाश्वतदे !"

२१८ वें मात्रावृत्त—उद्गीति (मात्रा) प्र. च. १३,१५ = २७
द्वि. च. १२,१८ = ३०

कोण करुंगके मापन सरितेचें करि किती श्रम तें
उगमस्थानिं शतांशें अब्जाधिक्येंच सागरा मिळतें ॥१॥
झरा उफाळे तरिही शांति, समताच दावि वापी
आद्यंताचें अंतर बा आद्यंता ! असें सहज कापी ॥२॥
द्वंद्वानुभव नुरावा-वाटे ऐसेंच चित्तांतः—
एकचि वलय बनावें टोकें मिसळून एकमेकांत ॥३॥
स्मृति, इच्छा, आशा या सर्वांचेंहि एकीकरण
विस्मृतिमध्यें व्हावे त्रैकालादिक जन्म, स्थिति, मरण ॥४॥
वर्तमान चिंता ही जाळित आहेच आशेला
आविरत अश्रुजलानें बाळपणा पार वाहुनी गेला ॥५॥
तीं तत्स्मृति अजुनी ही उलट तळमळवी मच्चित्ता
दीर्घोष्णोच्छ्वास आतां ध्येयाची पेटवींत राहि चिता ॥६॥

---

१ यज्ञकर्ता यजमान. २ स्तुति करणारा. ३ कडें वर्तुळ.

उरले ते सिकताकण रखरखित रुक्ष निराशेचे
सिंचन ना चुकुनि मिळे सहानुभूत्यात्मकार्द्रबाष्पाचें ॥७॥
क्षणिक सुखापेक्षां हें असलें दीर्घ दुःख पुरवलें
यावरुनी इच्छी मन शाश्वत याहूनि कांहिं दे असलें ॥८॥

मैलारदेवपल्ली हैद्राबाद द.
शनिवार माघ व. ७ शके १८५० ]

---

## क. क्र. २१८ "देवाचा खेळ"

२१९ वें मात्रावृत्त—उपगीति १२,१५ = २७
१२,१५ = २७

रत्र्यूदयीं आणिली विविधता ही केंवि ? कोठुनी?
एक कृष्ण होतें जें यामिनीनें दिलें फांसुनी ॥१॥
कोण्या परगांवाची शोभा आणिली बांधोनी!—
वसुधा खुलवायास जणूं रश्मीच्या दोऱ्यानीं ॥२॥
चित्र विवक्षित जरि तें रंगारंगांत नाविन्य
दिसतें नवीन, तंव तें चित्रकलेंतील प्राविण्य ॥३॥
भूपट जरि तोच जुना चित्रेंही तसलींच जरि तीं
पुष्प, पर्ण नित्य नवें, परि काय विचित्र तव रीतीः—॥४॥
एका हस्तें रेखीं अनेक रंगांमधीं चित्र
दूजानें फांसावें डांबर तयावरी? विचित्र ! ॥५॥
खेळ असा कां देवा ! दिवसभरीं तुवां खेळावा
रात्रीं परंतु फिरुनी त्याचकरें काय मोडावा ! ॥६॥

मैलारदेवपल्ली अपरात्रौ है. द.
शुक्रवार माघ व. ६ शके १८५० ]

---

## क. क्र. २१९ उंपचित्रा

२२० वें मात्रावृत्त—उपचित्रा मात्रा १६,१६,१६,१६

मन चिंतित मम अशाच चित्रा
न बघोत नयन कधींच गात्रां
अथोपचित्रा न मुख्य चित्रा
जरि दिसो आवड अशी विचित्रा ॥१॥
द्युति इच्छूं तरि लगेच छाया
मग सहजी मज दिसेल वाया
क्रमप्राप्त बघणेंही लागे
जे नच केव्हांही मन मागें ॥२॥
सुंदर वस्तुंस देऊं महती
मनोल्हासिनी स्वमनीं गणुं ती
सुखदा आधिं लाविलहि प्रीती
होइल मग पुढती विरहवती ॥३॥
सौख्यचित्र घेतानां हातीं
उंपचित्राची पडते भ्रांती
हें सौख्याचें—सरकत दिसतें
तें शोकाला वठवित बसतें ॥४॥
म्हणुनि न इच्छित मी मधुचित्रा
उचितहि गणे इह न अमुत्रा
रूपाहुनि सौंदर्याधारा
ती आठव दे या उंपचित्रा ॥५॥

शालीबंडा हैद्राबाद द. ]
सोमवार फा. व. १४ शके १८५० ]

---

शेवट गोष्ट.

क. क्र. २२० "यत्स्फूर्ति"

२२१ वें मात्रावृत्त—औपछंदसिक (मात्रा) १६,१८

गा ! भक्तकार्यकल्पद्रुम ! तूं पुराविशिं सकल कोड हें उबड असें
पारि हें कोडें नच उलगडलें-हृदयिं धरावें कार्य अधींच कसें? ॥१॥
स्फुरण स्फोरक पूरक जो तूं काय दुजें कार्य तें उरें आम्हां
जें जें कराविशिं तें घडत असें आदिमध्यांतिं तूंच पूर्णकामा ॥२॥
कार्याकार्यनियंत्रण याची कार्यवाहकास काळजी कुठली !
[१]नियोक्तृ योजिल ज्या रीतीनें तदनुसरण्यांत वृत्ति पूर्ण वठली ॥३॥
स्फूर्ति तुझी संतत जी वहते बसल्याजागीं पवित्रपरमधुनी[२]
विसरी मदीय जेव्हां जेव्हां पदरिं पडे तें अहेतुपर मधुनी ॥४॥
अहंबुद्धि लवजरि कर्तृत्वीं येइल ज्यांच्या चित्तिं चुकुनि जरि, तें
नि[३]र्बर्हणीय मग कां नच म्हणां तत्कार्यक्षेत्रही सदैव रितें ॥५॥

शालबिंडा हैद्राबाद द.
गुरुवार (मध्यरात्रौ फा.शु.४शके१८५० ]

---

२२२ वें वृत्त—गाथा १
–२१६ वें ,, आर्या ] "प्रेमगान" क. क्र. २१९ पहा!

---

क. क्र. २२१ "नियंत्रण"

२२३ वें मात्रवृत्त—गाथा(२)मात्रा प्र. च. १६,१३
द्वि. च. १३,१८

विकट विपत्तिकटकाते चक्रव्यूह कुणीं गणती
वक्रगतिकवीथिका जणुं जाणोनी कुणीं तुडविताचि चढती ॥१॥
भयें, तसें रणोन्मादें स्मृतिलोप अनुभवास ये
एक दे मृतजीवनास, दुसरें उभयस्थितींत यशास दे ॥२॥

---

१ योजना करणारा. २ गंगा. ३ नाश.

विस्मृतिजसुखभोगाहुनि जो नयनें सुखें पाहे
त्याहुनिहि **नियंत्रणचें** सारेंच सहण्यांत महत्व आहे ॥३॥

शालबिंडा हैद्राबाद द.
शनिवार वै. शु.३शके१८५१ ]

---

क. क्र. २२२ "**विश्वव्याख्या**"*

२२४ वें मात्रावृत्त—गीति १२,१८,१२,१८

**विश्वव्याख्या** म्हणजे एक असें सांगवे न खात्रीचें
संमिश्रण हें आहे नभानिलानलांब्वादि पृथ्वीचें ॥१॥
सत्य म्हणावें म्हणजे येत असे हंसूंच अंतःकरणें
अत्यंताभावाचें भासात्मक यत्न वस्तुतः करणें ॥२॥
केलाही यद्यपि कुणि यत्न यथाशक्ति भासदृश्याचा
तोही हास्यास्पद ना! खोट्याची सिद्धि साधितो साचा! ॥३॥
भासे जें मध्यंतरिं झाल्याक्षणिं नासतें दुजें होतें
सातत्याचें फिरते ऐसें कीं चक्र एक मायिक तें ॥४॥
जें जें दिसतें नेत्रां सत्य; नव्हे दोष दृष्टिचा हो! तो
आत्मा सच्चित जो, तो काय कधीं विषय नेत्रिंचा होतो! ॥५॥
नाम न रूप कसें त्या अवाङ्मनोगोचरासकां गावे?
गाती नाचति जे कां त्यास गणावे खुशाल कांगावे ॥६॥
तन्नृत्यीं यद्यपि ना अर्थ असे व्यर्थही न कृति सारी
गात जगद्भानाचा विसर पडे तेवढें पडें पदरीं ॥७॥
खेळ जरी खोटा हा आहे त्याचाच त्यावरी भासे
ज्ञानी पाहुनि हांसे वागे, रंजे परंतु परिहासें ॥८॥

---

*ही कविता तत्वज्ञान मंदिर (अं. ४३ स. १९३० च्या) मासिकातन प्रसिद्ध झाली आहे.

कोणी बुद्धिबळाला यद्यपि खोटेच जाणुनी खेळे
मोदें वा संतापें तद्रुधिरीं स्वाभिमानही खेळे ॥९॥
संसाराच्या खेळा खेळा ! परि तो खरा मुळीं न जाणां !
'ईर्षेवाचुनि बाजी व्यर्थ—'असें साकडें न मनि आणां ! ॥१०॥

प्रभुदरबार आब्बिडा हैद्राबाद द.
सोमवार आश्वि व. ११ शके १८५१ ]

---

क. क्र २२३ "श्री प्रभुमहामंत्र आर्या"
२२४ वें मात्रावृत्त—गीति (मात्रा १२,१८,१२,१८)

**महामंत्र**

भक्तकार्यकल्पद्रुम गुरुसार्वभौम श्रीमद्राजाधिराजयोगी महाराज त्रिभुवनानंद अद्वैत अभेद निरंजन निर्गुण निरालंब परिपूर्ण सदोदित सकलमतस्थापित सद्गुरु माणिकप्रभू महाराजकी जय

(आर्या गीती)

श्री गुरुमाणिक जयगुरुमाणिक वद भक्तिनें सदा रसने !
भक्तकार्यकल्पद्रुम तो प्रभु मनिं भजुनि अंतरीं रस ने ॥१॥
क्लांतमनां शांतवितें श्रम सांसारिक हरुनि जशी तरुणी
तव भजनरतिहि नेवो अघ कदना करुनि भवनदी तरुनी ॥२॥
कार्यहि जन्माचें तें जीवितसाफल्य होय दिव्य, जनां
रवितापशमनशक्ताचि करि निज कर्तव्य ये यदि व्यजनां ॥३॥
यद्यपि सर्व जगांतिल ऐहिक साधन बळें मिळवि अर्थ
कल्पावधि जगला नर तरि त्या श्रीप्रभूकृपेविणें व्यर्थ ॥४॥
लय लावी प्रभुपदिं जरि भवसागर नर तरेल सहजपणें
परि संतत निज हृदया विषयापासोनि भक्तिसह जपणें ॥५॥
द्रुतगति कालाची नच अवलोकी रात्र वा दिवस ऊन
महिवरि फिरविल तुजला स्वेदांडज जारजांत वसवून ॥६॥
गुणकर्मसंगतीनें उत्पत्तिस्थितिलयादि वरशील
रुद्रादि रूप घेउनि कर्मगतीनें सदैव रडशील ॥७॥

साम्राज्यपदीं बसवी सद्गुरु तो सार्वभौम कनवाळू
रत त्याच्या पदिं जो नर सहज परिस करुंशकेल कणवाळू ॥८॥
वश ऋद्धि सिद्धि यत्नें गर्वाचें करुनि पावशिल निलय
भौमासुरसम घेशिल निजहस्तानें करूनि हानि लय ॥९॥
मदरहिता ज्ञाननिधी—वरि योजी यक्ष रक्षणामाजी
श्रीहर समद करविला दक्ष क्षरदक्षर क्षणामाजी ॥१०॥
मनिं धरुनि गर्व संतत सर्वस्वहि दे नव्हेंचि तें दान
तत्कृतपुण्यहि देते भोगास्तव गर्भवास हें मान ॥११॥
रामपदीं असतां रत रावण निर्गर्व शिरदश न पडतीं
जाणुनि हें करिशिं जरी गर्व तुझें तेवि शिर दशन पडतीं ॥१२॥
धिक्कांता मद्यानें रगाति जे सार्वकाल विषयमदें
राखिल तशाहि भजकां जरि हट्ट सर्व कालविष यम दे ॥१३॥
जप आन्हिक नेणें जरि कर्मरहित फोल विप्र भूभार
योगक्षेम तयाचा भजक म्हणुनि वाहतो प्रभू भार ॥१४॥
गीतीं अशनीं शयनीं, विजनीं, एकांत सेवनीं, सदनीं
मदहरमदनमनोहर माणिकनामासि ठेवि तूं वदनीं ॥१५॥
हालाहलासि अमृत करि नामामृत'असेंचि वदतात
राजा करि रंकातें साक्ष पुराणीं अनेक म्हणतात ॥१६॥
जन्मादि ताप वारी क्षुतृडबाधा उरे न देहांत
त्रिविधहि ताप निवारुनि भवसिंधु तरावयासि दे हात ॥१७॥
भुजगशयन पुरुषोत्तम भुजंगधरशिव सदा जपति नाम
वदनाला भूषण कीं पत्नीला पति तसें तुला नाम ॥१८॥
नामरहित मनुजाचे मानधनहि राहती न जगतांत
नंदनवनसुख अवनीं भोगुनि पामर उगाच जगतांत ॥१९॥
दशहि दिशेंत प्रभुपद पाही जोडी दशांगुली, नमनें
अद्वैत वस्तुमात्रीं पाहुनि राहे सदैव लीन मनें ॥२०॥

द्वैतमनें नत हो नर कल्पांतीं तरि कसा म्हणवि भक्त
तत्सम फल देतो प्रभु त्या भक्ताचें जसें मन विभक्त ॥२१॥
अव्यभिचारित भजनें दुर्भग किंवा असोचि भगवंत
भेदाचा भेद करी एकचि मग भक्त आणि भगवंत ॥२२॥
दर्शन नच देई त्या अघोर तप करित कामुक रिकामा
निज कर त्या भक्ताच्या राबवि घरिं जे अहेतु करि कामा ॥२३॥
रंजन निज भक्तांचे ब्रीद म्हणुनि सर्व दुःख जो हरितो
जरि भार ठेवि त्यावरि परोपरीनें परेश हित करि तो ॥२४॥
नरदेह करी धारण भक्तांकरितां अरूप अविकारी
निर्गुण परि बनला प्रभु देहासह सगुण रूप सविकारी ॥२५॥
रत जो निजपदिं त्यावरि धाराधरसम करी कृपादृष्टी
गुण अवगुण नच पाही सच्चिद्घन वर्षवी दयावृष्टी ॥२६॥
(ण)नखशिखिं नटली स्त्री जरि पतिसामीप्योचि सुखद रूप-वनीं
निज भक्तां प्रभु फलदाचि श्रितमूला जेवि वदानें तरू पवनीं ॥२७॥
राखी करुणार्णव तो वारी त्याचें अपारही व्यसन
लंब न करिता सादर नामासव हें असें जया व्यसन ॥२८॥
बहु मृदुमनें प्रभू तो दीनजनांवरि लगेच कळवळतो
पद्यश गायन तिकडें त्याचा हरिणासमान कल वळतो ॥२९॥
रित पुण्य जरी त्यावरि प्रभुपदिं राहे सदैव जो प्रणत
पूर्ण कृपा करि हो कां क्षत्रिय वैश्यादि शूद्र विप्र नत ॥३०॥
रत पदिं आविरत त्यांचे निववी संसार ताप अनुताप
(ण) नतजनभय हरणास्तव कष्ट न मानी धरी न तो ताप ॥३१॥
सतत भजन निरताचे करि ईप्सित कामधेनुपरि तूर्ण
दोहन नच होय जरी दुग्धें भाजन तरी न परिपूर्ण ॥३२॥
दिग्गज पंडित म्हणवी प्रभुनामें नर जरी असे अज्ञ
तद्यश पडतां श्रवणीं होई तत्काळ तोचि सारज्ञ ॥३३॥

सकल हिताहित रसने ! उपजविशीं म्हणुनि प्रार्थना तुजला
करतलमलवत् स्वर्गहि भजन करी मग नसोचि भय मजला ॥३४॥
लवहि न दवडि सदा तूं प्रभुनामाचीच काळजी वाही
मग ना तरि बुध म्हणती "जिव्हा नोहेच काळ जीवा ही" ॥३५॥
तनुरक्षार्णि रणशूरां अनेक नसती जसे रणीं कवच
स्थायिक दृढ विश्वासें राहि गुरूचें पुरेचि एक वच ॥३६॥
पिवळा वर्ण न सोडी हेम जरी ठेविलें विविध वर्णी
तदुपरि पाहि हिरा जरि त्या त्या समयीं दिसे विविधवर्णी ॥३७॥
सद्गुरु अंबररंगासम करण्यांस्तव तुला जसा रंगी
तदुपरि रंगुनि दे स्वर ध्वनित सुरामाजि जेवि सारंगी ॥३८॥
गुरु उपदेश करी मग निःसंशय घोक तीच तीच पदें
रूपज्ञान गुरूचें तत्कालाचि प्राप्त करुनि तुज जप दे ॥३९॥
माणीक मायबापहि भक्तांचा मित्र हीन दीनांचा
(णी) नीतिपथीं सांभाळुनि सांग 'यममस्तकीं सुखें नाचा' ॥४०॥
करि पूर्ण भक्त इच्छा, बल, हित, आयुष्य वाढवी प्रज्ञा
प्रथित प्रभुची आज्ञा 'भक्त प्रतिज्ञा तशीच गुर्वाज्ञा' ॥४१॥
भूवरि जीं जा कृत्यें देह करित त्यासवेंच भ्रमण करी
मन चंचल धांवे परि नाम प्रभुचें सदैव मनन करी ॥४२॥
हा अभ्यास घटवितां नामामृत हें मुखीं सदा राही
राहे विमुक्त नाठवि तनुपतनीं पुत्र, पौत्र दाराही ॥४३॥
जप करि नाम प्रभुचे रसने ! तुज सतत सांगणें बाई !
कीर्ति जगीं परमार्थहि साधुनियां प्रभुपदास ने माई ॥४४॥
जयजयकार प्रभुच्या ब्रीदावलिचा करोनि हित कळवी
यशवंतनाम सेवुनि साक्षात्कारहि समोक्ष तो मिळवी ॥४५॥

शालीबंडा हैद्राबाद द.
पो. शु. ८ शके १८४० गुरुवार ]

क. क्र. २२४ "प्रभूची ओढ"

२२५ वें मात्रावृत्त—पज्झटिका मात्रा १२,१६

संतत, चिंतित चिंताबाई
व्यवहारातिल त्याची घाई
शून्य वगळुनी तिथेंच नेई
तीविण चुकुनिहि शांत न होई १

नैराश्यानल[1] पेटु लागला
अनिर्देश्य खेदद्रोह[2] उठला
किंचित् अश्रुविमोचनस्रोतें[3]
हिरवळ उठतां सारे जाते २

हास्यचि झालें मम दुःखाचें
काय मोल ठरवूं मी त्याचें!
कपर्दिकप्राप्तिहि नाचविते
अभवभयेंच भयासचि बीते ३

दिक्कालाच्या पारहि पाही
माझ्याविण दिसतें नच कांहीं
दूरदूरान तुडविणें[4] नको तें
दिसलें पूर्ण काय जें होतें ४

मत्प्रभु जो मुक्तांचा राणा
भक्तकार्य हा ज्याचा बाणा
ज्यानें मज यांतुनि सोडविलें
संसाराचें सोनें झालें ५

रत्नें झालीं नक्षत्रांचीं
विश्वी उठल्याच अमृतैर्वीचीं[5]
भीती गेली अशाश्वतांची
ओढ लागली माझ्या प्रभुची ६

कल्पतरूफल कुजले सारे
सुधानीर कटुतर किति खारें
नंदनवन काट्यांनीं भरलें
आतां तिथें काय तें उरलें! ७

खप्पड, टक्कल गालीं, मालीं
रंभा उर्वशि वृद्धा झाली
तेथिल कीं सुरभीहि[6] वाळली
सुरलोकीची मोहिम फसली ८

इहामुत्र[7], हे दोन्हीं वारे
कर्णीं पडले जे परभारें
इकडुनि तिकडे गेले वारे
बिंग आज फुटलें हें सारें ९

सर्व सौख्य प्रभुनामिं विनटलें
सुंदरांत सुंदर हें असलें
अनंत ब्रह्मांडीं दुमदुमतें
विश्वसार कैवल्यधाम तें १०

शालीबंडा हैद्राबाद द.
शुक्रवार चैत्र ९ शके १८५१

---

१ निराशेचा अग्नि. २ अत्रपीर्य. ३ प्रवाहानें. ४ नाश. ५ अमृतलहरी. ६ कामधेनु. ७ परलोक.

## क. क्र. २२५ "तत्वज्ञान"

२२६ वें मात्रावृत्त—पादाकुलक (मात्रा) १६

**तत्वज्ञान** जया हृदिं राहे
तोच शौर्यशालीही आहे
शूराला त्रिभुवन वश होतें
त्याचें काय! कुठें? नच हो! तें १

श्रुति बोले "जो मित्रा असतो
आत्मा कैचा त्याला कळतो
अंतर्मुखता जेथें असते
आत्मशक्ति त्याते खरि पटते २

ज्याला अपुली शक्ति न ठावे
करुं म्हटल्यांही काय करावें?
त्यानें व्यर्थ जगीं जन्मावें
जन्मोंजन्मीं व्यर्थ मरावें ३

शौर्य एकदां स्फुरें जयाला
देहमोह कोठिल हो! त्याला
देह विसरुनी आत्मा जाणा!
ज्ञान्यांचा—शूरांचा बाणा ४

मु.अमळणेर तत्वज्ञानमंदिर पू.खान.
भा.व.१० श १८५४ रविवार ]

## क. क्र. २२६ "दिनचर"

२२७ वें मात्रावृत्त—वैतालीय (मात्रा) १४,१६

परवेदन होइ न वेदन अश्रू ना अवलोकुनि दाटे
**दिनचर**वेताल तयावरि वेश नराचा वेष्टित वाटे ॥१॥
कांहिं न वाटे कीं ज्यातें काढी कातरस्वर कोण तो !
कृति **वैतालीय**[1] तयाची परदुःखांत सौख्य जो गणतो ॥२॥
विहरत तो जेथें जेथें तद्भोंवतींच कीं वैतरणी
तो विद्यमान वैवस्वत[2] पडु न दे तींत कशींहि तरणी[3] ॥३॥
अपुल्या पायांतिल काटा अर्धामुर्धाच अगदिं साधा
दुसऱ्यांच्या उरातिल सुरा त्याहुनि तीव्र आपुली बाधा ॥४॥
वैरी अपराधींहि नको लीलें तीक्ष्णशस्त्र भोंसकितो
कुणिं दुर्वच-शस्त्राभावीं-तरिही पिशाच्च नररूपीं तो ॥५॥

शालबिंडा हैद्राबाद द.
शनिवार (मध्यरात्रौ) फा.शु.६ शके १८५० ]

---

१ वेताळाची. २ यम. ३ नौका.

# प्रातकृ वृत्तें

## क. क्र. २२७ "गंगा कल्याणी"

२२८ वें प्राकृतवृत्त—(अभंग छंद) मोठा अभंग (प्रकार पहिला—ज्यांत दुसऱ्या व तिसऱ्या चरणाच्या शेवटीं यमक असतें)

आधीं मेळवावी ॥ कृपा त्या प्रभूची ॥
**गंगा कल्याणाची** ॥ तेव्हां वाहे ॥१॥
कोठें देश? काय? ॥ जें जें चिंत्ति राहे
जें जें कांहिं आहे ॥ सर्व त्याचे ॥२॥
कार्यीं धैर्य देई ॥ स्फूर्तीचा प्रेरक ॥
साध्यांचा पूरक ॥ तोच आहे ॥३॥
तारता प्रभू तो ॥ तारी ध्येयतारू ॥
नावाडी, उतारू ॥ सांभाळी जो ॥४॥
सिंधु, व्योम ज्याचे ॥ भूमीही तयाची ॥
व्यर्थ नर याची ॥ ज्याला त्याला ॥५॥

मु.प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
अ. आषा.शु. १२शके १८५३रविवार

## क. क्र. २२८ "यश लाभे त्यास"

२२९ वें वृत्त—(अभंग छंद) मोठा अभंग (प्रकार दुसरा) पहिल्यां दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणास यमक असतें.

टाकोनीया देव ॥ कैसी देवघेव ॥
तोच स्वयमेव ॥ सर्वाठायीं ॥१॥

सांडोनीया ईश ॥ त्यास केविं देश
सौख्य लवलेश ॥ व्हावें कैसें? ॥२॥
कैसें प्रभुवीण ॥ विश्वीं अधिष्ठान ॥
तयावीण शीण ॥ यत्नें सारी ॥३॥
सांभाळी विश्वाला ॥ सोडोनी तयाला
भीक ज्याला त्याला ॥ अन्न मागे ॥४॥
जाणावें देवास ॥ धरा हा हव्यास !
यश लाभे त्यास ॥ जेथें तेथें ॥५॥

मु. सुरत
अ.आषा.शु.९शके १८५३ बुधवार ]

---

## क. क्र २२९ "दीपावली"

२३० वें प्राकृतवृत्त—(लहान) अभंग–यास दोन चरण असतात प्रत्येक चरणास आठ आठ अक्षरें (क्वचित् प्रथम चरणास सहा अक्षरें) अथवा दोन्ही चरणास यमक असते.

दैन्य पावलों पावलीं ॥
सुचे कैशी दीपावली? ॥१॥
शुद्ध देशी वस्तूवीण ॥
नाच व्हावा घरीं सण ॥२॥
नाहीं फटाकडया देशी ॥
तेव्हां दिवाळी ही कशी? ॥३॥
गेले बंधू सत्याग्रही॥
आनंदोनी कारागृहीं ॥४॥
बंद्र[1] ते अंधारीं ॥
दिवे लावावे कां घरीं?॥५॥

मु.प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
अ.आषा. व. १२ शके १८५३. रविवार ]

---

१ क्वचित् सहा अक्षरांचा प्रकार.

## क. क्र. २३० "भाऊबीज"

२३० वें प्राकृत वृत्त—(लहान) अभंग—पहिला प्रकार.

बद्ध कारागारीं भ्राता ॥
भाऊबीज कैशी आतां ॥१॥
उचंबळे शोकसिंधू ॥
जिचा नाहीं घरीं बंधू ॥२॥
होय तीच ओवाळणी
अश्रु येती जे लोचनीं ॥३॥
देशभक्ती चित्तीं जोडा ॥
नाद दिवाळीचा सोडा ॥४॥
नाहीं भाऊ बीज ॥
कशी व्हावी तेव्हां तीज ॥५॥

मु. प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
शके १८५३ रविवार ]

---

## क. क्र. २३१ सणें "लोपलीं"

२३१ वें प्राकृत वृत्त—लहान अभंग—दुसरा प्रकार. दुसऱ्या चरणाची सात अक्षरें असून चौथें यमकाक्षर असतें.

सोडा दिवाळी, दसरा
कार्यें करा देशांचीं ॥१॥
आले जेव्हां दैन्यें जिणें ॥
आतां सणें लोपलीं ॥२॥
फुलें वेंचिली जयानीं ॥
रानशेणी कां वेंचा ॥३॥

मु. प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
अ. आषा. व. १२ शु. १८५३ रविवार ]

---

## क. क्र २३२ "आज काल"

२३२ वें प्राकृतवृत्त—लहान अभंग—तिसरा प्रकार याला आठ आठ अक्षरांचे चार चरण असतात; आणि पहिल्या तीन चरणाच्या शेवटीं यमक असतें.

सुचे कोणा कैसा सण ॥
चित्त साऱ्यांचें उद्विग्न ॥१॥
हिंद बांधवांचें मन— ॥
वाटे सांगे आज काल ॥२॥

मु. प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द.
अ. आषा. व. १२ शके १८५३ रविवार ]

---

१ क्वचित् सहा अक्षरांचा प्रकार.

## क. क्र. २३३ "देवाचें स्थान"

२३६ वें वृत्त—ओवी—ओवीचे चार चरण असतात व तीन चरणास प्रत्येकीं आठ आठ अक्षरें आणि चतुर्थ चरणास सात अक्षरें असावीत, असा मुख्यत: नियम; पण शब्द व अर्थाच्या अनुरोधानें कवि कामि अधिक अक्षरें योजितात.

देव राहे हृद्यंतरीं ॥ भक्त धुंडाळी भूवरी ॥
कोणीं देउळाभीतरीं ॥ राहतोसें जाणती ॥१॥
ईश ठेवोनि अंतरीं ॥ भक्त देवास अंतरी ॥
ऐशा नवलाची सरी ॥ नाच येई दुजाला ॥२॥
देव सद्भक्तिच्या घरीं ॥ भक्त जाणे "तो अंबरीं" ॥
व्योम भूची बरोबरी ॥ व्हावी तरी ती कशी ? ॥३॥
विश्वीं जो पूर्ण भरला ॥ गेल्यां तो बघवयाला ॥
ऐसा विश्वेश निराळा ॥ कोणास कैसा दिसे? ॥४॥
शिव होवोनी असावें ॥ शिवास तेव्हां भजावें ॥
निसर्गाशीं तो स्वभावें ॥ सामावेल सदाचा ॥५॥

मु. दादर (मुंबई)
अ. आषा. शु. १० श. १८५३ गुरुवार ]

---

## क. क्र. २३४ "ध्येय"

२३४ प्राकृत वृत्त—दिंडी त्याला चार चरण असतात. या छंदास अक्षरांचा नियम नाहीं. प्रत्येक चरणास एकोणीस मात्रा असतात नवव्या मात्रेवर अवसान असते एतदर्थ नऊ मात्रांचा एक व दहा मात्रांचा एक असे दोन भाग होतात. चरणाच्या शेवटीं अनुप्रास किंवा यमक असतें. ती कोठें दोन चरणांचीं कोठें चारी चरणांचीं सारखीं असतात.

सौख्य दु:खाचें भान झुगारोनी
ध्येय ठेवी जो ध्यानिं, मनीं, स्वप्नीं

त्यास शिवतें नच अन्य रूप नाम
आदि मध्यांतीं तोच पूर्णकाम ॥१॥
काल होता जो काल लुप्त झाला
दुःख जरि हें आजि सौख्यही उद्याला
मोद-खेदाचा चालतारहाट
चालुं राहोही कां न हेतुथाट ॥२॥
बुद्धि चालवि जो आपुली अचाट
मिळवि कसल्याही अडचणींत वाट
तया कंटक—लव होय मखमलीची
तीच जीवननदि देइ सुधावांची ॥३॥
ध्येय ठरवुनि जो करित राहि काम
त्यांत तेव्हां ये कांहिं तरी राम
साध्य करण्याते धरिल जो चिकाटी
तो निरोधावरि लावुं शके काठी ॥४॥
निश्चयाचें बल सर्व कांहिं हो तें
कष्ट केल्यानें इष्ट पूर्ण होतें
रक्त सांडुनि जी प्राप्त कीर्ति व्हावी
तेंवि घर्मेहि, यश सारखेंचमिळवी ॥५।

प्रभुदरबार शालीबंडा हैद्राबाद द. ]
बुधवार आषा.व.५शके १८५२ ]

## क. क्र. २३९ "दैन्य न गेलें कांहीं

२३५ वृत्त—साकी[१]—यातील प्रथम द्वितीय चरणास १६,१२ अशा २८ मात्रा ( चार मात्रांचा १ गण असे ७ गण आणि त्रितीय व चतुर्थ चरणास १० व १४ मात्रा)असतात.

द्रव्य मिळविलें जरिहि लुटीनें दैन्य न गेलें कांहीं ॥
हांव सांगते अंतृप्तिमनिंची अजुनी गेली नाहीं ॥
पाहिन सद्धर्मा ॥ असला कसल्याही कर्मा ॥१॥
तें कसलें जीवित्व म्हणावें मानव्य हि जो मळवी ॥
द्रव्यासाठीं होइ लुटारू दुर्मार्गें तें मिळवी ॥
लाभे जरि हि शठें ॥ धर्माधर्म विचार कुठें ॥२॥
तो कसला संपन्न म्हणावा- निज देशा टाकोनी—
धांवुनि येतो लूट मिळविण्यां परक्यांच्या सदनीं
इह पर हे दोन्हीं ॥ बसतो पूर्ण गमावोनी ॥३॥
बुभुक्षिताला धर्म कोठला ? पापविचारहि कैसा ?
कोठिल शान्ती, विचार कसला? एक त्या पैसा ! ॥
धनहि यदा नासे ॥ लोकीं चोहिंकडोनिं फसे ॥४॥

---

१वृत्तदर्पणकारांनी "प्रत्येक साकीला दोन चरण किंवा दोन अर्धे असतात" असा निर्णय दिला आहे. कोठें कोठें तसा प्रचारही आढळतो, पण नाटकांतून तिसरें चरण १० मात्रांचे व चवथें १४ मात्रांचें सार्वत्रिक प्रचारांत आहे. हिंदी भाषेंतील साक्यांना ज्यांचा उपयोग कीर्तनकार प्रत्यही करीत असतात (सुन सुन साधोजी ॥ राजाराम कहोनाजी) असे आणखी दोन चरण जोडलेलें दिसून येतात, सबब प्रचाराच्या दृष्टीनें हाच प्रकार येथें दिला आहे.

दुष्कृतिहुनिही बरी कितिबरी हीन याचना, भिक्षा ॥
फसवणूक वा लूट–पाप तें, मिळेला नच शिक्षा ॥
नाहीं शौर्यकृती ॥ फसवुनि नेता संपत्ती ॥ ५ ॥

मु. प्रभासपट्टण (सोमनाथ)
अ.आषाढ शु.१ श.१८५३ बुधवार.

---

### क. क्र. २३६ " येवढें म्हणि द्यावें "

२३६ वें प्राकृतवृत्त–घनाक्षरी हें षोडष चरणी वृत्त आहे. प्रत्येक त्रिचरणीं अक्षरें ८ मात्रा १२ व चतुर्थ चरणीं अक्षरें ७ मात्रा ११ असून प्रत्येक पादाच्या पहिल्या तीन तीन चरणांचीं यमकें आणि प्रत्येक पादाच्या चवथ्या चवथ्या चरणाची यमकें असतात.

बा ! जगदीश महेशा ! ॥ सात्विकाचि सदावेशा ! ॥
देउनि पुरवी आशा ॥ दीनदैन्य हरावें ॥ १ ॥
विसरवी भेदवैर ॥ समता विचरो स्वैर ॥
सतत असा दे धीर ॥ महत्कार्य घडावें ॥ २ ॥
नेत्रपूर अंतरुनी ॥ अंगांत सळसळोनी ॥
खेळत असुनी पाणी ॥ इतरां पाजवावें ॥ ३ ॥
स्वत्व सदैव वसावें ॥ हरवलें तें मिळावें ॥
हेंच भारतास हवे ॥ येवढें म्हणि द्यावें ॥ ४ ॥

मैलारदेवपल्ली, हैद्राबाद द.
रविवार (मध्यरात्रोत्तर) माघ वद्य ८ श. १८५०

---

[ अपूर्ण

---

१ सत्याचें वसतिस्थान.

॥ श्री सद्गुरु माणिकप्रभु प्रसन्न ॥

# परिशिष्ट पहिलें.

## काव्य-कुसुम-कलिका द्वितीय-उद्भव "पुष्पपाकळयां" तील वृत्तसंख्यानुक्रमसूची.

| वृत्तक्रमांक. | वृत्तांची नांवें. | वृत्तलक्षणा. | अक्षरसंख्या. | ग्रंथाधार. वृत्तदर्पण. | ग्रंथाधार. गीर्वाणलघुकोश. | ग्रंथाधार. समग्र पत. | ग्रंथाधार. छन्दोमंजरी. | काव्य कुसुम-कलिका द्वितीय-उद्भव-"पुष्पपाकळ्यां"तील कविता क्रमांकासह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | उक्ता ( एकाक्षरी ) | | | | | | | |
| १ | श्री | ऽ<br>ग | १ | ० | ० | ० | छं. | १ तें. |
| | अत्युक्ता ( दोन अक्षरी ) | | | | | | | |
| २ | स्त्री. | ऽ ऽ<br>ग ग | २ | ० | ० | ० | छं. | २ स्त्री, श्री.<br>३ हेवा, देवा. |

| | | |
|---|---|---|
| | **मध्या (तीन अक्षरी) वृत्तें.** | |
| ३ | नारी | SSS<br>म |
| ४ | मृगी | S IS<br>र |
| | **प्रतिष्ठा (चार अक्षरी) वृत्तें.** | |
| ५ | कन्या | SSS S<br>म ग |
| ६ | सती | III S<br>न ग |
| | **सुप्रतिष्ठा (पांच अक्षरी) वृत्तें.** | |
| ७ | पंक्ति | SII S S<br>भ ग ग |
| | **गायत्री (सहा अक्षरी) वृत्तें** | |
| ८ | तनुमध्या | SSI ISS<br>त य |
| ९ | वसुमती | SSI IIS<br>त स |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३ | ० | ० | ० | छं. | ४ अतृप्तां<br>५ आवृत्ति. |
| ३ | ० | ० | ० | ” | ६ मृगी. |
| ४ | ० | ० | ● | ” | ७ सुकन्या.<br>८ कुकन्या. |
| ४ | ० | ० | ० | ” | ९ सती. |
| ५ | ० | ० | ० | ” | १० पंक्ति |
| ६ | ० | ० | पं. १२२/८ | छं. | ११ देहि. |
| ६ | ० | ० | ० | छं. | १२ वसुमती. |

| क्र. सं. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | अ. सं. | ग्रन्थाधार. वृ. र. | गी. वि. | प. प्र. | छं. म. | का—कु.-क. द्वि.—उ. पु.पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १० | विद्युल्लेखा | SSS SSS<br>म म | ६ | ० | ० | पं. ५२७/८ | छं. | १३ विद्युल्लेखा. |
| ११ | शशिवदना | III ISS<br>न य | ६ | ० | ० | ० | ” | १४ शशिवदना. |
| १२ | सोमराजी | ISS ISS<br>य य | ६ | अपटे-कोश. | | ० | ० | १५ विचारा कुणाला?<br>१६ सोमराजी. |
| | उष्णिक् (सात अक्षरी) वृत्तें. | | | | | | | |
| १३ | कुमारललिता | ISI IIS S<br>ज स ग य. पा. | ७ | ० | ० | ० | छं. | १७ घडेल कधिं कां हें? |
| १४ | मदलेखा | SSS IIS S<br>म स ग य. पा. | ७ | ० | ० | ० | ” | १८ मदलेखा. |
| १५ | मधुमति | III III S<br>न न ग य. पा. | ७ | ० | ० | ० | ” | १९ मधुमति. |
| | अनुष्टुप् (आठ अक्षरी) वृत्तें | | | | | | | |
| १६ | अनुष्टुप् | प्रतिचरणीं पांचवें लघु ६ वें. गुरु, २ऱ्या व ४थ्या पादांत ७वें लघु. | ८ | वृ. | गी. | पं. | ” | २० एक |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १७ | गजगति | ॥ ।S—॥ । S<br>न भ लग | ४+४= | ८ | ० | गी. | ० | ० | २१ गजगति. |
| १८ | चित्रपदा | SI I—SIISS<br>भ भ गग | ३+५= | ८ | ० | ० | ० | छं. | २२ वृत्ति. |
| १९ | नगस्वरूपिणी—( २ प्रमाणिका ). | IS IS IS IS<br>ज र लग | य. पा. | ८ | वृ. | गी. | ० | छं. | २३ अजूनि वाट-चालतो. |
| २० | प्रमाणिका—( २ नग—स्वरूपिणी ). | ” ” ” ” ” | | ८ | वृ. | गी. | ० | छं. | —— ” ” ” |
| २१ | माणवक—( २ माण—वकक्रीडित. ) | SI ISSIIS<br>भ तलग | य. पा. | ८ | वृ. | गी. | ० | ० | २४ काल कसें ! आज कसें ! |
| २२ | माणवकक्रीडित—(२माणवक) | ” ” ” ” | | ८ | ० | ० | ० | छं. | —— ” ” ” ” |
| २३ | रुचिरा (१) | ॥ ॥ ॥<br>न न लल | य. पा. | ८ | ० | ० | पं. ५१७/८ | ० | २५ तळमळ. |
| २४ | वक्त्र—(२ वक्र). | अक्षरें ८गणांचा नियम नाहीं. | | ८ | ० | ० | ० | छं. | २६ चित्तस्थैर्य. |
| २५ | वक्र—(२वक्त्र). | ” ” ” ” | | ८ | ० | ० | पं. ५१.१/८ | ० | —— ” ” |
| २६ | वितान. | SSI SI SIS<br>त र लग | य. पा. | ८ | ० | ० | ० | छं. | २७ वितान. |

| अ. क्र. | वृत्तांचीं नांवें. | वृत्तगणलक्षणा. | | अ. सं. | ग्रंथाधार. | | | | का.–कु.–क. द्वि.-उ. पु.पा. तलि क.क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | वृ. र. | गी. गो. | पिं. | छं. मं. | |
| २७ | विद्युन्माला | SSSS–SSSS<br>म म गग | ४+४ = | ८ | वृ. | गी. | पं. | छं. | २८कोठें कांहीं-कोठें कांहीं. |
| २८ | समानिका | SI SI SI SI<br>र ज ग ल | य. पा. | ८ | वृ. | गी. | पं. | छं. | २९आत्मघातकी-३०खूणगांठ. |
| | **बृहती (नऊ अक्षरी) वृत्तें.** | | | | | | | | |
| २९ | चारुहासिनी | ISISSISIS<br>ज त र | य. पा. | ९ | ० | ० | पं. | ० | ३१ चारुहासिनी. |
| ३० | बृहती–( २भुजंगशिशुभृता ) | IIIIIIS-SS<br>न न म | ७+२ = | ९ | ० | गी. | ० | ० | ३२ वाणी. |
| ३१ | भुजंगशिशुभृता–( २बृहती ) | ,, ,, ,, | य. पा. | ९ | ० | ० | ० | छं. | — ,, |
| ३२ | भुजंगसंगता | IIS-IS IS IS<br>स ज र | ३+६ = | ९ | ० | गी. | ० | ० | ३३ भुजंगसंगता. |
| ३३ | मणिबंध–( २ मणिमध्य ) | SI ISSS IIS<br>भ म स | य. पा. | ९ | वृ. | ० | ० | ० | ३४रसिक--३५प्रबोधन–३६ वृत्ति. |
| ३४ | मणिमध्य–( २ मणिबंध ) | ,, ,, ,, | ,, ,, | ९ | वृ. | गी. | ० | ० | — ,, ,, ,, |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३५ | विश्लोक | SSISISSSS<br>त र म | य. पा. | ९ | ० | ० | पं. ५१६ | ० | ३७ स्वार्थाचा तवा. |
| ३६ | हलमुखी | SIS III IIS<br>र न स | य. पा. | ९ | ० | ० | ० | छं. | ३८ हलमुखी. |
| | **पंक्ति ( दहा अक्षरी ) वृत्तें.** | | | | | | | | |
| ३७ | उपस्थिता | SSS IS IIS IS<br>त ज ज ग | य. पा. | १० | ० | ० | ० | छं. | ३९ आनंद. |
| ३८ | कामदा | SISIS–SISIS<br>र य ज ग | ५+५= | १० | वृ. | ० | ० | ० | ४० धावना. |
| ३९ | चंपकमाला-(२ रुक्मवती). | SIISS–SIIS S<br>भ म स ग | ५+५= | १० | वृ. | गी. | ० | छं. | ४१ मी नसतानां. |
| ४० | त्वरितगति | IIIIS–IIIIS<br>न ज न ग | ५+५= | १० | ० | गी. | ० | ० | ४२ त्वरितगति. |
| ४१ | पणव | SSS III ISS I<br>म न य ल | य. पा. | १० | ० | ० | पं. ५२४ | छं. | ४३ नामपणव. |
| ४२ | मत्ता | SSS S–IIIISS<br>म भ स ग | ४+६= | १० | वृ. | गी. | ० | छं. | ४४ आकाशाची–भरारी. |
| ४३ | मनोरमा | II IS IS IS IS<br>स र ज ग | य. पा. | १० | ० | ० | ० | छं. | ४५ मनोरमा. |

| अ. क्र. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | | अ. संख्या. | ग्रंथाधार. | | | | का.—कु.—क.—द्वि.—उ. पु. पा. तलि क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | वृ. र. | गी. गो. | प. पिं. | छं. मं. | |
| ४४ | मयूरसारिणी | S ISISISISS<br>र ज र ग | य.पा.= | १० | ० | ० | ० | छं. | ४६ मयूरसारिणी. |
| ४५ | मात्रासमक | SS I IS- I IS SS<br>त ज य ग | ५+५= | १० | ० | ० | ० | पं. ५१६/८ | ४७ टेवा. |
| ४६ | रुक्मवती- ( २ चंपकमाला ) | ३९वें वृत्त-'चंपकमाला' पहा. | | १० | गी. | ० | ० | छं. | —क. क्र. ४१ " मीनसतांना. " पहा. |
| ४७ | वानवासिका | SI I SS IS IS S<br>भ त र ग | य.पा. | १० | ० | ० | पं. ५१६/८ | ० | ४८ बुद्धि. |
| ४८ | शुद्धविराट | SSS I IS IS IS<br>म स ज ग | य.पा. | १० | ० | ० | ० | छं. | ४९ शुद्धविराट. |
| ४९ | हंसी ( १ ) | SSS S-I I I I IS<br>म भ न ग | ४+६= | १० | वृ. | ० | पं. ५३५/८ | ० | ५० विश्वाधारा ! |
| | त्रिष्टुप् (अकरा अक्षरी) वृत्तें. | | | | | | | | |
| ५० | अनुकूला-( २ कुड्मलदती- ३ मौक्तिकमाला. ) | SI I SS- IIII SS<br>भ त न गग | ५+६= | ११ | ० | ० | ० | छं. | ५१ मौक्तिकमाला. |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५१ | अपरांतिका | SIS III SIS IS<br>र न र लग | य. पा. | ११ | ० | ० | पं. ५१६/८ | ० | ५२ अपरांतिका. |
| ५२ | इंद्रवज्रा | SSI SSI ISI SS<br>त त ज गग | य. पा. | ११ | वृ. | गी. | पं. | छं. | ५३ गुर्जरप्रांतप्रवास.<br>५४ मध्यमंगल. |
| ५३ | उपेंद्रवज्रा | ISI SSI ISI SS<br>ज त ज गग | य. पा. | ११ | वृ. | गी. | पं. | ” | ५५ उपेंद्रवज्रा. |
| ५४ | एकरूप | IIS IIS ISI SS<br>स स ज गग | य. पा. | ११ | ० | ० | ० | ” | ५६ एकरूप. |
| ५५ | कुड्मलदंती ( २ अनुकूला-<br>३ मौक्तिकमाला. ) | ५०वें वृत्त “अनुकूला”—पहा. | | ११ | ० | ० | ० | ” | —क. क्र. ५१<br>“मौक्तिकमाला” पहा. |
| ५६ | ग्लपक्ष | SIS ISI III SS<br>र ज न गग | य. पा. | ११ | ० | ० | पं. ११७/८ | ० | ५७ कीर्ति. |
| ५७ | चित्रा | SSI III IIS SS<br>त न स गग | य. पा. | ११ | ० | ० | पं. ११७/८ | ० | ५८ चित्रा. |
| ५८ | दोधक | SII SII SII SS<br>भ भ भ गग | य. पा. | ११ | वृ. | गी. | ० | छं. | ५९ मनाचे भांडे. |
| ५९ | प्रसग—( २ भद्रिका ) | III III SIS IS<br>न न र लग | य. पा. | ११ | ० | ० | ० | छं. | ६० भद्रिका. |
| ६० | भद्रिका—( २ प्रसंग. ) | ” ” ” ” | य. पा. | ११ | वृ. | ० | ० | छं. | — ” ” |

| अं. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | | अ. सं. | ग्रन्थाधार. | | | | का—कु.-क. द्वि.—उ. पु.पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | वृ. र. | गी. गो. | पं. प. | छं. मं. | |
| ६१ | भ्रमरविलसित | SSS S—II III IS<br>म भ न लग | ४+७= | ११ | वृ | गी | पं. | छं. | ६१ आयुष्य—<br>६२ क्षण न भरवंसा. |
| ६२ | मालती (१) | SSS SSS SSS SS<br>म म म गग | य.पा. | ११ | ० | गी. | ० | ० | ६३ विश्वाद्यंता. |
| ६३ | मौक्तिकमाला ( २ अनुकूला-<br>३ कुड्मलदंती. ) | ५० वें वृत्त "अनुकूला" पहा. | | ११ | वृ. | ० | ० | ० | क.क्र.५१ "मौक्तिक-<br>माला पहा." |
| ६४ | रथोद्धता | SIS III SIS IS<br>र न र लग | य.पा. | ११ | वृ. | गी | पं. | छं. | ६४ प्रेम. |
| ६५ | ललित | SIS IS—I IIS IS<br>र ज स लग | ५+६= | ११ | वृ. | ० | ० | ० | ६५ ललित. |
| ६६ | वातोर्मी | SSS S-II SSI SS<br>म भ त गग | ४+७= | ११ | ० | गी. | ० | छं. | ६६ वातोर्मी. |
| ६७ | वृत्ता | III III IIS SS<br>न न स गग | य. पा. | ११ | ० | ० | ० | छं. | ६७ देवाचे. |
| ६८ | शालिनी | SSS S-SI SSI SS<br>म त त गग | ४+७= | ११ | वृ | गी. | पं. | छं. | ६८ शालिनी—<br>६९ ईण. |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६९ | शुद्धकामदा | ॥। SIS-SIS । S<br>न र र लग | ६+५= | ११ | वृ. | ० | पं. १३८/८ | ० | ७० हृत्प्रसून. |
| ७० | श्येनी | SIS ISI SIS । S<br>र ज र ल ग | य. पा. | ११ | ० | ० | ० | छं. | ७१ श्येन ( पक्षी.) |
| ७१ | स्वागता | SIS ॥। S॥ SS<br>र न भ गग | य. पा. | ११ | वृ. | गी. | पं. | छं. | ७२ स्वागतास्तव. |
| | जगती ( बारा अक्षरी) वृत्तें. | | | | | | | | |
| ७२ | इंद्रवंशा | SSI SSI ISI SIS<br>त त ज र | य. पा. | १२ | वृ. | गी. | पं. | छं. | ७३ ती–ही. |
| ७३ | चंद्रवर्त्म | SIS ।–॥ S॥ ॥S<br>र न भ स | ४+८= | १२ | ० | गी. | ० | छं. | ७४ नामछंद. |
| ७४ | जलधरमाला | SSS S–॥ ॥S SSS<br>म भ स म | ४+८= | १२ | ० | गी. | ० | ० | ७५ जलधरमाला. |
| ७५ | जलोद्धतगति | ISI ॥S–ISI ॥S<br>ज स ज स | ६+६= | १२ | वृ. | गी. | पं. ५३३/८ | छं. | ७६ कार्याकार्य. |
| ७६ | तनुमध्याद्विरावृत्तावृत्त | SSI ISS–SSI ISS<br>त य त य | ६+६= | १२ | ० | ० | पं. १०३/८ | ० | ७७ चित्तेच्छितदाता |
| ७७ | तामरस | ॥। IS–। ISI ISS<br>न ज ज य | ५+७= | १२ | ० | गी. | ० | ० | ७८ तामरस. |

| अं. क. | वृत्तांचीं नांवें. | वृत्तगणलक्षणा. | | अ. सं. | ग्रंथाधार. | | | | का.—कु.—क. द्वि.-उ. पु.पा. तील क.क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | वृ. र. | गी. गो. | पं. प. | छं. मं. | |
| ७८ | तोटक | IIS IIS IIS IIS<br>स स स स | य. पा. | १२ | वृ. | गी. | पं. | छं. | ७९ गिरिराज. |
| ७९ | द्रुतविलंबित | III SII SII SIS<br>न भ भ र | य. पा. | १२ | वृ. | गी. | ० | छं. | ८० निजदुःख. |
| ८० | नवमालिका—(२नवमालिनी) | III ISI SII ISS<br>न ज भ य | य. पा. | १२ | ० | गी. | ० | ० | ८१ नवमालिका. |
| ८१ | नवमालिनी—(२नवमालिका) | ” ” ” | ” ” | १२ | ० | ० | ० | छं. | — ” ” ” |
| ८२ | पुट | III IIISS—S ISS<br>न न म य | ८+४= | १२ | ० | ० | ० | छं. | ८२ पुट. |
| ८३ | प्रभा—( २ मंदाकिनी ) | III III S—IS SIS<br>न न र र | ७+५= | १२ | ० | गी. | पं. ५०४ | ० | ८३ मंदाकिनी. |
| ८४ | प्रमिताक्षरा | IIS ISI IIS IIS<br>स ज स स | य. पा. | १२ | वृ. | गी. | पं. | छं. | ८४ चुकल्यापथीं. |
| ८५ | प्रियंवदा | III S—II IS—I SIS<br>न भ ज र | ४+४+४= | १२ | वृ. | ० | ० | ० | ८५ मन. |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ८६ | भुजंगप्रयात | ISS ISS- ISS ISS<br>य य य य | ६+६= | १२ | वृ. | गी. | पं. | छं. | ८६ भुकेन्रा. |
| ८७ | मणिमाला (१) | SSI ISS–SSI ISS<br>त य त य | ६+६= | १२ | ० | गी. | ० | ० | ८७ माझी मणिमाला. |
| ८८ | मंदाकिनी-(२प्रभा.) | ८३ वें वृत्त-"प्रभा"-पहा. | | १२ | ० | गी. | ० | ० | क. क्र ८३ "मंदाकिनी"–पहा. |
| ८९ | मालती–(२)–(२यमुना–३ वरतनू) | III IS-I ISI SIS<br>न ज ज र | ५+७= | १२ | वृ. | गी. | ० | छं. | ८८ कुणीतरी. |
| ९० | मौक्तिकदाम | ISI ISI ISI ISI<br>ज ज ज ज | य. पा. | १२ | ० | ० | पं. | ० | ८९ मौक्तिकदाम. |
| ९१ | यमुना–(२ मालती(२)–३ वरतनू) | ८९वें वृत्त "मालती" (२)पहा. | | १२ | ० | गी. | ० | ० | क. क्र. ८८"कुणितरी" पहा. |
| ९२ | यूथिका | SIS- III SII SIS<br>र न भ र | ३+९= | १२ | वृ. | ० | ० | ० | ९० अवधूत. |
| ९३ | वरतनू-(२मालती (२)-३ यमुना. | ८३वें वृत्त "मालती(२)"पहा. | | १२ | ० | ० | ० | छं. | –क. क्र.८८ 'कुणितरी' पहा. |
| ९४ | वैश्वदेवी | SSS SS-S ISS ISS<br>म म य य | ५+७= | १२ | वृ. | ० | ० | छं. | ९१ वारा-९२ वावटळ-९३ प्रतिबिंब. |

| क्र. सं. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | | अ. संख्या. | ग्रंथाधार. वृ. र. | गी. गो. | पं. प. | छं. मं. | का.—कु.—क.—द्वि.—उ. पु. पा. तलि क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ९५ | वंशस्थ | ISI SSI ISI SIS<br>ज त ज र | य. पा. | १२ | वृ. | गी. | पं. | छं. | ९४ तो—हा. |
| ९६ | सारंग | SSI SSI SSI SSI<br>त त त त | य. पा. | १२ | ० | ० | पं. ३<३ | ० | ९५ सारंग. |
| ९७ | स्रग्विणी | SIS SIS SIS SIS<br>र र र र | य.पा. | १२ | वृ. | गी. | पं. | छं. | ९६ सागरा. |
| | **अतिजगती (तेरा अक्षरी) वृत्तें** | | | | | | | | |
| ९८ | उत्पलिनी-(२ क्षमा-३ चंद्रिका) | III III—SSI SSI S<br>न न त त ग | ६+७= | १३ | ० | गी. | ० | ० | ९७ चंद्रिका. |
| ९९ | कनकप्रभा—(२ प्रबोधिता—३ मंजुभाषिणी—४ सुनंदिनी.) | IIS IS—I IIS ISI S<br>स ज स ज ग | ५+८= | १३ | ० | ० | ० | छं. | ९८ मंजुभाषिणी. |
| १०० | कलहंस—(२ कुटजा—३ नवनंदिनी-४ प्रभावती-५ सिंहनाद.) | IIS ISI IIS IIS S<br>स ज स स ग | य. पा. | १३ | ० | गी. | ० | ० | ९९ कविरोदन-<br>१०० सिंहनाद. |
| १०१ | कुटजा (२ कलहंस—३ नवनंदिनी—४ प्रभावती-५ सिंहनाद) | ,, ,, ,, ,, ,, | ,, | १३ | ० | गी. | ० | ० | ,, ,, |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १०२ | *कुटिलगति-(२-गाथा (३) | ।।। ।S। SS। SS। S<br>न ज त त ग य.पा. | १३ | ० | ० | पं. ५१३/८ | ० | १०१ कालकुटिलगति. |
| १०३ | क्षमा-(२उत्पलिनी-३चंद्रिका) | ९८ वें वृत्त "उत्पलिनी" पहा. | १३ | ० | गी. | ० | ० | क.क्र.९७ 'चंद्रिका' पहा ! |
| १०४ | गाथा(३)-२कुटिलगति) | १०२वें वृत्त-'कुटिलगति' पहा. | १३ | ० | ० | पं. ५०४/८ | ० | क.क्र.१०१ 'कुटिलगति" पहा. |
| १०५ | चंद्रिका-(२उत्पलिनी-३क्षमा) | ९८ वें वृत्त-'उत्पलिनी' पहा. | १३ | ० | गी. | ० | ० | क.क्र.९७ 'चंद्रिका' पहा. |
| १०६ | नवनंदिनी-(२-कलहंस-३ कुटजा-४प्रभावती-५सिंहनाद. ) | १०० वें वृत्त-'कलहंस' पहा ! | १३ | ० | ० | पं. ५१३/८ | ० | क. क्र.९९कविरोदन १०० सिंहनाद पहा. |
| १०७ | प्रबोधिता-( २ कनकप्रभा-३ मंजुभाषिणी-४ सुनंदिनी.) | ९९ वें वृत्त-'कनकप्रभा' पहा. | १३ | ० | गी. | ० | ० | क.क्र.९८ "मंजुभाषिणी" पहा. |
| १०८ | प्रभावती-(२कलहंस-३कुटजा-४नवनंदिनी-५सिंहनाद.) | १०० वें वृत्त "कलहंस" पहा. | १३ | ० | गी. | ० | ० | क.क्र.९९ कविरोदन १०० सिंहनाद पहा. |
| १०९ | प्रहर्षिणी | SSS-।।। ।S। S।S S<br>म न ज र ग ३+१०= | १३ | वृ. | गी. | पं. | छं. | १०२ प्रहर्षिणी. |
| ११० | मंजुभाषिणी-(२कनकप्रभा-३ प्रबोधिता-४ सुनंदिनी.) | ९९वें वृत्त—"कनकप्रभा" पहा. | १३ | वृ. | गी. | पं. | छं. | क.क्र.९८ " मंजुभाषिणी " पहा. |

* वृत्तरत्नाकरांत न न त त ग ही लक्षणा दिली आहे; पण पंतांनी वरील लक्षणा स्वीकारिली आहे.

| अ. क्र. | वृत्तांचीं नांवें. | वृत्तगणलक्षणा. | अ. सं. | ग्रंथाधार. वृ. र. | गी. गो. | प. पं. | छं. मं. | का.-कु.-क. द्वि.-उ. पु.पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १११ | मत्तयूर-ा-ी | SSS S-SI ISS IIS S म त य स ग ४+९= | १३ | वृ. | गी. | पं. | छं. | १०३ टाहो. |
| ११२ | रुचिरा (२). | ISI S-II IIS ISI S ज भ स ज ग ४+९= | १३ | ० | गी. | ० | छं. | १०४ चिररुचिरा. १०५ हुडकुं तुला-कुठेंतरी-१०६ मुलें. |
| ११३ | विभावरी | III SII ISI ISI S न भ ज ज ग य. पा. | १३ | वृ. | ० | ० | ० | १०७ विभावरी. |
| ११४ | सिंहनाद-(२कलहंस-३कुटजा-४नवनंदिनी-५प्रभावती ) | १००वें वृत्त "कलहंस"पहा | १३ | ० | गी. | ० | ० | -क. क्र. ९९ कवि-रोदन- १०० सिंहनाद पहा. |
| ११५ | सुनंदिनी (२कनकप्रभा-३प्रबोधिता-४मंजुभाषिणी ) | ९९वें वृत्त "कनकप्रभा"पहा. | १३ | ० | गी. | ० | ० | क. क्र. ९८ "मंजुभाषिणी " पहा ! |
| | **शकरी (चौदा अक्षरी ) वृत्तें.** | | | | | | | |
| ११६ | अपराजिता | III III S-IS IIS I S न न र स लग ७+७= | १४ | ० | गी. | ० | छं. | १०८ मागणी. |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११७ | असंबाधा | SSS SS–I III IIS SS<br>म त न स गग | ५+९= | १४ | वृ. | गी. | ० | छं. | १०९ दुःख. |
| ११८ | उद्धर्षिणी-( २ मधुमाधवी-<br>३ वसंततिलका-४ सिंहोद्धता-<br>५ सिंहोन्नता ) | SSI SII ISI ISI SS<br>त भ ज ज गग | य. पा. | १४ | वृ. | ० | ० | छं. | ११० स्वातंत्र्य-<br>१११ साहित्यसेवक-<br>११२ सिंहावलोकन. |
| ११९ | कुटिला–( २ मध्यक्षामा-<br>३ हंसश्येनी ) | SSS S–II III ISS SS<br>म भ न य गग | ४+१० | १४ | ० | गी. | ० | ० | ११३ मानव्य. |
| १२० | कुररीरुता-( २ प्रमदा ) | III ISI–SII ISI I S<br>न ज भ ज लग | ६+८= | १४ | ० | गी. | ० | ० | ११४ प्रमदा. |
| १२१ | पथ्या-( २ मंजरी ) | IIS IS–I IIS ISS IS<br>स ज स य लग | ५+९= | १४ | ० | गी. | ० | ० | ११५ मंजरी. |
| १२२ | प्रमदा-( २ कुररीरुता ) | १२०वें. वृत्त 'कुररीरुता' पहा | | १४ | ० | गी. | ० | ० | क. क्र. ११४ 'प्रमदा' पहा. |
| १२३ | प्रहरणकालिता | III III S-II III I S<br>न न भ न लग | ७+७= | १४ | वृ. | गी. | पं. | छं. | ११६ नवशिशु. |
| १२४ | मंजरी-( २ पथ्या ) | १२१वें.वृत्त 'पथ्या' पहा. | | १४ | ० | गी. | ० | ० | क.क्र.११५'मंजरी'पहा. |
| १२५ | मधुमाधवी-( २ उद्धर्षिणी )<br>३ वसंततिलका -४ सिंहोद्धता-<br>५ सिंहोन्नता ) | ११८वें.वृत्त 'उद्धर्षिणी' पहा. | | १४ | वृ. | ० | ० | ० | क.क्र.११०स्वातंत्र्य,<br>१११साहित्य,११२-<br>'सिंहावलोकन' पहा. |

| क्र. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | अ. संख्या. | ग्रंथाधार. वृ. र. | गी. को. | पं. प. | छं. म. | का.—कु.—क.—द्वि.—उ. पु. पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १२६ | मध्यक्षामा--( २ कुटिला-- ३ हंसश्येनी ) | ११९वें वृत्त 'कुटिला' पहा. | १४ | वृ. | गी. | ० | ० | —क. क्र. ११३-'मानव्य'पहा. |
| १२७ | वसंततिलका--( २ उद्धर्षिणी-३ मधुमाधवी--४ सिंहोद्धता-५ सिंहोन्नता ) | ११८वें वृत्त 'उद्धर्षिणी' पहा. सन्मान्य छंदशास्त्रग्रंथकार-पिंगल महर्षिनीं वसंततिलकेचें लक्षण करून पुढें 'सिंहोन्नता काश्यपस्य' (काश्यप महर्षि वसंत तिलका वृत्तास 'सिंहोन्नता' हें नांव देतात ) असें सूत्र केलें आहे. | १४ | वृ. | गी. | पं. | छं. | क. क्र. ११०,१११ ११२ पहा. |
| १२८ | वासंती | SSS SSI III SSS SS म त न म गग य. पा. | १४ | ० | गी. | ० | ० | ११७ वासंती. |
| १२९ | सिंहोद्धता-(२ उद्धर्षिणी-३ मधुमाधवी--४ वसंततिलका -५ सिंहोन्नता ) | ११८वें. वृत्त 'उद्धर्षिणी' पहा | १४ | वृ | ० | ० | ० | क. क्र. ११०,१११ ११२ पहा. |
| १३० | सिंहोन्नता " " " | " " " " " " " " | १४ | ० | ० | ० | छं. | " " " " |
| १३१ | हंसश्येनी–( २ कुटिला– ३ मध्यक्षामा ) | ११९ वें वृत्त " कुटिला" पहा | १४ | ० | गी. | ० | ० | क. क्र. ११३ 'मानव्य' पहा. |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | अतिशक्करी (पंधरा अ.) वृत्त. | | | | | | | | |
| १३२ | चंद्रावर्ता-(२ मणिगुणनिकर-३ शशिकला) | ।।। ।।। ।।। ।।। ।।S न न न न स | य. पा. | १५ | ० | ० | ० | छं. | ११८ शशिकला. |
| १३३ | चामर-(२ तूणक) | S।S ।S। S।S ।S। S।S र ज र ज र | य.पा. | १५ | वृ. | ० | ० | ० | ११९ अश्रु कां अनावर ! १२० तूणक. |
| १३४ | तूणक-(२ चामर) | S।S ।S।S–।S।S। S।S र ज र ज र | ७+८= | १५ | ० | गी. | ० | ० | " " " " |
| १३५ | मणिगुणनिकर (२ चंद्रावर्ता-३ शशिकला) | १३२वें. वृत्त 'चंद्रावर्ता' पहा. | | १५ | ० | ० | ० | छं. | क.क्र. ११८ 'शशिकला' पहा. |
| १३६ | मालिनी | ।।। ।।। SS-S।SS ।SS न न म य य | ८+७= | १५ | वृ. | गी. | पं. | छं. | १२१ धनमद. |
| १३७ | लीलाखेल | SSS SSS SSS SSS SSS म म म म म | य. पा. | १५ | ० | गी. | ० | ० | १२२ लीलाखेल. |
| १३८ | शशिकला-(२चंद्रावर्ता-३मणिगुणनिकर) | १३२वें. वृत्त 'चंद्रावर्ता' पहा. | | १५ | ० | गी. | ० | ० | क.क्र. ११८ 'शशिकला' पहा. |
| | अष्टि (सोळा अक्षरी) वृत्तें | | | | | | | | |
| १३९ | अचलधृति | ।।। ।।। ।।। ।।। ।।। । न न न न न ल | य. पा. | १६ | ० | ० | पं. ११६ | ० | १२३ अचलधृति. |

| अं. क्र. | वृत्तांची नांवें | वृत्तमयलक्षण | अ. सं. | ग्रन्थाधार. वृ. द. | गी. गो. | पं. प्र. | छं. म. | का—कु.-क. द्वि.—ज. पु.पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १४० | अश्वगति | SII SII SII SII SII S<br>भ भ भ भ भ ग य. पा. | १६ | ० | ० | पं. ५२०/८ | ० | १२४ अश्वगति भाग्यगति. १२५ माझें अश्वारोहण. |
| १४१ | ऋषभगजविलसित | SII SIS III III III S<br>भ र न न न ग य.पा. | १६ | ० | ० | ० | छं. | १२६ ऋषभगज-विलसित. |
| १४२ | चित्र | SISISISI—SISISISS<br>र ज र ज र ग ८+८= | १६ | ० | गी. | ० | ० | १२७ चित्र. |
| १४३ | पंचचामर | ISI SIS ISI SIS ISI S<br>ज र ज र ज ग य.पा. | १६ | वृ. | गी. | पं. | ० | १२८ भारता! १२९ सुबुद्धि. |
| १४४ | वाणिनी | III ISI SII ISI SIS S<br>न ज भ ज र ग य.पा. | १६ | ० | गी. | ० | ० | १३० वाणिनी. |
| १४५ | सूरा-( २ हरिगीतिका ) | SSISSSIS—SSISSSIS<br>त म य र त ग ८+८= | १६ | ० | ० | पं. १४६/८ | ० | १३१ सूरा. |
| १४६ | हरिगीतिका-( २ सूरा ) | ” ” ” ” ” ” | १६ | ० | ० | पं. ५०३/८ | ० | ” ” ” ” |
| | अत्यष्टि (सतरा अक्षरी) वृत्तें. | | | | | | | |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १४७ | अतिशायिनी | ॥S॥S।S।S-॥।S।SS<br>स स ज भ ज गग | १०+७= | १७ | ० | गी. | ० | ० | १३२ जगतिं तूंच-एक. १३३ निसर्ग. |
| १४८ | अवितथ-(२नर्कुटक-३नर्दटक) | ॥। ।S। S॥ ।S। ।S। ।S<br>न ज भ ज ज लग | य. पा. | १७ | | | | | व्यंकटाध्वरिकृत लक्ष्मिसहस्रस्तबक पृ. १५।११ |
| १४९ | नर्कुटक-(२अवितथ३नर्दटक) | ” ” ” ” ” | | १७ | ० | ० | पं. १८/८ | ० | १३४ नय. |
| १५० | नर्दटक (२अवितथ३नर्कुटक) | ” ” ” ” ” | | १७ | ० | गी. | ० | ० | पंतांनीं यति पादांतीं धरला आहे. |
| १५१ | पृथ्वी | ।S।॥S।S—॥।S।SS।S<br>ज स ज स य लग | ८+९= | १७ | वृ. | गी. | पं. | छं. | १३५ शारदागायन. १३६ सुहृदपात्निनिधन १३७ भावनामंदिरीं- १३८ उलट का मना १३९ सगुणघोषणा. |
| १५२ | मंदाक्रांता | SSSS-॥॥S-S।SS।SS<br>म भ न त त गग | ४+६+७ | १७ | वृ. | गी. | पं. | छं. | १४० विकृति- १४१ विरोध- १४२ जगुनि मिळतो स्वर्ग १४३ धन्य ती-धन्य भक्ति. १४४ ते-खरें भाग्यशाली. |
| १५३ | वंशपत्रपतित | S॥ S।S ॥। S—॥ ॥। ।S<br>भ र न भ न लग | १०+७ | १७ | ० | गी. | पं. | छं. | १४५ वंशपत्र. |

| अ. क्र. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | | अ. संख्या. | ग्रंथाधार. वृ. र. | गी. कों. | प. पं. | छं. मं. | का.—कु.—क.—द्वि.—उ. पु. पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १५४ | शिखरिणी | ISS SSS—III IIS SII IS<br>य म न स भ लग | ६+११= | १७ | वृ. | गी. | पं. | छं. | १४६ तैजस.<br>१४७ टकळी.<br>१४८ निर्सगाचीभेरी<br>१४९ वियोगी.<br>१५० उपासना कीं-विप्रलंभ ? |
| १५५ | हरिणी | III IIS-SSS S-IS IIS IS<br>न स म र स लग | ६+४+७= | १७ | वृ. | गी. | पं. | छं. | १५१ हरिणी. |
| | **धृति ( अठरा अक्षरी ) वृत्तें.** | | | | | | | | |
| १५६ | कुसुमितलतावेल्लिता | SSSSS—IIIII—SS ISSISS<br>म त न य य य | ५+६+७= | १८ | ० | गी. | प. | छं. | १५२ हृदयाची-सहाण. |
| १५७ | चित्रलेखा | SSSS—IIIIIIS—SISSISS<br>म भ न य य य | ४+७+७= | १८ | ० | गी | ० | ० | १५३ चित्रलेखा. |
| १५८ | नंदन | III ISI SII IS—I SIS SIS<br>न ज भ ज र र | ११+७= | १८ | ० | गी. | ० | ० | १५४ फिरती कारंजी. |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १५९ | नाराच–( २ सालसा ) | ।।। ।।। SIS SIS SIS SIS य. पा.<br>न न र र र र | १८० | गी. | ० | ० | | १५५ नाराच.<br>१५६ जनन मरण. |
| १६० | विबुधप्रिया–(२हरिनर्तनछंद) | SIS–IISIS–IISI S–IISIS ३+५ =<br>र स ज ज भ र ५+५ | १८ | वृ. | ० | पं. | छं. | १५७ विबुधप्रिया. |
| १६१ | शार्दूलललित | SSSIISISIIIS–SSIIIS १२+६=<br>म स ज स त स | १८० | गी. | ० | ० | | १५८ शार्दूलललित. |
| १६२ | सालसा ( २ नाराच ) | १५९वें. वृत्त “ नाराच ” पहा. | १८० | ० | पं. ५१०/८ | ० | | क.क्र. १५५ नाराच.<br>” १५६ जननमरण पहा. |
| १६३ | हरिनर्तनछंद-( २विबुधप्रिया ) | १६०वें. वृत्त ‘विबुधप्रिया’ पहा. | १८० | ० | पं. २६१/७ | ० | | क.क्र. १५७ ‘विबुधप्रिया’ पहा. |
| | अतिधृति [एकोणीस अक्षरी ] | | | | | | | |
| १६४ | मेघविस्फूर्जिता–( २ सुवृत्ता ) | ISSSSS-IIIIIS-SISSISS ६+६+७<br>य म न स र र ग | १९० | गी. | ० | छं. | | १५९ मेघविस्फूर्जिता. |
| १६५ | शार्दूलविक्रिडित | SSSIISISIIIS-SSISSIS १२+७=<br>म स ज स त त ग | १९ | वृ. | गी. | पं. | छं. | १६० माझी मराठी-मळा. १६१ व्यवहार-मग्न मनुजा. १६२-व्याख्यान. १६३ तो-माझा. १६४ माझें-मला १६५ जाणें कुणा १६६ वधुवरास. |

| अ. क्र. | वृत्तांची नांवें | वृत्तगणलक्षणा | | अ. सं. | ग्रन्थाधार. | | | | का —कु.-क. द्वि.—उ. पु.पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | वृ. र. | गी. गो. | प. प. | छं. मं. | |
| १६६ | सुमधुरा | SSSSISS—IIIIIS—SSIII S<br>म र भ न म न ग | ७+६+६= | १९ | ० | गी. | ० | ० | १६७ सुमधुरा. |
| १६७ | सुरसा | SSSSISS—IIIIIIS—S IIIS<br>म र भ न य न ग | ७+७+५= | १९ | ० | गी. | ० | ० | १६८ सुरसा. |
| १६८ | सुवृत्ता—( २ मेघविस्फूर्जिता.) १६४वें.वृत्त'मेघविस्फुर्जिता पहा | | | १९ | ० | ० | ० | छं. | क.क्र. १५९ 'मेघ-विस्फूर्जिता' पहा.- |
| | कृति ( वीस अक्षरी ) वृत्तें. | | | | | | | | |
| १६९ | गीतिका | IIS IS-IIS I SII—SISIISI S<br>स ज ज भ र सलग | ५+७+८= | २० | ० | गी. | ० | ० | १६९ गीतिका. |
| १७० | वृत्त | SIS ISISI—SISI SIS ISI SI<br>र ज र ज र ज गल | ८+१२= | २० | ० | ० | ० | छं. | १७० सुवृत्त. |
| १७१ | सुवदना | SSSSISS-IIIIIIS—SSII IS<br>म र भ न य भलग | ७+७+६= | २० | ० | गी. | ० | छं. | १७१ सुवदना. |
| | प्रकृति (एकवीस अक्षरी) वृत्तें. | | | | | | | | |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १७२ | धृतश्री–( २ पंचकावली–३सरसी ) | ।।।।SIS-।।।S।।S-।।S।S।S<br>न ज भ ज ज ज र | ७+७+७= | २१ | ० | गी. | ० | ० | १७२नंदनवन १७३ प्रभु येवढें करी. |
| १७३ | पंचकावली–(२ धृतश्री–३ सरसी) | ” ” ” ” ” ” | | २१ | ० | गी. | ० | ० | ” ” ” ” ” |
| १७४ | सरसी–( २ धृतश्री–३ पंचकावली ) | ” ” ” ” ” ” | | २१ | ० | गी. | ० | ० | ” ” ” ” ” |
| १७५ | स्रग्धरा | SSSSISS-।।।।।।S-SISSISS<br>म र भ न य य य | ७+७+७ | २१ | वृ. | गी. | पं. | छं. | १७४ सर्वव्यापी. |
| | **आकृति (बावीस अक्षरी) वृत्तें** | | | | | | | | |
| १७६ | अमृतध्वनि | SSI S-।। ।SS ।S । ।।S SISI।। S४+७<br>त भ य ज स र न ग७+४ | = | २२ | वृ. | ० | पं. ५१६/८ | ० | १७५ बहुरत्ना. १७६ बंधु. |
| १७७ | अश्वधाटी–(२मंदारमाला ) | SSIS-SISSIS-SISSIS-SISSIS४+६<br>त त त त त त त ग६+६ | = | २२ | वृ. | ० | पं. | ० | १७७ मंदारमाला. |
| | पंत'अमृतध्वनि'किंवा'अश्वधाटी म्हणतात(समग्रपंत८पृ.५१-पहा) पण वृत्तदर्पणांत तर 'अश्वधाटी'किंवा'मंदारमाला' असा उल्लेख आहे. | | | | | | | | |
| १७८ | उमा–(२मदिरा)(१) | S।।S।।–S।।S।।–S।।S।।–S।।S६+६<br>भ भ भ भ भ भ भ ग६+४ | = | २२ | वृ | ० | ० | ० | १७८ काय करूं ! |

| अ. क्र. | वृत्तांची नांवें | वृत्तगणलक्षणा | | अ. सं. | ग्रन्थाधार. | | | | का.—कु.-क. द्वि.—उ. पु.पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | वृ. र. | गी. शि. | पं. पि. | छं. म. | |
| १७९ | भद्रक | S‖ SIS ‖‖ SIS ‖‖ SIS ‖‖ S<br>भ र न र न र न ग | य. पा. | २२ | वृ. | गी. | ० | छं. | १७९ भद्रक. |
| १८० | मंदारमाला—( २अश्वधाटी ) | १७७वें. वृत्त ' अश्वधाटी ' पहा. | | २२ | वृ. | ० | पं. | ० | क. क्र. १७७ मंदारमाला. |
| १८१ | मदिरा(१)—(२उमा) | १७८वें. वृत्त ' उमा ' पहा. | | २२ | ० | गी. | ० | ० | क. क्र. १७८ ' काय करें ' पहा. |
| १८२ | हंसी (२) | SSS SSS SS—। ‖‖ ‖‖‖‖SS<br>म म त न न न स ग | ८+१४ | २२ | ० | गी. | ० | ० | १८० वाक्सेवा. |
| | विकृति (तेवीस अक्षरी) वृत्तें | | | | | | | | |
| १८३ | अद्रितनया-(२अश्वललित) | ‖‖ ISI S‖ IS-I S‖ ISIS‖‖S<br>न ज भ ज भ जभ लग | ११+१२ | २३ | ० | गी. | ० | ० | १८१ अद्रितनया. |
| १८४ | अश्वललित-( २ अद्रितनया ) | " " " " " | " | २३ | ० | ० | ० | छं. | " " " " |
| १८५ | मदिरा | S‖S‖-S‖S‖-S‖S‖-S‖ SS६+६<br>भ भ भ भ भ भ भ गग६+५ | = | २३ | वृ. | ० | पं. $\frac{२७१}{७}$ | ० | १८२ मदिरा. |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८६ | मदिरा किंवा सवाई (१) | SII SII-SII SII-SIS III-SII SS ६+६<br>भ भ भ भ र न भ गग ६+५ = | २३ | वृ. | ० | ० | ० | १८३ ध्यारदारि.<br>१८४ कवि व रसिक |
| १८७ | सवाई दुसरी | III ISI I–SI ISII–SI ISII-SI IS७+६<br>न ज ज ज ज ज ज लग ६+४ = | २३ | वृ. | ० | ० | ० | १८५ मार तुझ्या-बरि. |
| | संस्कृति (चोवीस अक्षरी) वृत्तें | | | | | | | |
| १८८ | तन्वी | SIISS-IIIIIIS-SIISIIIIIISS<br>भ त न स भ भ न य ५+७+१२= | २४ | ० | गी. | पं. | छं. | १८६ माझा प्रभु. |
| | अतिकृति (पंचवीस अक्षरी) वृत्तें | | | | | | | |
| १८९ | क्राचपदा | SIISS-SIISS-IIIIIII-IIIIIIS ५+५<br>भ म स भ न न न न ग ८+७ = | २५ | ० | गी. | पं. | छं. | १८७ छाया. |
| | उत्कृति (सव्वीस अक्षरी) वृत्तें | | | | | | | |
| १९० | भुजंगविजृंभित | SSSSSSSS-IIIIIIIIIS-ISIISIS<br>म म त न न न र सलग ८+११+७ | २६ | ० | गी. | ० | छं. | १८८ भुजंगविजृंभित. |
| | सत्तावीस ते (९९९) एकोन सहस्राक्षरी दंडक | | | | | | | |
| १९१ | दंडक | IIIIII SISSISSISSISSISSISSIS<br>न न र र र र र र र य. पा. | २७ | ० | गी. | ० | ० | १८९ एक उत्तर. |
| | (तीस अक्षरी) दंडक | | | | | | | |

| अ. नं. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | अ. संख्या. | ग्रंथाधार. | | | | का.—कु.—क.—द्वि.—उ. पु. पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | वृ. र. | श्रु. बो. | पिं. छं. | छं. मं. | |
| १९२ | अर्णदंडक | \|\|\|\|\|\|SISSISSISSISSISSISSISSIS य. पा.<br>न न र र र र र र र र | ३० | ० | ० | पं. ४४४/८ | ० | १९० आश्रसाष्टक. |
| | **अर्धसम वृत्तें** | | | | | | | |
| १९३ | अनंगक्रीडा | प्र. द्वि. चरणीं अक्षरें ८, ८ गुरु ...<br>त्रि.च. च. अक्षरें १६, १६ लघु.... | ८/१६ | ● | ० | पं. ५१७/८ | ० | १९१ विश्वाद्यानंग-क्रीडा. |
| १९४ | अपरवक्त्र | \|\|\| \|\|\| \|\|\| IS, \|\|\| ISI ISI SIS<br>न न न लग, न ज ज र ...... | ११/१२ | ० | गी. | ० | ० | १९२ अपरवक्त्र. |
| १९५ | आख्यानकी-(२ उप-जाति | इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा मिश्रण. | ० | ० | ० | पं. ५०६/८ | छं. | १९३ गुर्जरउष्मा.<br>१९४ सत्कृति. |
| १९६ | आपातलिका | SSI ISI ISS, SII SII SII SS<br>त ज य, भ भ भ गग ...... | ९/११ | ० | ● | पं. ५१५/८ | ० | १९५ आपातलिका. |
| १९७ | उदीच्यवृत्ति | ISI SSI SIS, SSS IIS ISI S<br>ज त र, म स ज ग ...... | ९/१० | ० | ० | पं. ५१५/८ | ० | १९६ कर्तव्य. |
| १९८ | उपचित्र | IIS IIS IIS I S, SII SII SII SS<br>स स स ल ग, भ भ भ गग ...... | ११/११ | ० | ० | पं. ५१३/८ | ० | १९७ कोण मरें ! |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १९९ | उपजाति-<br>( २ आख्यानकी ) | इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा मिश्रण | ... | वृ. | गी. | पं. | ० | —क्र.क्र. १९३ व १९४ पहा. |
| २०० | दक्षिणांतिका * | ISI SSI SIS, ISI SSS ISI S<br>ज त र, ज म ज ग ..... | ९/१० | ० | ० | पं. [illegible]/८ | ० | १९८ स्वार्थ. |
| २०१ | पुष्पिताग्रा | IIIIIISISISS, IIII ISI ISI SIS S<br>न न र य न ज ज र ग ... | १२/१३ | वृ. | गी. | पं. | ० | १९९ सुखाचें मूळ. |
| २०२ | प्रवृत्तक * | IS SSI SIS, SIS III SIS IS<br>ज त र र न र लग ...... | ०/११ | ० | ० | पं. १३२/८ | ० | २०० प्रवृत्तक. |
| २०३ | प्राच्यवृत्ति * | SSI ISI SIS, SIS III SIS IS<br>त ज र, र न र लग ...... | ०/११ | ० | ० | पं. २१२/८ | ० | २०१ प्रभूची कृपा. |
| २०४ | मणिमाला (२)<br>( २ माल्यभारा ) | प्र. त्रि. चरण IIS IIS ISI SS<br>स स ज ग ग<br>द्वि. च. " IIS SIISISISS<br>स भ र य ...... | ११/१२ | ० | ० | पं. २०२/८ | ० | २०२ मणिमाला |
| २०५ | माल्यभारा-<br>( २ मणिमाला ) | " " " " " " | " | वृ. | ० | ० | ० | २०३ गुलाब. |
| २०६ | विपरीताख्यानकी | उपेंद्रवज्रा व इंद्रवज्रा मिश्रण | ... | ० | ० | पं. २०८/८ | छं. | २०४ विपरीत. |

* वृत्तरत्नाकरांत यांची व वृत्त क्र. १९३,१९६,१९७ ची मात्रावृत्तांत गणना केली आहे.

| अ. क्र. | वृत्तांची नांवें | वृत्तगणलक्षण | अ. सं. | ग्रन्थाधार. वृ. र. | गी. गो. | प्र. पं. | छं. मं. | का —कु.-क. द्वि.—उ. पु.पा तील क.क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २०७ | वियोगिनी-(२ सुंदरी) | ॥S॥SISIS—॥SS॥SISIS<br>स स ज ग, स भ र लग ...... | १०/११ | वृ. | गी. | ० | ० | २०५ नम्रता. |
| २०८ | वेगवती | ॥S॥S॥S S—S॥S॥॥SS S<br>स स स ग, भ भ भ गग ...... | १०/११ | अ | पटे | को | श | २०६ वेगवती. |
| २०९ | सुंदरी-( २वियोगिनी) | २०७वें वृत्त " वियोगिनी " पहा. | १०/११ | ० | गी. | ० | ० | क.क्र. २०५'नम्रता' पहा ! |
| २१० | सौम्या * | प्र.द्वि.चरणीं सर्व गुरु... ८, ८अक्षरें<br>त्रि.च. " " लघु...१६,१६ " | १६/३२ | ० | ० | पं. १३/७ | ० | २०७ केली केली. |
| २११ | हरिणप्लुता | प्र.त्रि.चरण ससस लग—॥S॥S॥SIS<br>द्वि.च. " न भ भ र—॥।S॥S॥SIS | ११/१२ | वृ. | गी. | पं. | ० | २०८ सुखदुःख.<br>२०९ हरिणीप्लुता.<br>२१० मरणी मरे. |
| | **विषम वृत्तें** | | | | | | | |
| २१२ | विषम | प्र. च.११स्वागता SISIIISIISS<br>द्वि. च.११माल्यभारा॥S॥SISISS<br>त्रि. च.११शालिनी SSSS-SISSI SS<br>च. च.१२ इंद्रवंशा SSISSIISISIS | | ० | ० | ० | छं. | २११ विषम काळ. |

* वृत्तरत्नाकरांत 'सौम्या'सच " अनंगक्रीडा " ही संज्ञा दिली आहे व हें मात्रावृत्त गणलें गेलें आहे.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २१३ | उद्गता | प्र.द्वि. १०,१०IIS IS III SI, IIIIISISIS<br>त्रि.च. ११,१३SIIIIISIIS, IISISIIISISIS | ० | गी. ० | | ० | २१२ उद्गता. |
| २१४ | शिखा * | प्र.द्वि- १६,१३ IIIIIIIIIIIII, IIIIIIIIIIIS<br>त्रि.च. १६,१५ IIIIIIIIIIIIII,IIIIIIIIIIIIIIS | ० | ० | पं. ५१८/८ | ० | २१३ शिखा. |
| २१५ | खजा * | प्र.द्वि.१६,१५IIIIIIIIIIIII,IIIIIIIIIIIII<br>त्रि.च. १६,१३ IIIIIIIIIIIII,IIIIIIIIIIII | ० | ० | पं. ५१८/८ | ० | २१४अमरनगरसुख. |
| | **मात्रागणवृत्तें** | | | | | | |
| २१६ | आर्या (२-<br>गाथा (१) | प्रथम व द्वितीय चरणीं मात्रा १२,१८<br>त्रितीय व चतुर्थ " " १२,१५ | वृ. | गी. | पं. | छं. | २१५ प्रेमगान. |
| २१७ | आर्यागीति | प्रथम व द्वितीय " " १२,२०<br>त्रितीय व चतुर्थ " " १२,२० | वृ. | गी. | पं. | छं. | २१६ कालगूर. |
| २१८ | उद्गीति | प्रथम व द्वितीय " " १२,१५<br>त्रितीय व चतुर्थ " " ११,१८ | वृ | गी. | ० | ० | २१७ शाश्वत. |
| २१९ | उपगीति | प्रथम व द्वितीय " " १२,१५<br>त्रितीय व चतुर्थ " " १२,१५ | वृ. | गी. | ० | ० | २१८देवाचा खेळ. |
| २२० | उपचित्रा | प्रथम व द्वितीय " " १६.१६<br>त्रितिय व चतुर्थ " " १६,१६ | ० | ० | पं. ५१७/८ | ० | २१९ उपचित्रा. |

*वृत्तरत्नाकरांत यांची गणना मात्रावृत्तांत केली आहे व ' खजा ' चा मात्राक्रम १४,१७ १३,१७ असा धरला आहे.

| क्र. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | ग्रंथाधार. वृ. र. | गी. सा. | पं. प. | छं. म. | का.—कु.—क.—द्वि.—उ. पु. पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २२१ | औपच्छंदसिक* | प्रथम द्वितीय चरण मात्रा १६,१८<br>त्रितीय चतुर्थ " " १२,१८ | ० | गी. | पं. [illegible] | ० | २२० यत्स्फूर्ति. |
| २२२ | गाथा (१)—<br>(२ आर्या) | वृत्त २१६वें "आर्या" पहा. | ० | गी. | ० | ० | क. क्र. २१५<br>'प्रेमगान' पहा. |
| २२३ | गाथा (२) | प्रथम द्वितीय चरण मात्रा १३,१३<br>त्रितीय चतुर्थ " " १३,१८ | ० | ० | पं. [illegible] | ० | २२१ नियंत्रण. |
| २२४ | गीति | प्रथम, द्वितीय " " १२,१८<br>त्रितीय, चतुर्थ " " १२,१८ | वृ. | गी. | पं. | ० | २२२ विश्वव्याख्या.<br>२२३ श्रीप्रभुमहा-मंत्र आर्या. |
| २२५ | पज्झाटिका | प्रथम द्वितीय " " १६,१६<br>त्रितीय, चतुर्थ " " १६,१६ | ० | ० | पं. २२/८ | ० | २२४ प्रभूची ओढ. |
| २२६ | पादाकुलक | " " " " " | अप | टे | को | श | २२५ तत्त्वज्ञान. |
| २२७ | वैतालीय | प्रथम, द्वितीय " " १४,१६<br>त्रितीय, चतुर्थ " " १४,१६ | ० | गी. | पं. [illegible] | ० | २२६ दिनचर. |

*वृत्तरत्नाकरांत समविषम चरणीं ६,८ मात्रा व एकेक रगण, यगण अशी याची लक्षणा दिली आहे.

| | प्राकृत वृत्तें | | | |
|---|---|---|---|---|
| २२८ | अभंग (मोठा) | (मोठा अभंग)पहिल्या तीन चरणास प्रत्येकी ६,६ अक्षरें आणि चौथ्या चरणास ४ अक्षरें असतात. [ प्रकार पहिला ] यांत दुसऱ्या व तिसऱ्या चरणाच्या शेवटीं यमक असतें. | वृ. | २२७ गंगा कल्याणाची. |
| २२९ | अभंग ” | [ मोटा अभंग–प्रकार २रा] यांत १ल्या,२ऱ्या, व ३ऱ्या चरणास यमक असतें. | वृ. | २२८ यश लाभें त्यास. |
| २३० | अभंग (लहान) | [लहान अभंग–प्रकार पहिला] यास ८,८ अक्षरात्मक दोन चरण असतात व दोन्ही चरणास यमक असतें, क्वचित् प्रथम चरणास ६ अक्षरें असतात. | वृ. | २२९ दीपवाली-<br>२३० भाऊबीज. |
| २३१ | अभंग ” | [लहान अभंग–प्रकार २रा ] दुसऱ्या चरणांत ७ अक्षरें असतात व चौथें यमकाक्षर असतें. | वृ. | २३१ सर्णे लोपलीं. |
| २३२ | अभंग ” | [लहान अभंग–प्रकार तिसरा]यास आठ आठ अक्षरांचे चार चरण असतात, आणि पहिल्या तीन चरणाच्या शेवटीं यमक असतें. | वृ. | २३२ आजकाल. |
| २३३ | ओवी | हें वृत्त चार चरणात्मक आहे. पहिल्या तीन चरणास प्रत्येकी आठ अक्षरें व शेवटीं यमक असतें. चतुर्थ चरण सप्ताक्षरी पण निर्यमक असतें.(हा मुख्य नियम, परंतु अर्थानुरोधानें कवि कमी अधिक अक्षरें योजितात.) | वृ. | २२३ देवाचें स्थान. |

| अं. क. | वृत्तांची नांवें. | वृत्तगणलक्षणा. | ग्रंथाधार. | | | | का.—कु.—क.—द्वि.—उ. पु. पा. तील क. क्र. सह नांवें. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | वृ. र. | श्रु. बो. | पं. म. | छं. मं. | |
| २३४ | दिंडी | हें वृत्त चार चरणात्मक असतें, आणि प्रत्येक चरणांत १९मात्रा असून नवव्यावर अवसान असतें म्हणून याचे९मात्रांचा व १० मात्रांचा असे दोन भाग पडतात. | वृ. | | | | २३४ ध्येय. |
| २३५ | साकी | या वृत्तांतील प्रथम व द्वितीय चरणांत अनुक्रमें १६,१२ मात्रा (४ मात्रांचा एक गण—असे७गण )असतात. आणि त्रितीय व चतुर्थ चरणीं अनुक्रमें १०,१४मात्रा असतात. | वृ. | | | | २३५ दैन्य न गेलें-कांहीं. |
| २३६ | घनाक्षरी | यांत १६ चरणें किंवा ४पाद असतात. प्रत्येक पाद चार चरणांचा असतो १ल्या तीन चरणांत प्रत्येकीं १२मात्रा-युक्त ८ अक्षरें असून तीन्हींत यमक असतें.चौथ्या चरणांत ११ मात्रायुक्त ७अक्षरें असून,'घनाक्षरी'च्या चारी पादांतील फक्त चतुर्थ चरणाचीच चार यमकें सारखीं असतात. | वृ. | ० | पं. २३२/८ | ० | २३६ येवढें आणि-द्यावें. |

येथें एकंदर वृत्तांची नामसंख्या २३६ आहे, परंतु अभिजात अशीं १८६ च वृत्तें आहेत, कांहीं वृत्तांस अनेक नांवें आहेत अशा वृत्तांची संख्या ५० आहे.

